श्रीसयाजी साहित्यमाला–पुष्प ६५ वें

[ इतिहास गुच्छ ]

---

# हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास

# मराठी रियासत–मध्य विभाग,

## छत्रपतिशाहू–पेशवे बाळाजी विश्वनाथ व बाजीराव

[ स. १७०७–१७४०. ]

लेखक

गोविंद सखाराम सरदेसाई, बी. ए., बडोदें.

---

मुद्रक व प्रकाशक,

गणेश विठ्ठल कुळकर्णी

' उद्यान ' छा० गिरगांव–मुंबई.

संवत् १९७७ इ. स. १९२०

किंमत रु २–१२–०

॥ श्री ॥

# जाहिरात.

—:०:—

आपल्या देशी भाषेच्या साहित्याची अभिवृद्धि करण्याच्या सद्धेतूनें श्रीमंत महाराजा साहेब सर सयाजीराव गायकवाड, सेनाखासखेल, समशेर बहादूर, जी. सी.एस्. आय्, जी. सी. आय्. ई, ह्यांनीं कृपावंत होऊन दोन लक्ष रुपयांची जी रक्कम अनामत ठेविली आहे, तिच्या व्याजांतून "श्रीसयाजी–साहित्यमालेंत" विविध विषयांवर पुस्तकें तयार करण्यांत येत असतात.

हा "हिन्दुस्थानचा अर्वाचीन इतिहास—मराठी रियासत–मध्य-विभाग" स्वतंत्र पुस्तक असून तें उक्त मालेंतील "इतिहास–गुच्छांत" पांसष्टावें पुष्प ह्मणून रा. रा. गोविंद सखाराम सरदेसाई, बी. ए. यांचेकडून तयार करवून प्रसिद्ध करण्यांत येत आहे.

विद्याधिकारी कचेरी,
बडोदें.
ता. ३०. १०. १९२०

ज. पु. जोशीपुरा,
भा. म.

A. B. Clarke.
विद्याधिकारी,
बडोदें.

श्री.

# प्रस्तावना.

---:०:---

**मराठी रियासत, मध्यविभाग.**– शाहू छत्रपतीच्या राज्यारोहणा-पर्यंत मराठी रियासतीचा पूर्वार्ध स. १९१५ सालीं प्रसिद्ध होऊन पुढील उद्योग करूं लागल्यावर, पेशवाईअखेरचा सर्व भाग एका उत्तरार्धांत पुरा होईल असा संभव दिसेना. पेशवे घराण्यांतील पहिल्या तीन पुरुषांचा काल विशेष भानगडीचा व अद्यापपावेतों बहुतेक अनभ्यस्तच आहे. त्यांत मोगल बादशाहीचा ऱ्हास व मराठशाहीचा फैलाव हे विषय प्रधान असून, त्यांतच रजपूत, जाठ, रोहिले इत्यादिकांचा निकट संबंध मराठ्यांच्या राजकारणाशीं येतो. मराठ्यांची सत्ता वृद्धिंगत होत असतां अनेक नवीन व्यक्ती व घराणीं राष्ट्रोद्योगांत सामील झालीं. त्या सर्वांच्या उपलब्ध हकीकती संकलित करण्यांत व अनेक वादग्रस्त प्रकरणांची ऐतिहासिक संगति जुळविण्यांत ग्रंथाचा बराच विस्तार झाला; ह्मणून छत्रपति शाहूच्या राज्यारोहणापासून पानपतच्या प्रसंगापर्यंतचा विषय 'मध्यविभाग' या नांवानें प्रसिद्ध करण्याचें ठरवून, त्याचीं सुमारें बाराशें पानें एका पुस्तकास तोलणारीं नसल्यामुळें पहिल्या दोन पेशव्यांचा हा खंड प्रथम बाहेर काढून, त्या पुढचा नानासाहेब पेशव्याचा दुसरा खंडही लवकरच वाचकांचे हातीं देण्याचा इरादा आहे. पानपतच्या पुढील पेशवाईच्या अखेरचा भाग तयार होण्यास अद्यापि कांहीं अवधि लागेल.

अलीकडे ऐतिहासिक संशोधनास चलन मिळून नानाप्रकारची नवीन माहिती स्वतंत्र ग्रंथांतून, मासिक पुस्तकांतून व कैकवेळां वर्तमान पत्रांतून प्रसिद्ध होत आहे तिचा संग्रह करणें, पुष्कळ कागदांच्या चुकलेल्या तारखा प्रत्यंतर पुराव्यानें निश्चित करणें, साधनग्रंथांच्या सूची व टिपणें बनविणें, आणि त्यांवरून पुढें एकएका बाबतीची व्यवस्थित संगति जुळवून ती लिहून काढणें, इत्यादि कामें एका हातींच होणें अवश्य असल्यामुळें, पेशवाईचा हा भाग तयार होण्यास विलंब लागला, त्याबद्दल वाचकांनीं मला क्षमा केली पाहिजे.

**ग्रंथविस्तार.**––आपला इतिहास अद्यापि बनत आहे. अनेक वाद-ग्रस्त प्रश्नांवर वाद माजले असून संशोधनही चालू आहे. यासाठीं, कोण-

तल्ही पुरावा न सोडतां, माझें विवेचन खरें खोटें ताडून पाहण्याची व त्याजवर ज्यास्त परिश्रम करण्याची वाचकांना सोय व्हावी ह्मणून, साधन-ग्रंथांची स्वतंत्र यादी देऊनही, शिवाय पुस्तकांत ठिक ठकाणीं दरेक विधानास भरपूर आधार दर्शविले आहेत. हल्लीं जें नवीन ऐतिहासिक साहित्य पुष्कळच बाहेर येत आहे, त्याची ओळख सामान्य वाचकांस अन्य तऱ्हेनें होण्याचा संभव नसल्यामुळें, तत्कालीन लेखांतले शक्य तितके उतारे घेऊनच मीं आपला विषय बनविला आहे. मोगल बादशाहींतील घडामोडी मुद्दाम विस्तारानें लिहिल्या आहेत; कारण, एकंदर हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास लिहिण्याचाच माझा मूळ उद्देश असून, मराठ्यांचे उद्योग स्पष्टपणें कळण्यासही अशा विस्ताराची जरूर आहे. टीकाकारांनीं व सन्मान्य मित्रांनीं पूर्वींच्या पुस्तकांवर केलेल्या सूचनांचा व सद्बुद्धीनें केलेल्या टीकेचा मीं शक्य तितका उपयोग हल्लींच्या उद्योगांत केला असून, अजून यांत अनेक दोष वाचकांस दिसल्याशिवाय राहणार नाहींत, हें मी जाणून आहें. हल्लीं छापण्याच्या अडचणी कशा आहेत हें सांगण्याची जरूर नाहीं. नकाशे, चित्रें, हस्ताक्षरें वगैरे भरपूर घालून पुस्तक परिपूर्ण बनवावें अशी मोठी हाव वाटत असूनही, परिस्थितीकडे पाहून या सर्व गोष्टी मनचे मनांत ठेवाव्या लागतात. तूर्त नकाशे न देतां जरूर तितका स्थल-निर्देश शब्दांनींच केला आहे. मुद्रणाची सांपत्तिक स्थिति सुधारल्यास वरील बाबतींचा अंतर्भाव पुनरावृत्तींत करितां येईल.

**एकदर उद्योगाचें स्वरूप.**—तीन पेशव्यांच्या या कालाचें टीकात्मक व सूचक परीक्षण एकट्या रा. राजवाड्यांचेंच उपलब्ध असून, त्यांच्याच खंडांचा उपयोग मला पुष्कळसा झाला आहे. आधारांत जेथें नुसता खंड किंवा त्याचा आंकडा दर्शविला असेल, तेथें तो रा. राजवाड्यांचा खंड समजावा. त्यांच्या सहाव्या खंडांत पुष्कळसे कागद बिनतारखेचे किंवा त्रुटित मिळाले तसे, आद्यंतविरहित छापलेले आहेत; अशा बहुतेक कागदांच्या तारखा व इतर बाबती संदर्भावरून मीं निश्चित केल्या आहेत, हें ते आधार तपासून पाहणाराच्या नजरेस आल्याशिवाय राहणार नाहीं. एकंदरींत विद्यार्थी, शिक्षक व सामान्य स्त्रीपुरुष वाचक यांस स्वराष्ट्राच्या गतकालीन कर्तृत्वाची ही भरपूर माहिती एकत्र वाचून, पुढील

राष्ट्रोद्योगास लागणारा आत्मप्रत्यय त्यांचे ठिकाणीं उत्पन्न होईल, अशी मी आशा बाळगितों; आणि पुनः सर्व वाचकांस विनंति करितों कीं, हें इतिहासाच काम सर्व राष्ट्राचें आहे, एका व्यक्तीचें नव्हे, हें ध्यानांत ठेवून सर्वांनीं त्यास यथाशक्ति हातभार लावावा, आणि यांत जी माहिती चुकीची अगर अपूर्ण वाटेल, ती मला अवश्य कळवावी. अशा सूचनांचा संग्रह करून आपल्या देशाचा अर्वाचीन इतिहास होईल तितका संपूर्ण व निर्दोष करून पुनरपि वाचकांचे हातीं द्यावा अशी उत्कट इच्छा आहे. अद्यापि पल्ला मोटा आहे. ब्रिटिश रियासतीच्या पूर्वार्धाची पुनरावृत्ति छापावयाची आहे उत्तरार्ध तर अजून तयारच व्हावयाचा आहे. सारांश, सर्व काम लवकर पुरें करण्याची मला अहर्निश विवंचना आहे.

आभारोद्गार.—विद्याप्रिय भूपति श्रीमंत महाराज सयाजीराव गायकवाड यांच्या संतोषकारक सेवेंत हें काम करण्याची मला सवड मिळाली, इतकेंच नव्हे, तर हल्लींच्या महागाईच्या दिवसांत बडोद्याच्या शाळाखात्यानें या कामास उदार हातभार लावला नसता तर, हें पुस्तक तूर्त तरी बाहेर येऊं शकलें नसतें. सबब बडोदेसरकाराचा मी सर्वथैव उपकारी आहें. या पुस्तकास ज्या अनेक ग्रंथकारांचा आधार घेतला आहे, त्या सर्वांचा मी ऋणी असून, शिवाय भा. इ. सं. मंडळाचे चालक, पुणें, प्रो. जदुनाथ सरकार, कटक, रा. यशवंतराव गुप्ते, पुणें, रा. ब. पारसनीस व रा. वासुदेव विष्णु जोशी, सातारा, रा. विनायक लक्ष्मण भावे, ठाणें, रा. श्री. बि. आठल्ये, शिपोशी, रा. वासुदेवशास्त्री खरे, मिरज, रा. भास्कर रामचंद्र भालेराव, ग्वाल्हेर, रा. बाळकृष्ण नारायण देव, इंदूर, या व दुसऱ्या अनेक मित्रांनीं जवळचे ऐतिहासिक कागद देऊन किंवा अन्य प्रकारें जें साह्य केलें त्याजबद्दल मी सर्वांचा फार फार आभारी आहें.

ता० ३१ माहे डिसेंबर स. १९२०, बडोदें. गो. स. सरदेसाई.

# आधारग्रंथांची यादी.

मराठी रियासतीच्या पूर्वभागांत ही यादी तपशीलवार दिली आहे. शिवाय या पुस्तकांतही दरएक प्रकरणास ठिकठिकाणीं आधार दाखविले आहेत. सबब खालील अल्प निर्देश पुरे आहे.

रा. राजवाडे–म. इ. साधनें, खंड मुख्यत: १–८

रा. ब. पारसनिस-इतिहाससंग्रह, बुंदेलखंड प्रकरण,
ब्रह्मेंद्रस्वा० चरित्र; भारतवर्ष १-२ इ०

रा. ब. साने-काव्येतिहाससंग्रह-पत्रें यादी, शा. म. बखर,
ना. भो. बखर, होळकरांची कै., शकावली, इ०

डे. व्ह र्ट्. सो –शा. म. रोजनिशी व बाळाजी बा. रोजनिशी १-२.

रा. मावजी-कैफीयती व यादी; व सनदापत्रें.

रा.वा.शास्त्री खरे ऐ. ले. सं.-१३; इचलकरंजी इ०;हरिवंश बखर.

भा.इ.सं.मंडळइ तिवृत्तें व संमेलनवृत्तें.

सत्कार्यो० सभा, धुळें इतिहास व ऐतिहासिक.

भोर, सावंतवाडी, कोल्हापुर व अमात्य, प्रतिनिधि
इत्यादिकांचे स्वतंत्र वृत्तान्त.

Works of Grant duff, Elphinstone, Elliot, Irvine, Gerson Da Cunha, Dr. Burgess' chronology,etc.

# शुद्धिपत्र.

छापण्याच्या व इतर अडचणींमुळें खिळ्यांच्या चुका पुष्कळच झाल्या आहेत. सबब अगदींच विपर्यास करणारीं अशुद्धें मात्र खालीं दाखविलीं आहेत.

पृ. ५३ ओ. २ 'मेहेंदळेकृत च०'च्या पुढें 'व भा. व. श. पृ. ३' असें पाहिजे.

पृ. ७६ ओ. ८-ले. १ प. ६ चे ऐवजीं ले. १५६ पाहिजे.

पृ. १३० ओ. १९ 'अशी' चे पुढें 'पद्धत' शब्द पाहिजे.

पृ. २३१ ओ. ११ लेखांक २ चे ऐवजीं ले. ५२ पाहिजे.

पृ. २५८ ओ. ११ 'नसावा'चे ऐवजीं 'असावा' पाहिजे.

पृ. ३३४ ओ. १२ खं. ३-१६७१चे ऐवजीं खं. ३ ले १६७ पाहिजे.

पृ. ३५४ ओ. ८ स. १७२० चे ऐवजीं सन १७२४ पाहिजे.

पृ. ३५४ ओ. ९ स. १७२४ चे ऐवजीं सन १७३१ पाहिजे.

पृ. ३६२ ओ. ८ स. १७२७ चे ऐवजीं सन १७२४ पाहिजे.

पृ. ४०५ ओ. ९ 'डौराचे व खान पादशहाचे' ऐवजीं 'पातशहाचे व खानडौराचे' असें पाहिजे.

पृ. ४०७ ओ. ४ 'आंगरे' ऐवजीं 'आगरे' पाहिजे.

पृ. ४१४ ओ. २३ 'गोंधळून न गेले' चे ऐवजीं 'गोंधळून गेले.

पृ. ४३६ ओ. ८ व ९ 'पाटण' चे ऐवजीं 'पाटस' असें पाहिजे.

# अनुक्रमणिका.

---

## वंशावळी



## या ग्रंथकर्त्याचीं ऐतिहासिक पुस्तकें.

१ मुसलमानी रियासत.

२ मराठी रियासत, पूर्वार्ध, स. १७०७ पर्यंत.

३ शालोपयोगी भारतवर्ष.

४ बालोपयोगी महाराष्ट्राचा इतिहास.

५ ग्रीस देशाचा इतिहास.

( वरील पुस्तकें इंदुप्रकाश छापखाना गिरगांव रोड मुंबई येथें मिळतील)

६ मराठी रियासत मध्यविभाग १७०७–१७४०
( उद्यान छापखाना, गिरगांव, मुंबई. )

७ मराठी रियासत मध्यविभाग १७७०–१७६१,
( उद्यान छा०त छापत आहे. )

८ ब्रिटिश रियासत पूर्वार्ध,—प्रथमावृत्ति खलास.
द्वितीयावृत्ति छापावयाची आहे.

## बाजीराव बाळाजी पेशवे.

[ वाघोलीकर संग्रह, संशोधक रा, पां. न. पटवर्धन. ]

श्री.

# हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास.

# मराठी रियासत

## मध्य विभाग.

### प्रकरण पहिलें.

छत्रपति शाहू, बाळाजी विश्वनाथाचा उदय.

इ. स. १७०८–१७१३.

**१. स्वकीयांशीं युद्ध व त्याचें स्वरूप ( स. १७०८–१३ ).**
**२. रांगण्यावरील मोहीम ( स. १७०९–१० ).**
**३. धनाजी जाधवाचा मृत्यु ( मे, जून स. १७१० ).**
**४. बाळाजी विश्वनाथ, पूर्वपीठिका.**
**५. बाळाजीचा धाडशी डाव.**
**६. चंद्रसेन जाधवाचा फितवा ( स. १७१०–१२ ).**
**७. बाळाजीस ‘ सेनाकर्ते ’ पदाची प्राप्ति (ऑगष्ट, स. १७११).**

माघ शुद्ध, १ शके १६२९ [ २३ जानेवारी १७०८ ] पासून मार्गशीर्ष वद्य ३ शके १६७१ [ १५ डिसेंबर १७४९ ] पावेतों शाहूछत्रपतीची कारकीर्द झाली. शाहूच्या पश्चात् मराठी राज्याचा कारभार बहुधा पेशव्यांनींच प्रमुखपणें चालविला. पेशव्यांच्या घराण्यांतील पहिला पुरुष बाळाजी विश्वनाथ यास ता. १६ नोव्हेंबर सन १७१३ रोजीं शाहू छत्रपतीनें पेशवाईचें काम दिलें. तेव्हांपासून शाहूच्या अखेरीपावेतों तीन पेशवे झाले. शाहूच्या मृत्यूनंतर ता. ४ जानेवारी १७५० रोजीं रामराजा छत्रपति झाला. तो सिंहासनावर असतांच ता. २३ जून सन १७६१ रोजीं तिसरा पेशवा बाळाजी बाजीराव मरण पावला. राजपुरुषांच्या हयाती-

वरून इतिहासाचे कालखंड पाडण्याचा प्रघात आहे. या नियमास अनुसरून मराठी रियासतीच्या या मध्यम विभागांत शाहू छत्रपतीची कारकीर्द हा पहिला मोठा खंड पडतो. परंतु ही कारकीर्द मोठी असल्यामुळें विवेचनाच्या सोयीसाठीं पेशव्यांच्या नांवावरून तिचे पोटभाग पाडणें प्रशस्त आहे. शिवाय चालू अभ्यासक्रमांत व लौकिक प्रचारांत पेशव्याच्या नांवानेंच मराठशाहीचा कारभार ओळखिला जातो. सबब तोच क्रम येथेंही स्वीकारण्यांत येत आहे. आतां प्रथम शाहू छत्रपतीच्या कारकीर्दीस सुरुवात करावयाची.

१. स्वकीयांशीं युद्ध व त्याचें स्वरूप ( स. १७०८–१३ ].– शाहूच्या कारकीर्दीची सुरुवात कशी झाली हें मागें सांगण्यांत आलेंच आहे. प्रथम कित्येक वर्षें त्यास स्वकीयांशींच झगडावें लागलें. या युद्धास स्वकीयांशीं युद्ध असें नांव देणें सोयीचें होईल. इंग्रजींत ज्यास ' सिव्हिल वॉर ' ह्मणतात त्याचे हे पर्याय शब्द आहेत. राज्यप्राप्तीकरितां किंवा अन्य हेतूनें एकाच राष्ट्रामध्यें दोन तट होऊन त्यांजमध्यें युद्ध चालतें व एकाच राष्ट्रांतले लोक दोन विरुद्ध पक्षास सामील होऊन एकमेकांचा प्राण घेण्यास उद्युक्त होतात, त्यास ' स्वकीयांशीं युद्ध ' असें ह्मणतात. अशा युद्धानें देशाचें भारी नुकसान होतें. आपल्याच फौजांनीं आपला देश उद्ध्वस्त होतो. आपणच आपल्या लोकांचे खून केले असें होऊन, झालेलें नुकसान शत्रूंकडून भरून घेण्याची सवड राहत नाहीं. परशत्रूंशीं जें युद्ध चालतें त्यांत जय झाला तर थोडें बहुत नुकसान भरून येतें, आणि अपजय झाला तरी राष्ट्राला चांगला अनुभव येऊन नवीन व्यवस्था करतां येते; तसें ह्या आपसांतल्या युद्धानें होत नाहीं. मराठ्यांच्या इतिहासांत अशीं दोन युद्धें झालीं. शाहूच्या वेळचें हें पहिलें; आणि पुढें नारायणराव पेशव्याच्या नंतर झालें तें दुसरें. त्या दुसऱ्या युद्धानें तर मराठशाहीचा बहुतेक अंतच झाला. इंग्लंड देशांतही अशीं युद्धें झालेलीं आहेत. लँक्या-

स्टर व यॉर्क या दोन घराण्यांमध्यें झालेलीं रोझेस नांवाचीं युद्धें व पहिल्या चार्लस् राजाच्या वेळेचें युद्ध ह्याच प्रकारचीं होत. या दोनहीमुळें देशाची कशी खराबी झाली, हें इंग्लंडचे इतिहासांत नमूद आहे.

परिस्थितीच्या संबंधानें ह्या युद्धाचे पोटभाग पाडितां येतात; पहिला भाग शाहूच्या सुटकेपासून राज्याभिषेकापर्यंतचा. त्यांत खेडच्या लढाईचा समावेश होतो. दुसरा भाग, राज्याभिषेकापासून धनाजीच्या मृत्यूपर्यंतचा. हा मृत्यु १७१० च्या मे जूनच्या सुमारास झाला. तिसरा भाग धनाजीच्या मृत्यूपासून ताराबाई व तिचा मुलगा शिवाजी कैदेंत पडलीं, तेथपर्यंतचा. त्यानंतर राजसबाई व तिचा मुलगा संभाजी हे शाहूचे प्रतिपक्षी झाले. त्यामुळें युद्धाचें स्वरूप थोडेसें बदललें, आणि त्याचा उग्रपणाही कमी झाला. त्यांतून बाळाजी विश्वनाथानें शाहूची बाजू संभाळल्यामुळें त्यास सन १७१३ च्या नोव्हेंबर महिन्यांत पेशवेपद मिळालें. तेव्हांपासून त्यानें बहुतेक प्रतिपक्षांचा पाडाव करून सन १७१७ च्या अखेरपावेतों शाहूचा पक्ष जोरांत आणिला. सारांश सन १७१० पासून १७१७ पर्यंतचा जो कालखंड पडतो, त्यांत बाळाजीचीच कर्तबगारी विशेषतः दिसून येते. आपसांतील हे कलह मिटविण्यासाठीं ह्मणून स. १७१८ त बाळाजीनें दिल्लीवरची स्वारी उपस्थित केली, तेथून पुढें मराठशाहीला निराळें वळण लागलें.

शाहू बाह्यतः तरी मोगलांची ताबेदारी पत्करून इकडे आला, ही गोष्ट मराठमंडळास रुचणारी नव्हती. औरंगजेब बादशहा फार धोरणी होता. शाहूवर मेहेरबानी करण्याचा त्याचा विचार कधींच नव्हता. तशाच प्रसंगीं उपयोगी पडणारा हातांतला डाव एवढ्याच समजुतीनें त्यानें शाहूस जवळ ठेविलें होतें. मराठशाहीची अंतःस्थिति त्यास चांगली माहीत होती. ताराबाईचे व प्रमुख सरदारांचे विशिष्ट स्वभाव व प्रत्येकाचे अंतस्थ हेतु त्यास अवगत होते. मराठ्यांनीं आपणास घेरलेलें पाहून शेवटचा उपाय ह्मणून शाहूस

मुक्त करून, मराठमंडळांत दुही माजविण्याची युक्ति त्यानें काढिली, व ती फलद्रूप झाली. मात्र आपल्या हयातींत त्यानें ही गोष्ट अंमलांत आणिली नाहीं. त्याच्या पश्चात् झुल्फिकारखानानें अजिमशहाकडून शाहूस सन १७०७ च्या एप्रिल महिन्यांत मुक्त करून औरंगजेबाचा कावा सिद्धीस नेला. शाहूनें मोगल बादशहांशीं पुढें सख्यच राखिलें; आणि बादशहाच्या पाठिंब्यामुळेंच आरंभींच्या झगड्यांत तरी त्याचा निभाव लागला. अजिमशहा मारला गेला ही खबर बहादूरशहानें ता. ११ मे सन १७०७ च्या पत्रांत शाहूस कळविली, ( रा. खं. ८--५४ ), आणि त्यास दहा हजारी मनसब देऊन ( खं. ८-५५ ), ताराबाईच्या अर्जास न जुमानतां, शाहूस फौज घेऊन आपल्या मदतीस बोलाविलें, (खं.८--५६). सन १७०७ च्या ऑगस्टांत बहादुरशहा सिंहासनारूढ झाला, आणि ऑक्टोबरांत कामबक्षाचा पाडाव करण्याकरितां फौजेसह दक्षिणेंत आला. झुल्फिकारखान प्रथम अजिमशहाचे बाजूस होता; परंतु त्याचा सूड न घेतां उलट त्यास पूर्वींपेक्षां जास्त योग्यतेस चढवावें अशी सल्ला बहादूरशहास त्याचा चतुर वजीर मुन्यिमखान यानें दिली. त्याप्रमाणें झुल्फिकारखानाचा गौरव बादशहानें केला. कामबक्षावरच्या स्वारींत बादशहानें शाहूची मदत मागितली, तेव्हां शाहूनें नेमाजी शिंदे ह्यास मदतीस पाठविलें. ता. १४ फेब्रुवारी सन १७०८ रोजीं हैदराबाद नजीक लढाई होऊन कामबक्षाचा शेवट झाला. ह्या मदतीबद्दल बादशहानें मराठे सरदारांचा मोठा गौरव केला. ही संधि साधून शाहूनें आपले वकील बादशहाकडे पाठवून सरदेशमुखीच्या हक्कांची सनद करून मागितली. ही विनंती मान्य करून बादशहानें शाहूस सनदा द्याव्या, असा झुल्फिकारखानाचाही आग्रह पडला. इतक्यांत ताराबाईनेंही आपले वकील बादशहाकडे पाठवून सदरहु हक्कांची मागणी केली. खानखानान मुन्यिमखान वजीर याचें व झुल्फिकारचें पटत नसून वजिरानें ताराबाईच्या मागणीस

पुष्टि दिली. दोनही पक्षांनीं आपआपल्या शिफारशीची बादशहापाशीं इतकी शिकस्त केली, कीं त्याच्यानें कोणाचेंही बोलणें मोडवेना. सरदेशमुखीचीं फर्मानें लिहून मुद्दां तयार झालीं होतीं. अशा अडचणींत वजीर मुन्यिमखानानें नवीन शक्कल काढिली कीं, शाहू व ताराबाई ह्यांनीं आपसांत लढून भांडणाचा निकाल करावा, नंतर विजयी पक्षास सनदा देण्यांत येतील. ही तोड बादशहानें पसंत केली; आणि आपण निघून परत दिल्लीस गेला. ( खाफीखान,--एल्यट पु० ७ ). अर्थात् ताराबाईशीं जोरानें युद्ध चालविण्याचें हें एक नवीन कारण शाहूला उपस्थित झालें.

ताराबाईपासून दूर राहण्याच्या इराद्यानें आपली राजधानी अहंमदनगर करावी असा शाहूचा विचार होता, पण अहंमदनगर सारखें प्राचीन राजधानीचें शहर शाहूच्या हवालीं करण्यास झुल्फिकारखानानें विरोध केल्यामुळें, तो बेत अंमलांत आला नाहीं. एकंदरींत शाहूच्या संबंधानें मराठमंडळाची पूज्य बुद्धि बरीच होती, तथापि ताराबाई जबरदस्त कारस्थानी असून, शाहूचा स्वभाव तिच्या इतका निग्रही व खटपटी नव्हता. ह्या दोघांचा तंटा पुष्कळ काळ पावेतों चालला. वेळोवेळीं त्याचीं अनेक रूपांतरें होत गेलीं, व पदोपदीं नवीं संकटें शाहूवर आल्यामुळें त्याची जी हानि होत गेली, ती भरून काढण्यास बाळाजी विश्वनाथ मात्र समर्थ झाला.

युद्धाची हकीकत देण्यापूर्वीं शाहूच्या राज्यारोहणप्रसंगीं उभयपक्षांची परिस्थिति कशा प्रकारची होती हें पाहिलें पाहिजे. ताराबाई व शाहू दोघेही आपापला पक्ष सबळ करण्यास झटत होतीं. एकमेकांचे ताब्यांतील प्रदेश व ठिकाणें हस्तगत करणें आणि एकमेकांचे सरदार फोडणें हा त्यांचा क्रम चालू झाला. शाहू सातारा प्रांतीं आला ह्मणजे ताराबाई व तिचे साथीदार कोल्हापूर प्रांतीं दंगा करीत, आणि तो कोल्हापूर प्रांतीं गेला, म्हणजे ते सातारा प्रांतीं दंगा करीत. हा खेळ सन १७१० च्या

जून मास पावेतों म्हणजे सेनापति धनाजी जाधवाच्या मृत्यूपर्यंत चालला. धनाजीच्या मरणसमयीं शाहूची स्थिति किती निकृष्ट होती, हें उभयपक्षांकडील सरदारांच्या नांवनिशीवरून दिसून येईल. सेनापति धनाजी जाधव, सर लष्कर हैबतराव निंबाळकर, खंडेराव दाभाडे, मानसिंग मोरे, कंठाजी कदम, नेमाजी शिंदे, परसोजी भोसले, जिमणाजी दामोदर व त्याचा यजमान बहिरोपंत पिंगळे आणि खंडोबल्लाळ ही मंडळी शाहूकडे होती. आपाजी व दमाजी थोरात, शहाजी निंबाळकर[1], संताजी पांढरे, उदाजी चव्हाण, वाडीकर खेम सावंत, कान्होजी आंगरे, कृष्णराव खटावकर, रामचंद्र नीळकंठ व सातान्यास शाहूच्या कैदेंत असलेला परशुरामपंत प्रतिनिधि, ही मंडळी ताराबाईच्या पक्षास होती. यांनीं निरनिराळे टापू व्यापून पुण्यापासून कोल्हापूरपर्यंत दंगा उसळून दिला होता. मोगलांच्या तर्फेनें उगाच ढोंग करून कृष्णराव खटावकरानें कृष्णेच्या पलीकडील सगळा माणदेश आटोपला होता. प्रतिनिधीच्या औंध प्रांतांतही शाहूच्या विरुद्धच खटपट चालू होती. सन १७०७ पासून १७१० पर्यंत लढून शाहूची सत्ता सातारा किल्याच्या भोंवतालील पांच पंचवीस मैलांपलीकडे फारशी पसरली नव्हती. ताराबाईचा पक्ष बळावतच चालला होता. सन १७१० त धनाजी जाधव वारल्यावर तर ताराबाईच्या पक्षाला ज्यास्तच जोर आला. अशा आणीबाणीच्या पेंचांत त्यावेळीं शाहू होता. ( रा. खं. २ ).

शाहू व ताराबाई यांचें भांडण म्हणजे ब्राह्मण व मराठे यांजमधील भांडणाची सुरुवात होय, असें कित्येक प्रतिपादन करितात. वर जी उभयपक्षांकडील प्रमुख मंडळींची नांवनिशी दिली आहे, तिजवरून दोनही पक्षांकडे ब्राह्मण व मराठे सरदार समसमान होते हें स्पष्ट दिसतें. बाळाजी

---

१ फलटणच्या घराण्यांतील दहिवाडी शाखेपैकीं ( म. रि. पू. पृ. १३६ ).

विश्वनाथ, पिंगळे, चिमणाजी दामोदर, खंडोबल्लाळ इत्यादि मंडळी शाहु-कडे होती खरी, तथापि प्रतिनिधि व अमात्य हे वजनदार गृहस्थ ताराबाईकडे होते. मराठे सरदारांचाही विभाग असाच होता. ब्राह्मण एका बाजूला व मराठे एका बाजूला असा प्रकार येथें दिसत नाहीं. ज्यांस जो पक्ष खरा व स्वहिताचा वाटत होता, तो त्या पक्षाकडे होता. मराठशाहीच्या अखेरीपर्यंत हा प्रकार बहुधा असाच दिसतो. मराठ्यांचा सामान्य स्वभाव आपमतलबाचा आहे हें पूर्वीं वारंवार सांगितलेंच आहे. मतलबापुढें त्यांस राज्य, राष्ट्र वगैरे भावनांचा स्पर्श होत नसतो. हा स्वभाव मराठशाहींत व कदाचित् अजूनसुद्धां दिसून येणारा आहे. सारांश, ताराबाई व शाहू यांचा तंटा भाऊबंदकीचा असून, दोघेंही मराठशाहीच्या गादीकरितां भांडत होतीं. राज्याच्या दुर्दैवानें त्यांस हा कलह आपसांत मिटवून राष्ट्राचें कल्याण करण्याची बुद्धि झाली नाहीं. ती झाली असती तर, ह्मणजे मराठ्यांनीं आपली प्रचंड शक्ति आपसांत लढून फुकट घालविली, तिचा उपयोग त्यांनीं अन्यत्र केला असता, तर प्रत्यक्ष दिल्लीपतीचा पाडाव करून हिंदुस्थानचें सार्वभौमपद त्यांस अल्पायासानें प्राप्त झालें असतें. पण परिस्थितीचा योग्य फायदा करून घेणाऱ्या शिवाजीप्रमाणें कल्पक व सर्वांवर छाप बसवून राज्याचें काम करून घेणारा वजनदार पुरुष यावेळीं मराठशाहींत निपजला नाहीं, तेणेंकरून औरंगजेबाचा मतलब सिद्धीस गेला. वास्तविक औरंगजेबाच्या मृत्यूनें मोठीच संधि मराठ्यांस आलेली होती. पंचवीस वर्षें लढाईचा व मुत्सद्देगिरीचा चांगला अनुभव मिळून लोक तयार झाले होते. बादशहावर विजय संपादून त्यांचा प्रत्यक्ष हुरूप वाढलेला होता. बादशाहींतिल गादीच्या तंट्यांचा फायदा घेऊन सर्व हिंदुस्थानभर आपलें राज्य वाढविण्याची योग्य संधि मराठ्यांस त्या वेळीं आली होती; आणि सर्व मराठी फौजा जोरानें बाहेर पडल्या तर दिल्लीपद काबीज करण्यास त्यांस अवकाश लागला नसता. सय्यदांचे

वेळेस थोड्याशा फौजेनिशीं बाळाजी विश्वनाथानें केलेली कामगिरी मनांत आणिली ह्मणजे वरील गोष्ट अशक्य होती असें वाटत नाहीं. बाजीरावानें ती सिद्ध करून दाखविलीच.

**२. रांगण्यावरील मोहीम** ( सन १७०९-१० ).-सन १७०८ सालीं जानेवारींत राज्याभिषेक झाल्याबरोबर शाहूचें लक्ष शहाजाद्यांच्या युद्धाकडे वेधलें. फेब्रुवारींत कामबक्षाचा पराभव होऊन त्याचा निकाल लागला. त्यानंतर नवीन बादशहापासून सरदेशमुखीच्या वगैरे सनदा मिळविण्याच्या भानगडींत शाहूचे कांहीं दिवस गेले. वजीर मुन्यिमखान स. १७११ त वारला तेव्हां झुल्फिकारखानाच्या मार्फत बादशहाकडे शाहूचा वशिला चांगला जुळल्यामुळें मराठमंडळांत त्याची प्रतिष्ठा बरीच वाढली. ताराबाईशीं लढल्याशिवाय सनदा मिळत नाहींत अशी पंचाईत पडतांच तो फौज जमविण्याच्या उद्योगास लागला. आरंभापासूनच सरदार लोकांस आपापल्या बाजूस वळविण्याच्या खटपटी शाहू व शिवाजी यांच्या कसकशा चालल्या होत्या हें रा. खं ८ ले. ६३-६६ यांजवरून दिसून येतें. रामचंद्रपंताचा वडील भाऊ नारोपंत ह्मणून होता. त्यास शाहूमहाराजाकडे येण्याची इच्छा झाली, आणि शाहूनें त्यास आपल्याकडे येऊन मिळण्याविषयीं पत्र लिहिलें ( मार्च २९ स. १७०८ ); परंतु रामचंद्रपंतानें आपल्या बंधूचा वेळींच बंदोबस्त केला असें दिसतें. उलट धनाजी जाधव, परशुराम त्रिंबक व खंडोबल्लाळ यांस आपल्याकडे येऊन मिळण्याविषयीं शिवाजीनें पत्रें लिहून उद्योग चालविला होता. अशा रीतीनें उद्योग करून शाहूनें सन १७०८ च्या पावसाळ्यांत चंदनवंदन खालीं बरीच फौज जमविली होती. साधेल तिकडून तो आपली तयारी चांगली करीत होता. मुंबईचा प्रेसिडेंट सर निकोलस वेट याजकडे अर्जकरून त्यानें पैसा, दारूगोळा, तोफा व लष्कर मागितलें. पण ही त्याची विनंति प्रेसिडेंटानें मान्य केली नाहीं. [ ग्रँड. १-३४४ ] सन १७०८ चा दसरा झाल्या-

वर त्यानें ताराबाईवर मोहीम सुरू केली. या पहिल्या मोहिमेंत त्यास विशेष यश आलें नाहीं. एक वर्ष असेंच फुकट गेल्यावर पुनः स. १७०९ त त्यानें ताराबाईवर चाल केली. ताराबाई पन्हाळ्यास होती. शाहू वसंतगड काबीज करून पुढें चाल करून येतांच, ती पन्हाळा सोडून रांगण्यावर गेली. पन्हाळ्यास वेढा घालून शाहूनें किल्ला काबीज केला; हवालदार शरण आला, त्यासच त्यानें किल्ल्याच्या बंदोबस्तास नेमिलें. पावनगडही काबीज केला. पुढें परशुराम त्रिंबकाच्या कारभाऱ्यानें विशाळगडही शाहूच्या स्वाधीन केला. कोल्हापुरीं ठाणें बसवून शाहूनें रांगण्यावर चाल केली, तेव्हां ताराबाईनें वाडीकर खेमसांवंत व कान्होजी आंगरे यांस रांगण्याचा बचाव करण्यास बोलाविलें. शाहूनें किल्ल्यास वेढा घातला. हल्ला करून किल्ला घेण्याचा हुकूम सोडून स्वतः शाहू फौजेबरोबर घोडयावर बसून डोंगर चढत असतां, घोडयाचा पाय अकस्मात् घसरला. खंडोबल्लाळ चिटणीस नजीक होता. त्यानें एका झाडाला आपल्या पायाचा नेट देऊन घोडा ओढून धरिला, आणि शेखमिरा जवळ होता, त्यानें शाहूस एकदम खालीं ओढून घेतलें. याप्रमाणें आपला जीव वांचविल्याबद्दल शाहूनें पुढें दोघांसही कायमचीं इनामें करून दिलीं. शाहूपुढें आपला निभाव लागत नाहींसें पाहून, रामचंद्रपंतानें ताराबाईस व दोघां राजपुत्रांस चोरवाटेनें किल्ल्यांतून बाहेर काढून मालवणाकडे लावून दिलें, आणि सेनापति पिराजी घोरपडे, संताजीचा मुलगा, व त्याचा मदतनीस नारोपंत, यांसह आपण आंत राहून कित्येक महिनेपर्यंत किल्ला झुंजविला. शेवटीं रांगणा किल्ला पडण्याच्या बेतांत आला, तेव्हां वेढा उठवून महाराजांस घेऊन परत जाण्याविषयीं रामचंद्रपंतानें धनाजीस विनंति केली. त्यावरून पावसाळा जवळ आलासें पाहून धनाजीनें शाहूची समजूत घालून सर्व लष्करासह परत कूच करविलें. ( इचलकरंजीचा इ०—खरे ). वाटेंत विशाळगडचा अधिकारी निळो बल्लाळ ( खंडोबल्लाळचा भाऊ ) याजला भेटीस

बोलावून कोल्हापूरकडील जिंकलेल्या मुलखाची व्यवस्था शाहूनें त्याजकडे सांगितली; आणि आपण परत साताऱ्यास आला. दोन वर्षें खटपट करून शाहूस ह्मणण्यासारखें यश आलें नाहीं. शाहूच्या अंगीं तडफ नव्हती. त्याचा शांतताप्रिय व नेभळा स्वभाव ठिकठिकाणीं दृगोचर होतो; यामुळेंच त्याचें नुकसान झालें. त्याचा सेनापति धनाजी जाधव ह्याच्या अंगींही आतां पहिली धमक राहिली नव्हती. सारांश, शाहूस आणखी बरेच दिवस असेच संकटांत काढावे लागले.

या रांगण्यावरील मोहिमेंत ताराबाईलाही आपल्या दुर्बल परिस्थितीची जाणीव उत्पन्न झाली. शाहू साताऱ्यास गेल्यावर ती वाडीकर सांवताची कुमक घेऊन मालवणाहून रांगण्यास आली. पन्हाळ्यास पूर्वींचाच हवालदार शाहूनें कायम केला होता. त्याजशीं पुनः भेद करून ताराबाईनें पन्हाळा घेतला; आणि आपण रांगण्याहून तेथें येऊन राहिली. पन्हाळ्यास आल्यावर सारें मराठी राज्य हस्तगत करण्याचा नाद सोडून रामचंद्रपंताच्या सल्ल्यानें कोल्हापूर हेंच आपलें संस्थान करून राहण्याचा तिनें निश्चय केला. (मोडककृत कोल्हापूरचा इ.). अशी योजना करण्यास आणखी एक कारण झालें. झुल्फिकारखानाकडे दक्षिणची सुभेदारी होती. परंतु बादशहानें त्यास दिल्लीस नेलें. तेव्हां त्याचा दुय्यम म्हणून दाऊदखान पन्नी याची दक्षिणच्या कारभारावर नेमणूक झाली. शिवाय ब्ऱ्हाणपूरच्या सुभ्याचें कामही त्यालाच सांगण्यांत आलें. मराठे सरदार शाहूच्या नांवानें मोगलांच्या प्रदेशांत धामधूम करीत होते, त्यांचा बंदोबस्त करण्याकरितां, दाऊदखानानें, चौथाईचा वसूल आपण होऊन तुह्मांस देतों, असा करार करून दिला. दाऊदखान सर्व मराठे सरदारांस चांगल्या तऱ्हेनें ओळखीत होता, त्यामुळें हा करार बऱ्याच अंशीं उभयतांसही फायदेशीर झाला. अर्थात् आपली कायमची राज्याची जागा ठरविणें यापुढें ताराबाईस जरूर पडलें. ताराबाईच्या पक्षाकडे रामचंद्रपंताची खटपट अगदीं कसून

चालली होती. आरंभीं जरी शाहूच्याविरूद्ध वागणें त्याच्या जिवावर आलें, आणि ताराबाईस त्यानें तसें स्पष्ट सांगितलेंही, तरी एकदां उघड युद्ध सुरू झाल्यावर मग घेतलेल्या पक्षाची तड पोंचविणें त्यास भाग पडलें. रांगण्याकडे असतां वाडीच्या खेमसांवतास त्यानें ताराबाईच्या पक्षांत आणिलें. शाहूस बादशहाकडून चौथाईच्या सनदा न मिळण्याची सर्व खटपट रामचंद्रपंताचीच होती. रा. राजवाडे यांच्या आठव्या खंडांतील स. १७०७ पासून स. १७१८–१९ पावेतोंचे सर्व कागद लक्षपूर्वक वाचले असतां ताराबाईची बाजू चांगली समजून येईल. शाहू रांगण्याकडे असतां, पंतानें सातारा किल्ला बहुतेक काबीज करण्याचा योग आणिला होता. या संबंधांत ताराबाईनें पंतास लिहिलेलें पत्र ता. २७ फेब्रूवारी स. १७११ चें अवश्य वाचण्यालायक आहे. ( खं. ८--६८ ) पंत रांगण्यावर असतां हें पत्र लिहिलें असल्याचा त्यांत उल्लेख असल्यामुळें तें बहुधा स. १७०९--१० सालचें असावें. केसो त्रिमल पिंगळे, सचिव, वाकनीस, रायाजी मल्हार, सुभानजी आटोळे वगैरे अनेक सरदारांस नानातऱ्हेच्या लालुची व वचनें रामचंद्रपंतानें देऊं करून शाहूच्या पक्षांतून फोडिलें. ताराबाई म्हणते, 'ही गोष्ट संपादिली म्हणजे थोर कार्य झालें, शाहूराजे याची कंबरच मोडून हतप्रभ होऊन जातात;' तथापि पंताचें मन तिच्याबद्दल इतकें कचरे कीं, 'तुह्मी घडीघडी मनांत संदेह मानावा हे गोष्टी उचित नाहीं. येविशीं आह्मीं उदंड सांगितलें अगर लिहिलें, तें तुह्मांस प्रमाण वाटतें ऐसें नाहीं. याउपरी निःसंदेह होऊन राज्याभिवृद्धीस प्रवर्तोन संतोष पावणें. आह्मांस तुह्मांपेक्षां दुसरें वयस्क नाहीं. सर्व राज्यभार तुह्मांवर टाकिला आहे.' असे ताराबाईचे उद्गार त्याच पत्रांत आहेत.

हें युद्ध दोन तीन वर्षें चालल्यावर पन्हाळा व कोल्हापूर येथें ताराबाईचें व सातारा किल्यावर शाहूचें वास्तव्य होऊन दोनही पक्ष आपापल्या टापूंत वावरूं लागले. विशेष तीव्र द्वेषभाव तूर्त बंद पडला.

आणि प्रसंग पडेल त्याप्रमाणें वर्तणूक करून जो तो वेळ मारून नेत होता. प्रत्यक्ष युद्धापेक्षां खटपटी व कारस्थानें मात्र दोनही बाजूंनीं जोरांत चालू होतीं. कोल्हापूरच्या हद्दींतच सावंतवाडी, रांगणा वगैरे ठिकाणें असून वाडीचे सावंत तेथें ताराबाईचा अमल चालूं देत नसत; सबब कृष्णाजी भास्कर वगैरे सरदारांबरोबर फौजा पाठवून व कित्येक प्रसंगीं कान्होजी आंगऱ्याची मदत घेऊन रामचंद्रपंतानें सावंतास नरम केलें आणि त्याजपासून अनुकूल तह करून घेतला. याकारणानें शाहूलाही पुढें आंगरे व सावंत यांजवर शस्त्र धरावें लागलें. ह्या वेळेस त्यानें आपलीं आणखी दोन लग्नें केलीं. एक मोहित्यांची कन्या सगुणाबाई आणि दुसरी राणोजी शिर्क्यांची कन्या सकवारबाई. शिंद्यांची कन्या सावित्रीबाई व जाधवांची कन्या राजसबाई ( अंबिकाबाई ) या त्याच्या पहिल्या दोन बायका व आई येसूबाई अद्यापि दिल्लीस होत्या. त्यांपैकीं सावित्रीबाई नुकतीच तिकडे वारली. सगुणाबाई सालस व सुस्वभावी होती. तिजवर शाहूचें प्रेम विशेष असे. तथापि राख विरूबाई हिचेंच वजन शाहूपाशीं पुष्कळ असून तिचीच देखरेख लहान राण्यांवर व घरांतील कारभारावर असे.

३. **धनाजी जाधवाचा मृत्यु** ( मे, जून सन १७१० )—रांगण्यावरील मोहिमेवरून परत येत असतां, वारणातीरीं वडगांव येथें, सेनापति धनाजी जाधव मृत्यु पावला. त्याचे पायास जखमेचा व्रण होता, तो विकोपास जाऊन त्याचा अंत झाला. धनाजीची बायको गोपिकाबाई इनें सहगमन केलें. त्या प्रसंगीं धनाजीचे तिघेही मुलगे, वडील बायकोचा संताजी व धाकटीचे चंद्रसेन व शंभुसिंग असे जवळ होते. धनाजीची स्मशान यात्रा फार मोठी होऊन, त्याचा अंत्यविधि मोठ्या बहुमानानें करण्यांत आला. त्या प्रसंगीं भूमिदान केल्याची सनद चंद्र २ जमादिलावर शके १६३२ ची उपलब्ध आहे, ( दळवीकृत जाधव घराण्याची कै. पृ. ७१), ती खरी असल्यास धनाजीच्या मृत्यूची मिति सन १७१० चा

मे जून अशी ठरते. मरणसमयीं धनाजी शाहूच्या जवळ नव्हता. धनाजीस तीन मुलगे होते. वडील संताजी पहिल्या बायकोचा व दुसऱ्या बायकोचे चंद्रसेन आणि शंभुसिंग. संताजी तामसी असून बापापासून अलग, साताऱ्यानजीक बोरगांव पाडळी येथें वडिलोपार्जित वतनावर राहत असे. चंद्रसेन बापाचा आवडता होता, त्यासच शाहूनें सेनापतिपद व यथापद्धति बहुमानवस्त्रें, जरीपटका वगैरे साताऱ्याहून पाठवून दिलीं; आणि शंभुसिंग यांस चंद्रसेनाचा मुतालिक नेमिलें.

आजपर्यंत राज्याचीं मोठमोठीं कामें केलेला, शिवाजीची शिस्त पाहिलेला हा वृद्ध व अनुभवी पुरुष गेल्यानें शाहूच्या पक्षाचें पुष्कळ नुकसान झालें. त्याच्या कर्तबगारीचें विवेचन पूर्वीं आलेंच आहे. शौर्य व एकनिष्ठपणा हे त्याच्या अंगचे मोठे गुण होत. त्याजविषयीं ताराबाई म्हणतेः—

'जाधवराव कैलासवासी स्वामींचे संपूर्ण कृपेस पात्र झाले, ते आपल्या कर्तृत्वारी व हुकूम-बारदार एकनिष्ठेवरी झाले. राज्याभिवृद्धीविषयीं त्यांहीं कांहीं सामान्य कसाला, श्रमसाहस केला नाहीं. जीविताची तमा न धरितां स्वामिकार्यींच तत्पर राहून, कैलासवासी स्वामींनीं जे समयीं हुकूम केला, ते समयीं कर्नाटकांत फौजांनीं धावून जाऊन, प्राप्त झालीं संकटें निरसन करून, स्वामिगौरवाचें सुख त्यांहींच अनुभाविलें व सेवा धर्मेंकरून त्यांहींच कैलासवासी स्वामींस संतुष्टविलें. तेव्हां स्वामींस मशारनिल्हेविना दुसरे प्रिय कीं प्राण (कोणी) होते असें नाहीं. सर्व प्रकारें कार्यास येतील हा भरवंसा दृढ मनीं मानिला होता. तदनुरूपच राव मशारनिल्हेनीं स्वामींचे चरणीं चित्तालय करून, औरंगजेबासारखा मोठा शत्रु राज्यांत पसरला असतां, आपल्या शूरत्वाच्या व कर्तेपणाच्या योगें, शत्रूचा हिसाब न धरितां, राज्याचे संरक्षणार्थ असाधारण कसला केला! स्वामींच्या तपोबलप्रभावें करून शत्रु पराभव पाविल्याचें यश मशारनिल्हेस प्राप्त झालें.' (भा. व. पु. १ प. या. ५०).

धनाजीनें खेडच्या लढाईत शाहूचा पक्ष स्वीकारिला ही त्याची चूक होय, असें पेशव्यांचे विरोधी लोक प्रतिपादन करितात. शाहूस पाठबळ न मिळून ताराबाईचा पक्ष वर आला असता तर मराठीशाहीचें चिरंतन कल्याण झालें असतें, असा यांचा भाव आहे. परंतु ताराबाई, राजसबाई, शिवाजी व संभाजी यांपैकीं एकाच्याही अंगीं मराठमंडळावर वजन बसवून राज्याचें काम करण्याचें सामर्थ्य शाहूच्या इतकें नव्हतें, असें पुढील इतिहासावरून कोणासही दिसेल. तत्कालीन स्थितीच्या मानानें सर्वांत योग्य असा जो शाहू तोच शेवटपर्यंत चढाओढींत टिकला, आणि मराठयांच्या अंगीं पराकाष्ठेची म्हणून जी काय कर्तबगारी होती ती शाहूच्या द्वारें पुढें प्रगट झाली. शिवाय वडीलकीचा मानही शाहूकडेच होता. हा भाव ओळखूनच धनाजीनें राष्ट्रहिताचा योग्य पंथ आरंभींच स्वीकारिला, असें म्हणावें लागतें.

धनाजीचा मृत्यु हीच बाळाजी विश्वनाथास पुढें येण्याची संधि होय. कदाचित् हा योग अगोदरच ठरून चुकला होता. धनाजी जाधव शाहूला भारी डोईजड झाला होता, ही गोष्ट खालील उताऱ्या वरून व्यक्त होते; आणि हा डोईजडपणा नाहींसा करण्यास शाहूला बाळाजी विश्वनाथाची मदत झाली असें अनुमान होतें. 'परगणे मसूर सत्तावन गांवची देशमुखी महादाजी बिन मुलतानजी जगदळे देशमुख याची पुरातन पिढी दरपिढी चालत आली आहे. ऐशीयास, महाराज छत्रपति स्वामीयांचें आगमन याप्रांतें झालें, ते आळंदीच्या तलावरी आले. इकडून जाधवराव सेनापति भेटीस गेले. बराबर यादव घेऊन गेले. जाधवराव राजश्रीस भेटले ते समयीं यादवानीं जाधवरावासी मसलत दिली कीं, कऱ्हाडची देशमुखी आपली आहे. आपण तुह्मांस चौथी तकसीम देऊं. तुम्ही राजश्रीपाशीं सनद करून घेणें. समय हाच आहे. याउपरी जाधवरायांनीं रदबदली केली कीं कऱ्हाडची देशमुखी यादवास देणें, यादवाची आहे. राजश्री बोलिले

कीं 'कऱ्हाडची देशमुखी आमची आहे. यादव कोण होताती! तेव्हां रद-बदली तैसीच राहिली.' अशी पुष्कळ प्रसंगीं जाधवरावांनें स्वतः व इतर थोर थोर मंडळीकडून शाहूस भीड घातली. यादवाच्या नांवच्या सनदाही तयार करून आणिल्या. संवत्सर प्रतिपदेच्या दिवशीं सनदेवर शिक्के करून देऊं असें शाहूनें कळविलें. परंतु त्या दिवशीं महादाजी जगदाळे यानें येऊन शाहूस अर्ज केला कीं 'मसूरपरगणियाच्या जाधवराऊ गैर न्यायें जोरावारीनें यादव पाठीसीं घालून सनदा करून घेतात. त्यास राजे बोलिले कीं कऱ्हाडची देशमुखी आपली आहे, यादवास देत नाहीं. मसूरची तर तुझी आहे हेही आपल्याच्यानें देववत› नाहीं. तूं कांहीं चिंता न करणें. मग भगीरथ चोपदार बोलावला. त्यास सांगितलें, कीं बाळाजी विश्वनाथ मुतालिक पंतअमात्य व पंताजीपंत, मुतालिक पंतसचिव, यांसीं जाऊन सांगणें कीं आपणास विचारल्याविरहित देशमुखीच्या सनदा न देणें. तसेंच गदाधर भट्टाचे हस्तक यादव गोपाळ यांस सांगून पाठविलें कीं, तुम्ही सनदा सिक्के करावयासी आणाल तरी आपण सिक्के न करीं. सिक्के तैसेच ठेवणें. हें वर्तमान जाधवरावाशीं कळलें. ते खुद्द कचेरीत आले. कचेरीहून रा. गदाधरभट्ट, नारसेणवी व राघो काकाजी राजश्रीकडे खलबतखान्यांत पाठविलें कीं आज प्रतिपदेचा मुहूर्त आहे, [ सुमारें २२ मार्च १७०८ ]. सनदेवरी सिक्के करून देणें. त्यासी राजश्री बोलले कीं तुह्मीं यादवाचे नांवें सनदा लिहिल्या आहेत तरी आपण सिक्के करीत नाहीं. यादव पुरातन जाहले तेव्हां आपण त्याचे मुतालिक कीं काय! कऱ्हाडची देशमुखी आपली आहे. मसूरची देशमुखी तर जगदाळ्याची आहे, आणि तुह्मी अतिशय किरतां. तरी तुह्मी खुद्द आपल्या नांवें सनदा करून घेणें, त्यावरी सिक्के करून देतों, या सनदेवरी सिक्के करून देत नाहीं. तुह्मींच आपले मनीं समजणें. जें देणें तें न्यायें करून द्यावें लागतें. तरी तुह्मी जाऊन जाधवरायासी समजावून सांगणें.

ऐसें न होय कीं रागावरी नव जात. ऐसे तजविजीनें सांगणें. मग भार-सेणवी व राघो काकाजी यांनीं जाऊन जाधवरायासीं वर्तमान सांगितलें. त्या-वरून जाधवराऊ रागें आण घेऊन बोलिले, कीं आपलें एवढें काम होत नाहीं, तेव्हां आपण चाकरी करीत नाहीं. ह्मणोन उठोन आपल्या डेऱ्यासीं गेले. त्या उपरी रुसून घरीं बैसले. कारभार अवघा तटला. मग जाधव-रायाच्या डेरियासि राजश्री गेले. जाधवरायाची समजावीस केली. घोडा १ दिल्हा. कित्तेक सरदारांनींही जाधवरायासी सांगितलें, तेंहि ऐकिलें नाहीं. अड घातली कीं जरी सनदा करून द्याल तरी आपण चाकरी करीन. राजश्री बोलिले कीं आपणास संकट प्राप्त जाहलें. आजी सनदा करून देत नाहीं. तेव्हां हा मूरख जैसा गेला तैसेच हे निघोन जातील, ह्मणजे अवघें काम दरकम होईल. ऐसे जाणोन वेळावरी नजर देऊन जाधवरा-याच्या भिडेनें सनद करून जाधवरायासी दिली. हें काम अडून जाहलें. कांहीं पचायत अगर इनसाफ जाहला नाहीं. छत्रपति साहेबांस संकट घा-लून अतिशय करून पाटे गांवींचे मुक्कामीं रुसवा करून सनद करून घेतली.' [खं. १५ ले. ५९]. धनाजी जाधव पुढें लवकरच मरण पावला, तरी जगदाळ्यांचा तंटा कांहीं काळ चालुच होता. यावरून जाधवाचा डोईजडपणा शाहूस दुःसह होऊन तो मोडण्यासाठींच शाहूनें बाळाजीस हाताशीं धरिलें, असा निष्कर्ष निघतो.

मसूरच्या देशमुखी संबंधाचा जगदाळे व यादव यांचा हा तीव्र झगडा खंड १५ ले. १२–५९ व म. रि. पृं. ६२९) शाहू दक्षिणेंत दाखल झा-ल्याबरोबर ह्मणजे शके १६३० च्या वर्षप्रतिपदेस त्याजपुढें आला, (२२ मार्च १७०८). त्या वेळीं बाळाजी विश्वनाथ अमात्याचा मुतालिक असून, त्याच्या सल्ल्यानें शाहू वर्तत होता, असा उल्लेख वरील निवाडपत्रांत आहे. वृत्ति व वतन यासंबंधानें मराठ्यांची आसक्ति केवढी जबरदस्त होती हें अशा कागदांवरून निदर्शनास येतें. धनाजीच्या आग्रहानें वतनाचा उच्छेद

होऊं लागला तो शाहूस न खपून, त्यानें धनाजीसही फांटा देण्याचा मनांत निश्चय केला. पुढील हकीकत सांगण्यापूर्वी बाळाजीची पूर्व हकीकत देणें जरूर आहे.

**४ बाळाजी विश्वनाथ, पूर्वपीठिका.**—मराठशाहीच्या पूर्वार्धाच्या इतिहासांत भोसले कुलास प्राधान्य आहे, त्याप्रमाणें उत्तरार्धाच्या इतिहासांत भट कुलांस प्राधान्य आलेलें आहे. भोसल्यांच्या कर्तृत्वशक्तीनें अनेक क्षत्रिय व इतर जातींचीं कुलें प्रसिद्धीस आलीं, त्याप्रमाणें भट घराण्याच्या कर्तबगारीनें मुख्यतः पुष्कळशीं ब्राह्मणकुलें उत्तरकालीन मराठशाहींत लौकिकास चढलीं.

कोंकणांतील मंडळीचा उद्योगाकरितां वरघाटीं जाण्याचा प्रघात पुष्कळ प्राचीन आहे. तत्राप शिवाजीचें राज्य स्थापन होतांच त्याचें गोब्राह्मण प्रतिपालनाचें ब्रीद ऐकून, कोंकणांतले ब्राह्मण देवस्थानांच्या वगैरे संबंधानें धर्मादाय व वृत्ति संपादण्याकरितां देशावर येऊं लागले. आरंभीं त्यांचा उद्योग धर्मादाय मिळविण्यापुरताच होता. पण बुद्धिमत्तेमुळें हळू हळू त्यांचा प्रवेश राज्यकारभारांत होऊं लागला. राजारामाच्या वेळेपासून अशा उद्योगास अवकाश मिळतांच ते विशेष पुढें आले. आंगरे व सीदी यांच्या चुरशींत बऱ्याचशा कोंकणस्थ ब्राह्मणांस मुद्दाम राज्यकारस्थानांत पडावें लागलें; आणि एकाच्या अनुकरणानें दुसरा पुढें आला. पंधरा वीस वर्षांत घांटावरील देशस्थ ब्राह्मणांस नवीन कोंकणस्थ मंडळींनीं मागें टाकिलें. प्रल्हाद निराजी, हणमंते, पिंगळे, रामचंद्रपंत अमात्य, परशुरामपंत प्रतिनिधि यांच्या घराण्यांचें माहात्म्य कमी होऊन कित्येक कोंकणस्थ ब्राह्मणांचें वाढूं लागलें. वास्तविक हा जातीचा प्रश्न नव्हता. ज्यास जशी बुद्धि व संधि प्राप्त झाली, तसा त्याचा उदय झाला.

भट हें आडनांव कोंकणस्थ ब्राह्मणांत आहे. बाळाजी विश्वनाथ भट यांचें घराणें कित्येक शतकांपासून पश्चिम किनाऱ्यावर श्रीवर्धन येथें नांदत

होतें. या घराण्याकडे श्रीवर्धन परगण्याची देशमुखी असल्यामुळें, "त्यांस देसाई किंवा देशमुख असें म्हणत. बाळाजी विश्वनाथ, बाजीराव, बाळाजी बाजीराव व रघुनाथराव हे सर्व आपणांस श्रीवर्धनचे देशमुख म्हणवून घेण्यांत मोठें भूषण मानीत. महाराष्ट्रांतील लोकांची आपल्या वडिलोपार्जित वतनांवर केवढी आसक्ति असते हें मागें सांगण्यांत आलेंच आहे. तीच आसक्ति श्रीवर्धन येथील मूळच्या वतनावर या पेशव्यांची होती.

मुंबईच्या दक्षिणेस समुद्रकिनाऱ्यावर बाणकोट खाडीच्या उत्तरतीरीं हरिहरेश्वर व श्रीवर्धन हे प्रसिद्ध गांव आहेत. हे गांव हबशाच्या ताब्यांत असून तेथें हें भट घराणें पूर्वापार नांदत होतें. या दोन गांवांवर भट घराण्याची पराकाष्ठेची भक्ति असे. त्यांवरचा अंमल जरी हबशाकडे होता, तरी उत्तर मराठशाहींत पेशव्यांचीच सत्ता तेथें प्रमुख होती. श्रीवर्धन गांवांतील सोमजाई, लक्ष्मीनारायण, बहिरी, काळेश्री वगैरे सर्व देवतांना नैवेद्य वगैरेची व्यवस्था पुढें पेशव्यांकडूनच झाली. तेथील ब्राह्मणांना पेशव्यांकडून दरसाल साडेबत्तीस खंडी भात धर्मादाय पोंचत असे. ग्रामपंचायतींत हे पेशवे देशमुख या नात्यानें भाग घेत असत, आणि देशमुखीच्या गांवांत यत्किंचित् कमी ज्यास्ती झालें तर त्याची वर्दी ताबडतोब त्यांजकडे जाई. तेथील आपली देशमुखी चालविण्यास पेशव्यांनीं आपला एक प्रतिनिधि ठेविला होता. ( भा. इ. सं. मं. संमेलनवृत्त, श. १८३७ पृ० ८५ व इ. वृ. पृ० १८३७ ले. ४५. )

मुसलमानी अंमलापूर्वी ब्राह्मणांकडे देशमुख्या नव्हत्या असें रा. राजवाडे म्हणतात. देशमुखी म्हणजे लष्करी व फौजदारी अधिकार. ग्रामाचें संरक्षण करण्याचें काम पाटलाचें, तसें देशाचें संरक्षण करण्याचें काम देशमुखाचें. लढाईच्या प्रसंगीं पाटलानें व देशमुखानें राजाला अमुक सैनिक पुरवावे असे तह ह्मणजे करार असत. मुसलमानी अंमलांत वतनाच्या घालमेली झाल्या, त्यांत मराठे पाटील व मराठे देशमुख स्थानभ्रष्ट होऊन

रिकाम्या झालेल्या देशमुख्या ब्राह्मणादिकांच्या हातांत पडल्या. त्याप्रमाणें दंडाराजपुरीची देशमुखी स. १४७८ च्या सुमारास भटांच्या घराण्यांत आली. त्यानंतर सुमारें शंभर वर्षांनीं म्हणजे स. १५७५ च्या सुमारास बाळाजी विश्वनाथाच्या पूर्वींचा चौथा पुरुष महादाजी हा देशमुखीवर होता. ही देशमुखी दुसऱ्या बाजीरावाच्या कारभारापर्यंत म्हणजे स. १८१८ पावेतों भट घराण्याकडे होती.

रा. राजवाडे ह्मणतात.—'भटांच्या घराण्यांत दंडाराजपुरी प्रांताची देशमुखी शके १४०० पासून शके १६०० पावेतों अव्याहत चालली होती. शके १६०१ च्या आगेंमागें जानो विश्वनाथ भट याजवर हबशाची इतराजी होऊन तो प्राणांस मुकला. तेव्हां देशमुखी व हबशाचें राज्य सोडून भट घराणें मराठी राज्यांत निघून गेलें. नंतर म्ह० सन १६७९ पासून १७१० पावेतों भटांनीं देशमुखी परत मिळविण्याचा प्रयत्न केला नाहीं. या बत्तीस वर्षांत बाळाजी विश्वनाथाचे बंधु दिवंगत होऊन, तो व घरांतील कांहीं बाया व मुलेंबाळें अशीं कांहीं दिवस कोंकणांत दाभोळ, चिपळूण, अंजनवेल वगैरे ठिकाणीं राहून, नंतर सुमारें तीस वर्षें वरघांटीं होतीं. कोंकणांतून निघण्याच्या वेळीं बाळाजी चांगला कर्ता सवरता पुरुष असून, त्याचें वय पंचविशीच्या सुमाराचें होतें. तत्कालीन रिवाजाप्रमाणें बाळाजीचें लग्न होऊन त्या वेळीं बारा पंधरा वर्षें झालीं असलीं पाहिजेत. देशावर आल्यानंतर डुबेरकर बर्वे घराण्यांतील राधाबाईशीं बाळाजीचा द्वितीय विवाह स० १६६२ चे सुमारास झाला असें दिसतें. तदनंतर बाजीराव ( स. १६८६ ) चिमाजी आपा ( १६९० ) व अनुबाई ( स. १६९४ ) अशीं तीन मुलें त्यास झालीं.' स. १६७९–१६८८ च्या काळांत बाळाजी विशेष प्रसिद्धीस आला नव्हता, त्यापूर्वी हीं मुलें झालीं असें राजवाडे लिहितात. ( भा. इ. सं. मं. इ. वृ. १८३७ ले. ४५ ). या लिहिण्यांत कल्पनाशक्तीवर विशेष भिस्त ठेवलेली आहे.

( बाळाजीच्या पूर्ववंशाची यादी. )
महादाजीपंत भट, देशमुख मामले दंडाराजपुरी.
नारो महादेव
शिवाजी महादेव.
( अंताजी पंत ? )
महादाजी ऊ० बाबाजी पंत
कृष्णाजी
अंताजी
विसाजी
नारोपंत
आबाजी पंत
त्रिंबक पंत
महादाजी पंत
विठोजी
आबाजीपंत
नारोपंत
अंताजी
नारोपंत
रामराव
त्रिंबकराव
[ सध्यां कोंकणांत तळें येथें. ]
रुद्राजी
जानोजी
बाळाजी
विठ्ठल
( महादास
कारखाननीस )
विसाजी ऊ० बाजीराव
अंताजी ऊ० चिमाजी आपा.

अनुबाईचें लग्न सन १७१३ त झालें, तेव्हां ती ७।८ वर्षांची होती, असें रा. खरे यांचें विधान आहे, ( इचलकरंजीचा इ. पृ. २७ ). रा. राजवाड्यांच्या अनुमानानें स. १७१३ त लग्नसमयीं ती १९ वर्षांची ठरते, हें संभवनीय नाहीं.

एवढ्या पराक्रमी पेशव्यांनीं आपल्या घराण्याची पूर्वींची माहिती लिहून ठेविली नाहीं, अथवा लिहून ठेविली असली तरी ती आज उपलब्ध नाहीं, ही खेदाची गोष्ट होय. अनेक इतिहासभक्तांच्या श्रमानें अशी माहिती जुळविण्याचा बराच खटाटोप अलीकडे झाला असून, अद्याप तींत पुष्कळशी न्यूनता आहे. सामान्य समज असा आहे कीं, हबशाच्या जाचानें बाळाजी विश्वनाथानें देशत्याग करून शिवछत्रपतीच्या राज्यांत काम पत्करलें. कालांतरानें धनाजी जाधव सेनापति याच्या दिमतीस वसुलाच्या कामावर बाळाजी होता. पुढें शाहूच्या आगमनप्रसंगीं बाळाजीनें धनाजीचें मन वळवून त्याजकडून शाहूस पाठबळ देवविलें. तेणेंकरून शाहूची मर्जी बाळाजीवर बसली.

पेशव्यांचे तीर्थोपाध्ये नाशिकचे हिंगणे यांच्या चोपड्यांत विठ्ठलपंत व बाळाजी विश्वनाथाची स्त्री राधाबाई यांचे स्वहस्ताक्षराचे लेख उपलब्ध झाले आहेत. त्यांतील विठ्ठलपंताचा लेख श. १६०१ म्ह. स. १६७९ चा आहे. रा. ब. साने यांस मिळालेल्या एका शकावलींत बाळाजीचा बाप व आजा घांटावर जाऊन शिवछत्रपतीचे पदरीं नोकरी करीत होते असा उल्लेख आहे, तो खरा असण्याचा संभव दिसतो. शिवाजी व हबशी यांचें वैर असून, शिवाजीचा पराक्रम ऐकून बाळाजीचे पूर्वज त्याजकडे गेले असावे. निदान शिवाजीच्या वेळेपासून मराठशाहीचीं धोरणें व एकंदर कारस्थानें बाळाजी विश्वनाथास चांगलींच ठाऊक असून, त्याच्या कर्तबगारीसंबंधानें शाहूस व त्याच्या सरदारांस चांगली खात्री असल्याशिवाय त्यास शाहूनें एकदम मोठे कामावर नेमणें संभवत नाहीं.

कोंकणांत पूर्वी प्रभूंचीं कुटुंबें प्रमुख होतीं; आणि लिहिण्याच्या हिशेबाच्या, व शिपाईगिरीच्या कामांत शिवाजीनें त्यांचा चांगलाच उपयोग करून घेतला. प्रभूंचें उदाहरण पाहून व मराठी राज्याच्या एकंदर धोरणास अनुसरून, कोंकणस्थ ब्राह्मणांसही देशावर येऊन राज्यकारभारांत नांव काढण्याची ईर्षा उत्पन्न झाली; आणि पेशवे जसे बाहेर येऊन पुढें सरसावूं लागले, तसे त्यांचे आप्त व स्नेही वगैरे दुसरीं पुष्कळ कुटुंबें त्यांच्या अनुषंगानें मराठशाहीच्या कारभारांत दाखल झालीं.

हबशाच्या राज्यांत ब्राह्मणांचा छळ किती होत असे याचें वर्णन पहिल्या भागांत आलेंच आहे. गोब्राह्मण प्रतिपालक शिवाजीला चिडविण्याचें हबशांचें तें एक नेहमींचें साधन होतें. बाळाजीच्या घराण्यास प्रत्यक्ष जाच किती व काय झाला याची हकीकत दंतकथेपलीकडे उपलब्ध नाहीं. बाळाजीचा वडील भाऊ जानोजी हा देशमुखीवर असून बाळाजी हा चिपळूण येथें जकात वसुलीच्या कामावर होता. आंगरे व सीदी यांचें वांकडें असून सीदीचा पाडाव करणें हेंच आंगऱ्यांचें मुख्य काम होतें. त्या कामांत निरनिराळ्या ठिकाणच्या सीदीच्या नोकरांस वश करून आपणाकडे घेण्याचा आंगऱ्यांचा प्रयत्न सुरू होता. बाळाजीनें आंगऱ्याशीं अशा प्रकारचें कांहीं तरी कारस्थान केलें असावें. त्या संशयावरून सीदीनें त्याचा वडील भाऊ जानोजी यास गोणत्यांत बांधून समुद्रांत बुडविलें, अशी आख्यायिका आहे. बखरकार ह्मणतात, त्या

१ स. १७०६ तील जानोजी विश्वनाथ ह्याच्या हातची नोंद त्र्यंबकच्या तीर्थोपाध्याच्या चोपडींत सांपडलेली रा. राजवाड्यांनीं इतिहास व ऐतिहासिक मासिकांत दाखविली आहे. याचा अर्थ इतकाच कीं, जानोजीस ठार मारल्यावर बाळाजीनें देशत्याग केला असें नाहीं. देशावर आल्यावर आणि पेशवाई मिळाल्यावर सुद्धां सीदीचा पाडाव करण्यांत बाळाजीनें पुढाकार घेतला होता. तेव्हां सीदीनें जानोजीस पुढें केव्हां तरी ठार मारला असल्याचा संभव आहे.

दहशतीनें बाळाजीनें देशांतर करण्याचा निश्चय केला. मुलांमाणसांसह श्रीवर्धन सोडून बाणकोट खाडीच्या दक्षिण तीराजवळ वेळास ह्मणून गांव आहे, तेथें भानु आडनांवाचे बाळाजीच्या घरोब्याचे एक स्नेही राहत होते, त्यांजकडे तो आला. तेव्हां त्रिवर्ग बंधु भानुही बाळाजीबरोबर देशावर जाण्यास सिद्ध झाले. 'आह्मांस भाकर मिळेल, तींतला चतकोर तुह्मांसही मिळेल,' असें बाळाजीनें भानूंस आश्वासन दिलें. बाळाजीस पेशवे पद मिळाल्यावर त्यानें शाहूकडून राज्याची फडनिशी भानूंस देवविली. त्याप्रमाणें भानु व बाळाजीपंत हे सातान्यास जाण्याच्या इराद्यानें निघून पुरंदर किल्ल्यानजीक सासवडास आले व सासवडचे कुळकर्णी व देशपांडे अंबाजीपंत पुरंदरे याजकडेस मुक्कामास उतरले. पुढें रोजगाराविषयीं सर्व मंडळीचीं बोलणीं होऊन पुरंदरे सुद्धां मंडळी सातान्यास आली. सातान्यास महादाजी कृष्ण जोशी याचा व भानूंचा परिचय होता. कृष्णाजी जोशी नाईक हा अगोदरच मराठशाहींत नांवाजलेला असून तो व त्याचा मुलगा महादाजी यांचें शाहूपाशीं चांगलें वजन होतें. त्यांस भानु व भट भेटले; आणि त्याच्याच मार्फतीनें सचिव शंकराजी नारायण याचकडे बाळाजी व पुरंदरे यांस नोकरी मिळाली. पुढें त्यांची हुशारी पाहून, धनाजी जाधवानें त्यांस आपल्याजवळ घेतलें व त्यांच्या हुशारीमुळें धनाजीचा त्यांजवर लोभ बसला. बखरकारांच्या या हकीकतींत फारसें तथ्य दिसत नाहीं. चिपळुणास असतां स. १६९७ च्या सुमारास बाळगौळी याचे मार्फत बाळाजीची ब्रह्मेंद्रस्वामीशीं ओळख झाली, आणि त्याच्या वशिल्यानें बाळाजीचा मराठेशाहींत प्रवेश झाला, अशीही एक आख्यायिका आहे, तींत काय तथ्य असेल तें असो. स्वामीच्या ठिकाणीं अद्भुत कर्तृत्वशक्ति आहे असा समज असल्यामुळें त्याच्यावर बाळाजीची व त्याच्या वंशाची उत्तम निष्ठा होती; आणि मराठशाहीचीं सूत्रें चालवितांना ह्या भट पेशव्यांच्या वागणुकींत आरंभीं ब्रह्मेंद्र-

स्वामीचें अंग बरेंच होतें, यावरून वरील समज प्रचलित झाला असावा. असो.

बाळाजी विश्वनाथ वरघांटीं आला, तत्पूर्वींचा त्याच्या नांवाचा उल्लेख करणारीं दोन पत्रें भा. इ. सं. मं. इतिवृत्त शके १८३५ ले० ४७ येथें छापलेलीं आहेत, त्यांत ' बाळाजी विश्वनाथ देशमुख मामले दंडा-राजपुरी, व अधिकारी श्रीवर्धन ' आणि ' बाळाजी विश्वनाथ सभासद ' असे उल्लेख सन १६९६ सालचे आले आहेत. सभासद ही पदवी राज-मान्य होती. कोणत्याही मुलकी, लष्करी वगैरे निवाड्याच्या जागीं किल्लेदाराला किंवा सुभेदाराला सल्ला देण्याचें काम हल्लींच्या कौन्सिलर्स-सारखें सभासदाचें असे. हजर मजालस भरवून तंटयाचा निवाडा कर-ण्याची पद्धत पूर्वींपासून चालू होती.

बाळाजी विश्वनाथास पेशवाई मिळाली त्यापूर्वीं वीसपंचवीस वर्षें तरी तो घांटावर येऊन राज्याच्या घडामोडींचें अवलोकन करीत असला पाहिजे. जात्या हुशार, महत्त्वाकांक्षी व पराक्रमी असल्यामुळें मराठशाहीचा संपूर्ण कारभार चालविण्या इतकी त्याची तयारी पुष्कळ वर्षें चालली होती. सन १६९६ पासून त्याच्या नांवाचा तुरळक उल्लेख कागदोपत्रीं सांपडतो. ( महजर—ले. ४७ इ. वृ. १८३५ ) चिपळुणास वाडा बांधण्यास त्यास शाहूनें परवानगी दिली होती. 'श्री. बाळाजीपंत नाना देशमुख' असा चिपळूणच्या वतनदारांनीं त्याचा मायना लिहिलेला आहे. सन १६९९ पासून १७०२ पावेतों तो पुणे प्रांताचा सरसुभेदार असल्याचीं पत्रें इतिहाससंग्रहांत छापलेलीं आहेत. ( पेशवे दप्तरांतील माहिती पृ. १२२ ). स. १७०२ त सेनापति धनाजी जाधव याच्या दिमतीस तो असल्याचे कागद उपलब्ध झाले आहेत ( भा. इ. सं. मं. ). स. १७०४ यांत व १७०५—६ त तो दौलताबाद प्रांताचा सरसुभेदार होता, असेही कागद त्याच ठिकाणीं दिलेले आहेत. [ इ. सं. पे. द. मा. पृ. १२४ ]

ता. २१-६-१७०७ च्या एका कागदांत ' दौलताबादचा सरसुभेदार ' असें त्यास म्हटलें आहे. या संबंधांत ' सातारें ' गांवचा उल्लेख येतो, तें दौलताबादेजवळ आहे, दक्षिणेंतला सातारा किल्ला नव्हे. ( पहा, म. रि. पू. पृ. २१४ ) पुणें प्रांताची सरसुभेदारी बाळाजीस एकदम मिळाली नसावी. शेखदार, कमावीसदार वगैरे कामें करून तो सरसुभेदारीवर गेला असला पाहिजे. म्हणजे राजारामाची सबंध कारकीर्द व बहुशः संभाजीची सुद्धां त्यानें स्वतः पाहिली असावी. रा. राजवाडे म्हणतात, स. १६७९ च्या किंचित् अगोदर किंवा किंचित् नंतर तो कोंकणांतून वर आला असावा. पुणें प्रांताची त्यास खडानखडा माहिती होती. पुढें सुद्धां सासवड, पुरंदर, सिंहगड वगैरे ठिकाणें आपल्या हातांत ठेवण्यांत त्याचा अट्टाहास दिसतो. पुण्यास आपली व्यवस्था स्वतंत्र करण्याकडे सर्वच पेशव्यांची प्रवृत्ति होती. भीमेच्या कांठीं औरंगजेबाची छावणी असतां म्हणजे स. १६९५ ते ९९ च्या दरम्यान शाहू व त्याची आई येसूबाई यांची बेगमेकडून योग्य व्यवस्था ठेवण्यांत पुण्याचा सरसुभेदार बाळाजी विश्वनाथ यानें पुष्कळ खटपट केली, असा एक उल्लेख आहे, त्यावरून शाहूला बाळाजीची माहिती तो औरंगजेबाच्या कैदेंत असल्यापासूनच असली पाहिजे. भा. इ. सं. च्या तृ. सं. वृत्तांत पृ. ८५ वर बाळाजीची एक जुनी बखर छापलेली आहे. त्यांतील बरेच भाग असंबद्ध दिसतात, तरी संभाजीच्या वधापासूनच शाहूच्या बचावासंबंधानें बाळाजीचें लक्ष विशेष असून, शाहू व बाळाजी यांचा पूर्वपरिचय बराच चांगला होता ही गोष्ट निर्विवाद दिसते. स. १६७८ त तो वर घांटीं आला तेव्हां तो १८।२० वर्षांचा होता असें धरिल्यास म्हणजे स. १६६० चा त्याचा जन्म असल्यास, पेशवाईवर नेमणूक झाली तेव्हां त्याचें वय सुमारें ५३ असावें.

सामान्य प्रवाद असा आहे कीं; बाळाजी हा कोंकणांतून आलेला यःकिंश्चित् कारकून असून त्यास दैवयोगानें एकदम मोठें भाग्य प्राप्त झालें.

भाग्यास चढलेल्या मनुष्याची पूर्वस्थिति अप्रसिद्ध असल्यास तो विरोध फुगवून सांगण्याकडे बहुधा बखरकारांचा कल असतो. ग्रँट डफच्या लेखानें असा गैरसमज उत्पन्न झाला असावा. पेशव्यांच्या संबंधानें ग्रँट डफची आदरबुद्धि नाहीं. ज्यांचें राज्य आपण घेतलें, त्यांची नांवाजणी करण्याचें औदार्य मनुष्य स्वभावांत सहसा नसतें, आणि त्यांतल्या त्यांत दुसऱ्या बाजीरावाच्या वेळेस मराठी राज्याची पुष्कळ दुरवस्था होती अशा स्थितींत, शंभर वर्षें मागाहून, ग्रँटडफनें इतिहास लिहिला. पेशव्यांच्या पूर्ववंशाची माहिती दप्तरांतून वगैरे हुडकून काढण्याचा यत्न त्यानें त्या वेळीं झटून केला असता, तर ती त्यास बहुधा सहज मिळूं शकली असती. दुसरें असें कीं पेशव्यांच्या भाग्यासंबंधाचा जो विरोध दाखविण्यांत येतो, तो बहुधा कोणत्याही प्रसिद्ध पुरुषास लागू पडेल. शहाणपण अंगीं असलें पाहिजे, आणि तें दाखविण्याचा प्रसंग आला पाहिजे. मोरोपंत पिंगळे, परशुराम त्रिंबक, शंकराजी नारायण, धनाजी जाधव किंवा प्रत्यक्ष शिवाजी यांच्या संबंधानें सुद्धां वरील विरोध दिसून येतो, तो नमूद करण्यांत मतलब नाहीं. सारांश, बाळाजी विश्वनाथ एकदम लहान स्थितींतून मोठेपणास चढला ही गोष्ट खरी नाहीं. तो पुष्कळ वर्षें राज्यांत लहान कारकुनीपासून सरसुभेगिरीपर्यंतचा अनुभव घेत होता; आणि प्रसंग आल्याबरोबर त्याच्या अंगची कर्तबगारी व्यक्त होऊं लागली. बाळाजीस घोड्यावर बसतां येत नव्हतें असा एक प्रवाद आहे तो खरा नसावा. त्याचा पुष्कळ काळ धामधुमींत व युद्धप्रसंगांत गेला असल्यामुळें, आणि अनेक प्रसंगीं पाठलाग करणाऱ्या शत्रूंच्या हातून तो निसटून गेला असल्यामुळें, त्यास घोड्यावर बसतां येत नसेल हें संभवत नाहीं. त्यानें निरनिराळ्या हुद्यांचीं कामें केलीं, सचिव, अमात्य, दाभाडे, सेनापति, यांच्या पदरीं नोकऱ्या केल्या, आणि शेवटीं नानाप्रकारचीं कारस्थानें रचून व फौज जमवून शाहूचा पक्ष वर आणिला, तेव्हांच त्यास पेशवाईचें पद मिळालें. घोड्यावर बसतां येणें ही

गोष्ट त्या वेळीं अत्यंत आवश्यक व सार्वत्रिक होती. स्त्रियांस सुद्धां घोड्यांवर बसतां येत होतें. तेव्हां हाही प्रवाद वर सांगितल्यासारखाच पुढील आयुष्यक्रमाचा विरोध दाखविण्याच्या हेतूनें उत्पन्न झालेला असावा. अथवा त्यास पेशवाई मिळाली तेव्हां साठी सुमार त्याचें वय असून शरीरही विशेष स्थूल असल्यामुळें, त्या पुढील आयुष्यांत घोड्यावर बसण्याची चपलाई त्याचे अंगीं नसून, त्यास इतरांनीं घोड्यावर सांवरून धरण्याचा प्रसंग पडत असावा, आणि त्यामुळेंच घोड्यावर बसण्याची त्याची असमर्थता लौकिकांत प्रसिद्ध झाली असावी. सेनापतीच्या दिमतीस असतांना लिहिलेल्या स. १७०२ व १७०३ च्या कागदांवर बाळाजीची मुद्रा आहे ती अशी :–' श्री उमाकान्तपदांभोजभजनाप्तसमुन्नतेः । बाळाजीविश्वनाथस्य मुद्रा विजयतेतराम् ॥ ' म्हणजे शंकराच्या सेवेनें आपण मोठ्या योग्यतेस चढलों असें यांत स्वतः बाळाजी ह्मणत आहे. एकंदरींत कोंकणांतील एका अप्रसिद्ध कारकुनास एकदम शाहूनें पेशवाई दिली हा समज निःसंशय खरा नाहीं. याचा भरपूर पुरावा पुढें येत आहे व आणखीही उत्तरोत्तर येईल.

' कोंकणांत असतांनाच बाळाजी विश्वनाथ मोठा इभ्रतदार व वजनदार गृहस्थ होता, भिक्षुक नव्हता. ज्या उलाढाली त्यानें पुढें केल्या, त्या आरंभीं ही केल्या. परंतु कोंकणांत त्याच्या कर्तृत्वशक्तीस पुरेसें क्षेत्र नसल्यामुळें, तो देशावर गेला. मराठशाहींतील धांदलीचा उपयोग करून घ्यावा, असा त्याचा हेतु मूळपासूनच असावा. भा. इ. सं. मं. इ. वृ. १८३५ ले. ४७ वर दोन अस्सल पत्रें छापिलीं आहेत, त्यांत बाळाजी दंडाराजपुरीचा देशमुख, श्रीवर्धनचा अधिकारी व दाभोळचा सभासद होता असे उल्लेख स. १६९६ सालचे आहेत. ह्मणजे दंडाराजपुरीच्या वसुलाचें काम व श्रीवर्धन गांवची मुख्य कामगारी, हीं दोन कामें, व शिवाय दाभोळच्या सुभेदाराला मदत करणाऱ्या कौन्सिलांत

सभासद म्हणून त्याची नेमणूक होती. मुलकी, लष्करी किंवा निवाड्याच्या कामीं किल्लेदाराला किंवा सुभेदाराला सल्ला देणारें कौन्सिल मराठशाहींत व तत्पूर्वी भारतवर्षांत रूढ होतें. सारांश अशीं महत्त्वाचीं कामें करणारा पुरुष बराच अद्वितीय व पराक्रमी होता यांत संशय नाहीं.' (राजवाडे,)

५. बाळाजीचा धाडशी डाव.—बाळाजी हुशार व महत्त्वाकांक्षी होता. ही त्याची हुशारी व महात्त्वाकांक्षा सचिव, प्रतिनिधि प्रभृति मंडळीस रुचली नसावी. नवीन तरतरीत इसम पुढें येऊं लागला ह्मणजे जुन्या मंडळीस त्याजबद्दल बहुधा वैषम्य वाटत असतें, आणि आपला अधिकार जाऊं नये ह्मणून राज्यांत ते नानाप्रकारच्या खटपटी करतात. उलट पक्षीं धनाजीला अशा होतकरू इसमाची जरूर असून, त्यानें मुद्दाम वरील मंडळींशीं टिकाव धरण्याकरितां बाळाजीस आपल्या हाताशीं धरलें असावें. कारण औरंगजेबाचा मृत्यु ही त्या वेळच्या घडामोडींत एक अत्यंत क्रांतिकारक व आणीबाणीची वेळ होती. पुढें आतां मराठी राज्याचें धोरण काय राखावयाचें, आणि राज्याचे उद्देश कसे पार पाडावयाचे, हे विचार कर्त्या पुरुषाच्या मनांत घोळत असले पाहिजेत. बाळाजी तर सर्व घडामोडी डोळ्यांसमोर पहात होता, आणि त्यास ह्या क्रान्तिकारक संधीची उमज यथायोग्य पडली होती, असें दिसतें. ह्मणूनच धनाजीनें त्याला जवळ केलें.

ताराबाईचा स्वभाव व एकूण एक जुने मुत्सद्दी बाळाजी ओळखून होता. रामचंद्रपंत अमात्याचें व ताराबाईचें पटत नव्हतें. तिला कारभार बरोबर चालवितां येत नव्हता, पण तिला दूर सारण्याची धमक रामचंद्र पंतांत नव्हती. तो काम करून थकलेला मुत्सद्दी होता. क्रान्तिकारक संधीच्या प्रसंगीं जुनी घडी मोडून नवी बसविण्यास ताज्या दमाचा हिकमती व हिंमतवान पुरुष लागतो. तशी हिंमत बाळाजीच्या अंगीं शाहूस दिसली असावी. ताराबाई व शिवाजी एका बाजूस आणि शाहू दुसऱ्या बाजूस अशा दोन पक्षांत मराठशाहीच्या हितासंबंधानें, शाहूचाच उपयोग

राष्ट्रास ज्यास्त होईल, असें बाळाजीनें आपल्या मनाशीं ठरविलें, आणि त्या दिशेनेंच त्यानें झटून प्रयत्न सुरू केला.

हा विचार ठरविण्यांत खंडो बल्लाळ चिटणिसाचें व बाळाजीचें संगनमत असलें पाहिजे. शिवाजीचे वेळेपासून राज्यांत चिटणिसांचें वजन भारी होतें. राजनिष्ठा व स्वार्थत्याग हे खंडोबाचे गुण पूर्वी अनेक प्रसंगांत कसास लागले होते. एकंदर चिटणीस घराण्याचें व पेशवे घराण्याचें सदैव सख्य असल्याचें दिसून येतें. शाहूच्या हयातींत तर चिटणिसांच्या विचाराशिवाय पेशव्यांनीं कोणतेंच काम केलें नाहीं. हरएक नवीन काम चिटणिसांच्या द्वारें बाहेर यावयाचें असल्यामुळें, शाहूपाशीं आपलें वजन कायम ठेवण्यासाठीं पेशव्यांस चिटणिसांशीं गोडी राखावी लागे. खंडोबाचा उपयोग बाळाजीस झाला, तसाच त्याचा मुलगा गोविंदराव याचा उपयोग बाळाजीच्या मुलास व नातवास अतिशय झालेला आहे. यावरून खंडोबा व बाळाजी यांनीं एकमेकांच्या विचारानें पुढील सर्व बेत अगोदरपासून ठरवून ठेविले होते, असें दिसतें. पुण्यापासून दौलताबाद पावेतोंच्या मध्यवर्ती प्रदेशांत सरसुभेगिरी करून बाळाजीनें राज्यकारभाराचें रहस्य चांगलें ओळखलें होतें. तेव्हां खंडोबानेंही त्याची योग्यता ओळखून त्याजबरोबर संगनमत केलें, ही आपल्या दृष्टीनें त्यानें त्या वेळीं राष्ट्रहिताची गोष्ट केली. मोठ्या घडामोडी यदृच्छेनें किंवा सहजगत्या होत नसतात. या बेतांची कुणकूण ताराबाईला सुद्धां अगोदरपासून असावी. म्हणूनच तिनें, शाहू सुटून येत आहे असें समजतांच, त्याजवर चालून जाणाऱ्या गृहस्थांकडून मुद्दाम आगाऊ शपथा घेवविल्या. नाहीं तर अशा शपथा घेवविण्याचें कारण नव्हतें. खंडोबानें तर शपथ घेतलीच नाहीं. रामचंद्रपंतावर तिचा विश्वास नव्हता. शंकराजी नारायणही डळमळीत होता. ताराबाईच्या तापट स्वभावामुळें ते खऱ्या गोष्टी उघड करण्यास धजले नाहींत, इतकेंच. परंतु बऱ्याच लोकांचीं अंतःकरणें शाहूकडे अगोद-

रेंच वळलीं होतीं; आणि राज्याच्या पुढील घडीचा व्यूह अंतस्थ रीतीनें लोकांचे मनांत रचिला जात होता, हें निर्विवाद आहे.

त्या वेळच्या प्रसिद्ध व्यक्तींची कर्तबगारी वर ठिकठिकाणीं दाखविली आहे. त्यावरून त्या सर्व मंडळींत हा बाळाजीच विशेष कर्तृत्ववान् होता, असें दिसतें. ताराबाईच्या पक्षांत फक्त एक परशुरामपंत प्रतिनिधि कर्तत्ववान् होता. परंतु आणीबाणीच्या प्रसंगास जरूर लागणारी तडफ व निश्चय हे गुण त्याच्या अंगीं नव्हते. अंतस्थ रीतीनें मंडळीचे काय बेत चालले आहेत, याची त्यास दाद नव्हती. तसेंच आजूबाजूचें धोरणही त्यास बेताचेंच असावें. कारण शाहूशीं लढण्याचा प्रसंग आणून त्यांत तो स्वतःच फसला गेला. अशा स्थितींत इतका वेळ पडद्याआड असलेला एक मनुष्य हिय्या करून पुढें आला, तो बाळाजी विश्वनाथ होय. बाळाजीची महत्त्वाकांक्षा जबर होती. महत्त्वाकांक्षा म्हणजेच कर्तृत्व. हांव धरावी तेव्हांच पराक्रम घडतो. एकवार विचारपूर्वक मनाचा निश्चय करून जोखीम अंगावर घेणें आणि त्यांत यश मिळविणें म्हणजेच कर्तृत्व होय. हा प्रकार जगाच्या इतिहासांत ठिकाठिकाणीं दिसून येतो. मनुष्याच्या अंगची कर्तबगारी आणीबाणीच्या प्रसगांतच व्यक्त होते, असें एक इतिहासांतलें सूत्र आहे, * तसाच प्रकार बाळाजीचा झाला.

शाहू व ताराबाई यांच्या हक्काचा प्रश्न बाजूस ठेविला, तरी व्यावहारिक रीत्या शक्याशक्य काय होतें हेंही पाहिलें पाहिजे. ताराबाई, शिवाजी, संभाजी व शाहू इतकी मंडळी राजकुटुंबांत प्रमुख होती. पैकीं स्त्रीच्या हातीं राज्यकारभार असावा ही गोष्ट तत्त्वतः किंवा व्यवहारतः त्या वेळीं मराठमंडळास मान्य होण्याजोगी नव्हती. बाकी तिघे राजपुत्र राहिले, त्यांत लायकीच्या संबंधानें पाहिलें तर शाहूचाच नंबर पहिला, हें त्यांच्या

---

* Difficult periods form remarkable men.

पुढील वागणुकीवरून स्पष्ट होतें. इतकेंच नव्हे, तर शिवाजी सारखा पहिल्या प्रतीचा पुढारी वर्ज्य केला असतां, त्या वेळच्या मानानें, शाहूसारखा मनमिळाऊ परंतु योग्य हुकमत चालविणारा राजा त्या वेळीं राष्ट्रास लाभला, हें मराठशाहीचें भाग्यच समजलें पाहिजे. कारण शाहू कायमचाच बादशहाच्या कैदेंत राहिला असता, अशी कल्पना क्षणभर घेऊन चालल्यास, ताराबाई व संभाजी यांच्या हातून शाहूच्या इतकी कर्तबगारी घडली असती कीं काय, याचा संशय वाटतो. शाहू व पेशवे यांनीं जितका राज्याचा बोज राखिला तितका सुद्धां त्यांच्यानें राखवला नसता, असेंच म्हणावें लागेल. कारण त्या वेळचीं माणसें व त्यांची लायकी जी आतां ऐतिहासिकरीत्या सर्व आपल्या दृष्टीसमोर आहे, त्यांचा विचार केला असतां, मराठशाहीच्या अंगीं जितकी कर्तबगारी शक्य होती, तितकी शाहूनें पेशव्यांच्या तंत्रानें करून दाखविली असें म्हणावें लागतें. पुढें येणाऱ्या हकीकतीवरून हा प्रकार उत्तरोत्तर स्पष्ट होईल.

या वेळच्या कारस्थानांत ब्रह्मेंद्रस्वामीचें अंग अंतस्थ रीतीनें असावें असा तर्क होतो. स्वामीनें हिंदुस्थानभर प्रवास केलेला होता. प्रवासाअंतीं महाराष्ट्रांत सातारा वगैरे प्रांतांत फिरून, शेवटीं त्यानें कोंकणांत परशुराम येथें वास्तव्य केलें. बाळाजीचा व त्याचा परिचय असून, त्याच्या हुशारीवरून बाळाजी राज्याच्या उपयोगी चांगला पडेल आणि तो पुढें नशीब काढील असें स्वामीस वाटलें, आणि तसा उद्योग त्यानें केला. स्वामीच्याच वशिल्यानें सरदार मंडळींत बाळाजीच्या ओळखी झाल्या असल्या पाहिजेत.

बाळाजीची व शाहूची गांठ कशी पडली आणि त्यानें धनाजीचें मन शाहूकडे कसें वळविलें, यासंबंधाचा एक त्रोटक उल्लेख मुजुमदारांच्या कैफीयतींत आहे, त्यावरून या कारस्थानावर कांहीं प्रकाश पडतो. 'जाधवराव फौजबंद असल्यामुळें राजश्री शाहू छत्रपतींचा प्रवेश होईना. सबब हरतऱ्हेनें प्रयत्न करावा हें मनांत आणून महाराजांनीं आमचे वडील

नारो गंगाधर यांस भेटीस बोलाविलें. भेट झाल्यावर राजश्रींनीं आज्ञा केली कीं, धनाजी जाधव यांचे फौजेंत जाऊन आपलें कार्य संपादन करावें. मग नारो गंगाधर जाधवराव यांचे लष्करांत जाऊन, बाळाजी विश्वनाथ यांस भेटून महाराजांकडील मजकूर बोलिले, कीं महाराजांची चाकरी करून दाखवावी, म्हणजे तुम्हांस मोठें पद देतील. असें बोलोन निश्चय केला. नंतर बाळाजी विश्वनाथ यांनीं कारस्थान करून धनाजी जाधव यांस भय घालून, ते मोगलाईंत निघून गेले. तेव्हां बाळाजी विश्वनाथ यांची व राजश्रींची भेट आमचे वडील नारो गंगाधर यांनीं केली. मग महाराजांचे समागमें सातार्‍यास जाऊन राज्याचा बंदोबस्त करून राज्यकारभार करूं लागले, ( शके १६२९ ). पुढें शके १६३५ विजयनाम संवत्सरे माघमासीं बाळाजी विश्वनाथ यांस पद दिलें ते समयीं आमचे वडील नारो गंगाधर यांस मुज्मूचें पद दरखाचें देऊन वस्त्रें महाराजांनीं दिलीं. [ मावजीकृत कैफीयती यादी वगैरे ]. अष्टप्रधान असले तरी राज्याचा मुख्य कारभार करणारा एक प्रधान प्रमुख असे. तसें प्रमुखत्व बरेंच दिवस राज्यांत धनाजीकडे असून, रामचंद्रपंतावर ताराबाईची इतराजी झाल्यावर वसुलाचें काम बहुधा धनाजी पाहत असावा. कारण स. १७०२ च्या सुमारास या कामासाठीं पुणें प्रांताचा सरसुभेदार बाळाजी विश्वनाथ धनाजीचे दिमतीस असल्याचे कागद सांपडले असून त्यांत वसुलाच्या व्यवस्थेचा उल्लेख आहे. अर्थात् बाळाजी विश्वनाथ व त्याच्या मार्फतीनें अंबाजीपंत पुरंदरे हे दोन गृहस्थ धनाजीपाशीं बरींच वर्षें जबाबदारीनें कारभार करीत असून, धनाजीच्याच शिफारशीनें त्यांचा प्रवेश शाहूकडे झाला असावा.

ताराबाईनें रामचंद्रपंतावर संपूर्ण विश्वास टाकला नाहीं, यामुळेंही बाळाजीस पुढें येण्यास चांगला अवसर मिळाला. तिच्या पक्षांतील रामचंद्रपंत व परशुरामपंत कसे निरुपयोगी झाले हें रा. खरे यांच्या पुस्त-

कांतील खालील उताऱ्यावरून स्पष्ट होतें, ( इचलकरंजी इ०, पृ० २२ ). ' रामचंद्रपंत हे ताराबाईचे मुख्य कारभारी होते, तरी अलीकडे त्यांचा त्यांवर विश्वास नव्हता. त्यांची सारी भिस्त परशुरामपंतांवर होती. परशुरामपंत व रामचंद्रपंत यांचें वैमनस्य होतें ( खं. ८ ले. ६०, ६१ ), त्यामुळें रामचंद्रपंतांनीं जो कारभार करावा, तो प्रतिनिधींनीं ताराबाईस भलतेंच समजावून मोडवावा, असें नेहमीं होऊं लागलें. त्यामुळें रामचंद्रपंत यांस राग येऊन त्यांनीं शाहूमहाराजांस कांहीं उत्तेजनपर निरोप पाठविला. हें वर्तमान ताराबाईस कळतांच त्यांनीं रामचंद्रपंतांच्या पायांत रुप्याची बेडी घालून त्यांस वसंतगडावर कैदेंत ठेविलें. त्यायोगानें रामचंद्रपंतांस अर्थात्च अधिक क्रोध येऊन त्यांनीं धनाजी जाधव वगैरे मराठे सरदार फितूर करून त्यांस शाहू महाराजांकडे पाठवून दिलें. परशुरामपंत प्रतिनिधि लढाईच्या इराद्यानें शाहूमहाराजांवर चालून गेला होता, परंतु लढाईंत जाधवराव वगैरे सरदार तिकडे मिळालेले पाहतांच तो पळून साताऱ्यास आला. नंतर शाहूमहाराजांनीं सातारा काबीज करून परशुरामपंतास कैद केलें. हें वर्तमान येतांच ताराबाईनीं रामचंद्रपंतांस कैदेंतून सोडून रांगण्यास आणिलें; व आपला मुलगा शिवाजी व सवतीचा मुलगा संभाजी या दोघांस रामचंद्रपंतांच्या मांडीवर बसवून राज्यसंरक्षण करण्याविषयीं त्यांची विनवणी केली, तेव्हां रामचंद्रपंत पुनः राज्यकारभार चालवूं लागले. इचलकरंजीचे संस्थापक नारो महादेव याची त्यांस उत्तम प्रकारची मदत होती. रामचंद्रपंताचें मन वळविल्यावर, त्याच्या मार्फत धनाजी जाधव, खंडो बल्लाल व परशुरामपंत यांनाही शाहूकडून फोडून आपल्या बाजूस आणण्याचा प्रयत्न ताराबाईनें केला ( खं. ८-६४-६६ ), पण हा बेत फारसा सिद्धीस गेला नाहीं.

बाळाजीनें महाराष्ट्रांतील घडामोडींचें चांगलें निरीक्षण केलेलें होतें.

पुणे प्रांताच्या सरसुभेगिरीवर असतांना शाहूचा मतलबही त्यास थोडा बहुत कळण्याचा संभव होता. शाहू सुटून येत आहे ही बातमी कळतांच, स्वतंत्रतेनें नशीब काढण्याच्या महत्त्वाकांक्षेनें ह्मणा, अथवा ताराबाईकडील मुत्सद्यांशीं त्याचा विरोध असल्यानें म्हणा, बाळाजीनें शाहूस जाऊन मिळण्याचा निश्चय अगोदरच केला असावा. या कामीं ब्रम्हेंद्र स्वामीचा हस्तक चिमणाजी दामोदर हा पूर्वींच शाहूस मिळाला असून, त्यानेंही स्वामीच्या आग्रहावरून बाळाजीस तसें करण्यास भर दिली असेल. शाहू सुटून परत येत असतां त्यास मदत करण्याविषयीं ब्रम्हेंद्र स्वामीसारख्या मंडळीचें अंतस्थ कारस्थान त्यावेळीं चाललें असावें. त्यामुळें शाहूच्या बाजूस मन असलेला बराच मोठा वर्ग महाराष्ट्रांत तयार झाला. खेडच्या लढाईंत धनाजीचें मन शाहूकडे वळविण्यास बाळाजी कारण झाला असें म्हणतात. बाळाजी व खंडोबल्लाळ यांनीं लढाईचे अगोदर शाहूची भेट घेऊन पुढील वर्तनक्रम ठरविला होता. त्यांनींच धनाजीचें डळमळणारें मन निश्चित केलें. धनाजी जर शाहूस मिळता ना, तर शाहूची सुव्यवस्था इतक्या लवकर लागली नसती. म्हणून खेडच्या लढाईनंतर शाहूला बाळाजीचे उपकार विशेष वाटूं लागले, आणि ते वाढत जाण्यास तशींच कारणें होत गेलीं.

६. **चंद्रसेन जाधवाचा फितवा ( स. १७१०–१२ ).** शाहूच्या राज्याभिषेकापासून धनाजीच्या मृत्यूपर्यंत बाळाजीच्या हातचें राज्याच्या उलाढालीचें कृत्य बाहेर आलेलें नाहीं. या वेळांत तो वसुलाच्या कामाची व्यवस्था पाहत होता. पुढें त्यानें वसुलाची पद्धत बांधिली तिला या वेळचा अनुभव उपयोगी पडला असला पाहिजे. त्या वेळीं शाहूच्या उत्कर्षार्थ उपाय योजण्यांत त्याचें मन निमग्न होतें. धनाजीच्या मृत्यूनें शाहूस अत्यंत विपन्नावस्था प्राप्त झाली. त्याजविरुद्ध उलट पक्षाचीं जबरदस्त कारस्थानें सुरू होतीं. त्याच्याकडे फुटून आलेली मंडळीसुद्धां

त्यास सोडून जाऊं लागली होती. त्या कारस्थानांत मुख्य अंग धनाजी जाधव याचा मुलगा चंद्रसेन जाधव याचें होतें. हा चंद्रसेन दीर्घसूत्री व दीर्घोद्योगी असून, कितीही अडचणी आल्या तरी, हार न जातां, ताराबाईच्या पक्षाचा पाठपुरावा करीत होता. चंद्रसेन व बाळाजी यांचें पटत नव्हतें याचें कारण पक्षभेद होय. चंद्रसेनाचा ओढा ताराबाईकडे असून, शाहूला आजपर्यंत बाळाजी विश्वनाथाच्या मेहनतीनेंच थोडेंबहुत यश मिळालें होतें. धनाजी जिवंत असतांनाच बाळाजीविषयीं चंद्रसेनाचे मनांत चुरस असेल, पण त्या वेळेस तो मुखत्यार नसल्यामुळें त्याजकडून बाळाजीचें कांहीं वांकडें झालें नाहीं. धनाजीच्या मृत्यूनंतर शाहूनें चंद्रसेनास सेनापतिपद दिलें, तेव्हां अर्थात् चंद्रसेनाचा अखत्यार बाळाजीवर सुरू झाला. दोघांचीं मनें दोनपक्षांकडे वेधल्यामुळें, त्यांचें पटेनासें होऊन उघड वैर सुरू झालें. दोघांमध्यें पुढें हरणाचा तंटा झाला, त्याच्या मुळाशीं हें वैर आहे. नाहीं तर यःकश्चित् हरणावरून शाहूनें तरी एवढ्या बलिष्ठ सेनापतीस सोडून बाळाजीस आश्रय दिला नसता. बाळाजीस सोडल्यानें आपलें सर्वस्वी नुकसान आहे असें समजूनच शाहू हरप्रयत्न करून चंद्रसेनास आपल्या बाजूस वळविण्याचे श्रम करीत होता. सन १७१०चे सुमारास ताराबाईनें कोल्हापुरास आपली राहण्याची जागा केली, आणि तेथें तिनें आपले नवीन अष्टप्रधान नेमिले. चंद्रसेन उघडपणें तिला मिळण्याच्या रंगांत आला, आणि बापाच्या मृत्यूनंतर एक वर्षाच्या आंत जबरदस्त खटपटी करून त्यानें शाहूचा पक्ष अगदीं निर्बल करून सोडिला. त्याच्या या खटपटींचें सुरेख वर्णन ताराबाईचा पुत्र शिवाजी यानें चंद्रसेनास लिहिलेल्या एका पत्रांत दिलेलें असून, त्यांतील उत्तराचा मजकूर ताराबाईनेंच स्वतः सांगितलेला दिसतो. [ भारतवर्ष–प्र. व.–पत्रें यादी ले. ५० ]. हें पत्र ता. २७ ऑगस्ट स. १७११ रोजीं लिहिलेलें आहे. प्रथम चंद्रसेनाचें शिवाजीस पत्र गेलें त्यांतील उतारा. 'आमची निष्ठा स्वामीच्या चरणीं; स्वामींची सेवा करावी व यशकीर्ति

संपादावी; रा. जाधवराव (धनाजी) स्वामीच्या पायांव्यतिरिक्त दुसरें दैवत जाणत नव्हते. राज्यांत दुही निर्माण झाली, ते प्रसंगीं त्यांनीं प्रतिज्ञापुरःसर स्वामिसंनिध बोलोन स्वार झाले; परंतु कालगतीनें सर्वांची बुद्धि एका प्रकारें जाहली. तन्मुळें त्यांचा (आपणास साह्य करण्याचा) हेतु पूर्ण करावा, हें अंतःकरणीं धरून, आजपर्यंत याच मार्गी राहून, राजश्री अप्पाजी थोरात, दमाजी थोरात, शहाजी निंबाळकर, संताजी पांढरे आदिकरून सामील करून घेऊन, शाहूनीं केल्या लोभाची (दाखविलेल्या लालुचीची) आस्था न धरितां, त्यांसही वैमनस्य दर्शवून, प्रतिनिधि व रा. खंडेराव दाभाडे, स्वामींच्या लोभाचे सेवक, ह्या प्रसंगांत आणावे, ह्या अर्थें आपल्या समाधानास या उभयतांस पाठविणें, म्हणून मुद्दाम सांगून पाठविलें. त्यावरून उभयतांस पाठवून दिलें; त्यांच्या व आपल्या भेटी जाहल्या व रा. हैबतराव निंबाळकर ह्यांचीहि भेट जाहली. तों अगोदर आपण, रा. थोरात, खंडेराव दाभाडे, संताजी पांढरे, बसोन घाट घटला होता, तो निंबाळकर यास सांगतांच त्यांचे चित्तीं हेंच होतें. मग आम्ही अवघे वर्तमान सरदार कटांत घेऊन प्रतिनिधि यांस विचारांत घेतलें. स्वामींची द्वाही फिरविली. खुशाली केली; आणि गडकिल्यांस आम्हीं आपलीं व पंडित मशारनिल्हेचीं पत्रें पाठविलीं आहेत. या उपरी नीट सातारियाखालें चालून जाऊन राज्यांतील दुही निःशेष करितां स्वामींनीं खुशाली केली पाहिजे.'

धनाजी वारला त्यासंबंधानें चंद्रसेनाचें समाधान करण्यासाठीं शाहूनें प्रतिनिधीस मुद्दाम कैदेंतून सोडवून त्यास व खंडेराव दाभाडे यास चंद्रसेनाकडे पाठविलें. चंद्रसेन आपणावर उलटेल अशी त्या वेळीं शाहूस अटकळ नसावी. कदाचित् चंद्रसेनाचें डळमळणारें मन घट्ट करण्याचाही शाहूचा हे गृहस्थ पाठविण्यांत मतलब असेल. भेटींत चंद्रसेनानें दोघांसही ताराबाईच्या पक्षांत ओढिलें, असें चंद्रसेन लिहितो.

वरील पत्राचा ताराबाईकडून चंद्रसेनास खालील जबाब गेला. " आपण लिहिलेलें वर्तमान श्रवणगोचरें करून संतोषातिशय झाला, तो पत्रारूढ किती काय ह्मणून करावा ? कार्यकर्तव्य, पराक्रमी, मायेचे हिंदु सेवक असावे, ते तुम्हांसारिखेच कृतकर्मे असावे. रा. जाधवराव (धनाजी) यांनीं कै. रा. स्वामीचे वेळेपासून राज्याभिवृद्धीविषयीं केले श्रम साहस, व सांप्रत दुहीमुळें राज्याभिवृद्धीस झाला अपाय, चित्तांत आणून, पुढें स्वामीचें राज्य वृद्धीतें पाववून यशकीर्ति संपादावी हें मनीं धरून, जो अर्थ विशदें लिहिला तो उचित व यथार्थित लिहिला. तरी तुम्ही दीर्घद्रष्टेच आहां. हें राज्य समग्र ताम्राक्रांत झालें असतां कै. स्वामींनीं लहानापासून थोरास आपली माया लावून, अवघियांवरी सदयत्वें कृपामृतवृष्टि करून दिनप्रतिदिनीं राज्य वृद्धिंगत पावविलें, ते प्रसंगीं कै० स्वामीचे संपूर्ण कृपेस पात्र एक जाधवराव मात्र झाले. तों पुढें दुहीचा प्रसंग प्राप्त झाला. दुही निःशेष करावी म्हणून स्वार होऊन गेले. त्यास विपरीतकालवशें सर्व लोकांस एक प्रकारें मोह प्राप्त झाला, तन्मुळें मशारनिल्हेचा कृतसंकल्प सिद्धीतें न पावला. त्यांचे पुत्र तुम्ही, त्यांजसारिखे कृतकर्मे आहां. तुह्मांव्यतिरिक्त त्यांचा संकल्प आणखी कोण शेवटास नेतो ! राज्याभिवृद्धीचा उपाय मायेच्या सेवकाविना दुसऱ्याचे मनांत कसा येईल ! तरी दुही निःशेष करून स्वामीचें शासन चालविण्याचा संकल्प सफल करावा. प्रतिनिधि, दाभाडे व मोरे यांस एकाग्रतेनें जवळ आणावयाचा विचार कल्पून; आपलें कर्तेपण प्रगट केलें ही गोष्ट कांहीं साहजिक केली नाहीं. हे तुमची दीर्घदृष्टि व आंगेजणी व बुद्धीचें वैभव व शूरत्वाचा प्रसंग मनन करून पाहतां दुसरी साम्यता आहे असें नाहीं. तुह्मांसारिखे बुद्धिप्रगल्भ पराक्रमी पुत्र जाधवरावास होऊन स्वामीचे सेवेसीं तत्पर झाले. तुमच्या भरंवशानें स्वामी निश्चित आहेत. एकाग्रता होय तें करणें आणि संतोषाचें वर्तमान हुजूर लिहून पाठविणें. प्रतिनिधिही स्वामींच्या मायेचेच सेवक आहेत. गडकिल्ले यांस

'त्यांहीं व तुम्हीं पत्रें पाठविलीं ही गोष्ट उत्तम केली. पुढेंही ज्यांस जें लिहिणें तें लिहावें. स्वामींनींही हुजुरहून गडकिल्ल्यांस व हशम लोकांस पत्रें पाठविलीं आहेत. रा. हैबतराव निंबाळकर सरलष्कर यांची चित्तवृत्ति स्वामींचे चरणीं दृढ आहे. त्यांस समाधानपत्र पाठवावें म्हणून लिहिलें, त्यांचें सर्व प्रकारें स्वामीस अगत्य आहे. हल्लीं तुमच्या लिहिण्यावरून स्वामींनीं त्यांस समाधानपत्र सादर केलें आहे. त्याचप्रमाणें थोरात व खंडेराव दाभाडे व संताजी पांढरे यांनीं तुमच्या चित्ताचे ठायीं एकरूप होऊन महत्कार्य संपादिलें; येणेंकरून स्वामी त्यांवर संतुष्ट आहेत. त्यांचींही पत्रें हुजूर आलीं होतीं, व स्वामींनीं त्यांस चित्तानुरूप समाधानपत्रें पाठविलीं आहेत. तसेंच रा० मानसिंग मोरे, शहाजी निंबाळकर, आदिकरून कुलसरदारांस समाधानपत्रें पाठविलीं आहेत. अतःपर कोणीं संशय मनांत आणावा असें नाहीं. मध्यें कांहीं दिवस कालाची गति कुटिल होती, तथापि स्वामींच्या चित्तीं कोणाएकाचें वैषम्य किंवा संदेह नाहीं. अवघ्यांच्या विचारें स्वामिकार्याची सिद्धि करावी अशीच स्वामींनीं अवघ्यांस आज्ञापत्रीं आज्ञा केली आहे. सर्व गोष्टींनीं मातोश्री साहेब व स्वामी बहुत संतोषी आहेत. तुम्ही जें कर्तव्य लिहिलें तें निःशेष करून संतोषाचें वर्तमान लिहून पाठवावें.'

धनाजीच्या मृत्यूनंतर एक वर्षाच्या आंत शाहूची बाजू किती खालावली हें वरील पत्रावरून उघड होतें. हैबतराव निंबाळकर व मानसिंग मोरे हे सुद्धां शाहूस सोडूं लागले. अशा आणीबाणीच्या प्रसंगीं बाळाजी विश्वनाथानेंच शाहुची बाजू राखली, हें पुढें दिसून येईल.

**७. हरणाचा तंटा व बाळाजीस 'सेनाकर्ते' पदाची प्राप्ति ( आगस्ट, स. १७११ ).** दमाजी थोरात व उदाजी चव्हाण वगैरे बंडखोरांचा बंदोबस्त करण्यासाठीं शाहूनें चंद्रसेनास रवाना केलें आणि त्याजबरोबर बाळाजीस दिलें. चंद्रसेनाच्या हालचालींवर नजर ठेवण्यासाठींच शाहूनें

बाळाजीस त्याजबरोबर पाठविलें असलें पाहिजे. ह्मणूनच यःकश्चित् कारणावरून पुढें उभयतांचा तंटा जुंपला. एके समयीं लष्करचें कूच होत असतां एक हरण उठलें, त्याचे पाठीस बाळाजीच्या पथकांतील पिराजी राऊत नांवाचा सरदार लागला. पळतां पळतां पुढें मुक्कामावर डेरे राहुट्या लागल्या होत्या, त्यांत व्यासराव ह्मणून जाधवरावाकडील एक ब्राह्मण कारकून होता, त्याचे राहुटींत तें हरण शिरलें. त्याबरोबर व्यासराव व पिराजी यांचा तंटा जुंपला. पिराजी आपली शिकार मागूं लागला. व्यासराव म्हणाला, 'आह्मी ब्राह्मण, आमचे राहुटींत आलें त्याचें संरक्षण आम्ही करणार.' शेवटीं पिराजीनें भाला टाकला तों व्यासराव पुढें झाला त्यास तो लागला. जखम झाली हें वर्तमान पिराजीनें बाळाजीस जाऊन कळविलें. इकडे व्यासरावानें जाधवरावाकडे फिर्याद केली. तेव्हां पिराजीस आमचे स्वाधीन करा असें जाधवरावानें बाळाजीस कळविलें. बाळाजीनें उत्तर दिलें, 'पिराजी आम्हांस शरण आला आहे, त्यास काय शिक्षा करावयाची ती आम्हीच करितों.' त्यावरून दोघेही आग्रहास पडले. जाधवानें बाळाजीवर फौज रवाना केली व पिराजीस पकडून आणण्यास सांगितलें. तेव्हां बाळाजी आपल्या पथकासह कूच करून निघाला. जाधवरावानें पाठलाग सुरू केला. तेव्हां बाळाजी पळत पळत पुरंदर किल्ल्यावर सचिवाच्या आश्रयास गेला. त्याउपर जाधवानें बारामतीवरून सुप्यास येऊन पुरंदरास शह दिला व सचिवास सांगून पाठविलें, कीं 'बाळाजीस काढून द्या, नाहीं तर, तुमचा खराबा करूं.' यावरून सचिवानें बाळाजीस घालवून दिलें. बाळाजी बाहेर पडून, कुटुंब, मुलें व अंबाजीपंत पुरंदरे यांसह निघून, पांचसातशें नवे स्वार ठेवून निरेवर आला. तेथें लढाई होऊन बाळाजी पराभव पावला. तेव्हां तो परिंचें ( ता. पुरंदर ) गांवावरून पांडवगडच्या रानांत शिरला. या वेळीं बाळाजीच्या शिलेदारांत पिलाजीराव जाधव वाडीकर व परिंच्याचे नाथाजी धुमाळ हे दोन इमानी गृहस्थ होते,

त्यांनीं हरप्रयत्न करून बाळाजीस कुटुंबसह पांडवगडच्या किल्ल्यावर सुरक्षित पोंचविलें. बाळाजीचा वडील मुलगा बाजीराव यास लढाईचा पहिला अनुभव ह्याच प्रसंगीं आला व त्याचा पिलाजी जाधवावर लोभ जडला तो अखेरपर्यंत कायम होता. पांडवगड हा किल्ला वाईजवळ आहे. ( सन १७१० ची अखेर ).

पांडवगडाहून बाळाजीनें ही हकीकत महाराजास कळविण्याकरितां अंबाजी पुरंदरे याजला साताऱ्यास पाठविलें. अंबाजी व खंडो बल्लाळ यांचा स्नेह होता. त्याच्यामार्फत शाहूस सर्व हकीकत कळली, तेव्हां त्यानें बाळाजीस साताऱ्यास बोलावून घेतलें. शाहूनेंच त्यास आश्रय दिल्यामुळें चंद्रसेनाचें कांहीं चाललें नाहीं. तथापि त्यानें शाहूकडेही निरोप पाठविला, कीं ' स्वामींनीं बाळाजीस माझ्या स्वाधीन करावें; त्यास आश्रय दिल्यास आम्हांस महाराजांचे पाय सुटतील.' त्यावरून चंद्रसेनाचें मन शाहूच्याविरुद्ध कसें बनत चाललें होतें हें दिसून येतें. जाधवाची ह्या उद्धटपणाबद्दल खोड मोडण्याकरितां शाहूनें हैबतराव निंबाळकरास बोलाविलें. तो अहंमदनगराकडे होता. तो लगेच फलटणास आला. चंद्रसेन पांडवगडास होता. हें प्रकरण विकोपास न जावें म्हणून शाहूनें खटपट केली, पण चंद्रसेनास तडजोड मान्य झाली नाहीं. चंद्रसेन पांडवगड सोडून निघाला, त्याची व हैबतरावाची गांठ आंदरकीच्या घांटाखालीं जेऊर येथें पडून एक लढाई झाली, ( सन १७११ मार्च, एप्रिल ), तींत जाधवाचा पुरा मोड झाला. नंतर तो पळून रहिमतपुरावरून पन्हाळयास गेला व उघडपणें ताराबाईस मिळाला.

ही लढाई झाल्यावर शाहूची खरी स्थिति काय आहे हें हैबतरावास कळून आलें. ताराबाई व चंद्रसेन यांजकडून त्याजकडे बोलणीं आलीं,

१ —सालपें व वाठार यांचेमध्यें रेल्वेचें आंदरकी स्टेशन असून जेऊर गांव फलटणचे हद्दींत आहे.

तेव्हां सर्व सरदारांनीं शाहूस सोडिलें आहे असें पाहून, हैबतरावही मनांतून ताराबाईकडे गेला, मात्र तसें त्यानें उघडपणें केलें नव्हतें. तथापि शाहूकडे आतां म्हणण्यासारखा सरदार कोणीच राहिला नव्हता. परसोजी भोसले व चिमणाजी दामोदर आपापल्या सैन्यासह वऱ्हाडांत व खानदेशांत होते. मुलुखगिरीवर असल्यामुळें राज्यपदाच्या तंट्यांत ते आपला संबंध ठेवीत नव्हते. अमृतराव बांडे नासिक नंदुरबारकडे होता. चंद्रसेन जाधव फितल्यामुळें मुख्य फौज शाहूच्या हातांतून गेली. फक्त बाळाजी विश्वनाथाबरोबर जाधवाच्या सैन्यांतून फुटून आलेले होनोपंत वरेकर, नारोराम शेणवी, जीवनराम सुमंत औरंगाबादकर, कोकाटे व पिलाजी जाधव, अशा शिलेदारांची दोन हजार फौज मात्र शाहूजवळ साताऱ्यास होती. ह्या मंडळीस फोडण्याचें कामही बाळाजीनेंच केलेलें दिसतें. हे सर्व शिलेदार नवीनच कामावर रुजू झालेले असून लोकांत त्यांचें वजन नव्हतें. अशा भयंकर अडचणींत शाहू सन १७११ त होता. या बिकट प्रसंगीं बाळाजीनें करामत करून त्याची बाजू संभाळली नसती, तर शाहूचा सर्वस्वी घात झाला असता. याची कल्पना मागें दिलेल्या पत्रांतील उताऱ्यावरून सहज होते. ताराबाईचा फितवा फलद्रूप होण्याचा ऐन रंग एकट्या बाळाजीच्या शहाणपणानें बिनसला. चंद्रसेन जाधव व हैबतराव निंबाळकर यद्यपि फितून गेले, व शाहूजवळ सैन्य बिलकूल राहिलें नाहीं; तत्रापि बाळाजीनें आपल्या जवळची दोन हजार व आयत्या वेळीं पैसे देऊन उभारलेली बाहेरची कांहीं फौज जमवून सर्व नवीन तयारी केली. ह्या कर्तबगारीबद्दल शाहूनें ' सेनाकर्ते ' ही पदवी होनाजी अनंत याजकडे होती, ती काढून बाळाजीस दिली. [ २० आगस्ट सन १७११ ]. सेनाकर्ते याचा अर्थ सेना बनविणारे, नवीन निर्माण करणारे, असा आहे. ( रा. खं. २ प्र. ) ' बाळाजी विश्वनाथ सेनाकर्ते यांसीं लष्करचा जमाव करावयाची आज्ञा करून जमावाचे बेगमीबद्दल महाल मोकासे मिळून

सरंजाम दिला, रु. २५१०२०० मु. किल्ले सातारा. अधिक भाद्रपद वा ५ भौमवासर शके १६३३.' ( शा. म. रो. १०१ ). शाहूवरील भयंकर प्रसंगाचा अंदाज व बाळाजीचा त्यास झालेला उपयोग यांचा उल्लेख ग्रँटडफनें केलेला आहे. तो म्हणतो, 'या वेळीं राज्यांत इतकी अंदाधुंदी चालू होती कीं, नशिबाचा जोर एकाएकीं शाहूस मिळाला नसता तर, किंवा त्याचा कारभार व्यवस्थितपणें हांकला गेला नसता तर, त्यास राज्यपदास मुकावें लागलें असतें. बाळाजीनें शाहूच्या मंडळींत उत्साह उत्पन्न केला व कारभारांत प्रमुखत्व संपादिलें.'

बाळाजी विश्वनाथाचा उपयोग शाहूस कसकसा होत गेला, याचें यावरून अनुमान करतां येतें. बाळाजीस 'सेनाकर्ते' पद मिळण्याच्या अगोदर सुमारें आठ महिने म्हणजे जानेवारी १७११ ( १७१२ ? ) त शाहूनें परशुराम पंतास कैदेंतून मोकळें करून प्रतिनिधिपदावर स्थापिलें, ही गोष्ट बाळाजी व खंडो बल्लाळ यांच्याच मध्यस्थीनें झालेली दिसते. प्रतिनिधीसारखा वजनदार गृहस्थ कैदेंत ठेविल्यानें प्रतिपक्षांच्या मनांत शाहूविषयीं वैषम्य कायम राहून तितका त्यांस ज्यास्त जोर येतो, हें जाणून शाहूनें परशुरामपंतास बंधमुक्त करून प्रतिनिधिपद गदाधर प्रल्हादचें काढून परशुराम त्रिंबक यास दिलें. ( जिल्काद ६ इहिदे अशर, शा. म. रो. १११ ) 'गदाधर भट्टाचा भट्टी कारभार यथास्थित बंद न होय, हें लक्ष महाराजांनीं समजून, परशुरामपंत कैदेंत असतां त्यानें महाराजांचें खर्चाबेचाचें साहित्य केलें, न्यून पडों दिलें नाहीं. पदायोग्य मनुष्य, जाणून प्रतिनिधीचीं वस्त्रें दिलीं. ( स. १७११ ). पंतांनीं सरकार लक्षांनीं वागावें अशी निखालसता केली; आपलेसे केलें. तसेंच राज्याची पोतदारी राज्यस्थापना झाल्यापासून श्रीगोंदेकर पुंडे याजकडे असून, पुंडे हे ताराबाईकडे राहिले. सबब त्याजकडून पोतदारी काढून कृष्णाजी जोशी नाईक याजला देण्यांत आली. 'जोशी यांणीं मोगलाईंतून येते समयीं स्वामींच्या

व स्वामींच्या राज्याचे कल्याणाविषयीं बहुत श्रमसाहस करून एकनिष्ठेनें सेवा केली, त्याजवरून स्वामी कृपाळू होऊन पोतदारीचा धंदा हुजूरचा व सरकारकून व सरदार यांजकडील वंशपरंपरेनें करार करून सनदा करून दिल्या आहेत. ' (भा. व. प. या. ५८) याचाच मुलगा वासकर जोशांचा पूर्वज महादाजी कृष्ण होय. 'रा. महादाजी कृष्ण व गोविंदकृष्ण उपनाम ज्योतिषी, गोत्र शांडिल्य, हे स्वामींचे पुरातन सेवक, थोरले स्वामींपासून बहुत निष्ठेनें सेवा केली व संभाजीराजे काका यांची सेवा केली, त्या उपर ती० स्वामी चंजीस असतां, ताम्राचें संकट प्राप्त झालें, ते समयीं महादाजी कृष्ण हे संताजी व धनाजी समवेत फौजा घेऊन गेले, विशेषात्कारें सेवा केली, त्याजकरितां स्वामींनीं चंजीचे मुक्कामीं मौजे खवली हा गांव इनाम दिल्हा. त्या उपरी मशारनिल्हेनीं व त्यांचे पुत्र बाळाजी महादेव यांनीं रा० शिवाजीराजे दाजी यांची सेवा केली. ऐशास महादाजी कृष्ण व गोविंद कृष्ण, महादाजीचे पुत्र बाळाजी, रामचंद्र व कृष्णाजी हे स्वामीचे एकनिष्ठ सेवक, सबब मौजे खवली गांव त्यांजला वंशपरंपरेनें इनाम करून हें आज्ञापत्र सादर केलें असे. ' हें कोल्हापुरच्या संभाजीचें इनामपत्र स. १७२२ चें आहे. ( खं. २०—२८४ ).

कृष्णाजी नाईक हा पूर्वी शिवाजीपाशीं पन्हाळ्यास सुरनीस असून शिवाजीनें तंजावरचा हिस्सा मागण्यास भाऊ व्यंकोजीकडे तीन भले इसम पाठविले त्यांत हा एक असावा, असा तर्क आहे. ' बाळाजी विश्वनाथाची स्थापना रांगण्याचे मुक्कामीं ताराबाईचे हातें महादाजीनें केली, ' महादाजीच्याच मदतीनें बाळाजीचा कान्होजी आंगऱ्याशीं स्नेह जमून त्यास बाळाजीनें शाहूचे बाजूस वळाविलें. ' चित्पावन जातीमध्यें श्रीवर्धनकर देशमुख अवतंस झाले. बाळाजीपंतांनीं महादाजीपंतास ह्मटलें जे, 'तुमची कन्या बाजीराव पुत्रास करीन. बहुत वजीद झाले, तेव्हां कन्या काशीबाई दिली. त्यावर कितेकां दिवशीं बाळाजीस पेशवाई जाली. ' असे उल्लेख,

भा. इ. सं. मं. च्या पंचम संमेलन ( श. १८३९ चे ) प्रसंगीं रुजू झालेल्या कागदांत आहेत. त्यावरून बाजीरावाचें लग्न १७१३ चे पूर्वीं झालें. यावरून बाळाजीनें महादाजी कृष्णास पुढें आणिलें असा प्रकार नसून, महादाजी सावकार असल्यामुळें त्याच्या मदतीचा व स्नेहाचा बाळाजीस चांगला उपयोग झाला, असा प्रकार दिसून येतो.

---

## प्रकरण दुसरें.

छ. शाहू, बाळाजीची पेशवाईवर नेमणूक.



**१ शिवाजीची कैद, व संभाजीची स्थापना ( स. १७१२ ).**—शाहूच्या विरुद्ध जोराचीं कारस्थानें चंद्रसेन जाधव वगैरेचीं चालू असतां, इकडे ताराबाईचा व रामचंद्रपंताचा पुनरपि बेबनाव सुरू झाला, आणि त्याचा फायदा शाहूस मिळाला. ताराबाई ( खं. ८—१६९ च्या पत्रांत) ह्मणते, ' कालपरत्वें आमचा प्रसंग विसकळित होऊन, चि. रा. संभाजीराजे व राजसबाई यांणीं, गिरजोजी यादव, अंताजी त्रिमळ, व गडकरी

व तुळाजी शितोळे यांसी पुढें करून, किल्ले पन्हाळा येथें संभाजी राजे यांसी राज्यपदास बैसविलें; आम्हांस संकटीं ( कैदेंत ) घातलें, बहुत निकड केली. ' येणेंप्रमाणें ताराबाईच्या हातचा डाव जाऊन तो संभाजी व राजसबाई यांणीं उचलिला. शिवाजीनें राज्य अकरा वर्षें केलें आणि संभाजीराजे शके १६३४ नंदन नाम संवत्सरांत ( १७१२ ) सिंहासनारूढ झाले ( भा. इ. सं. मं. इ. वृ. १८३४ ले. ६० ). स. १७१२ त शिवाजी फक्त कैदेंत पडला. मरण पावला म्हणून डफचा लेख आहे तो चूक होय. पुढें हा शिवाजी स. १७२६ त वारला. ताराबाईबरोबर शिवाजीच्या दोघी बायका भवानीबाई व पार्वतीबाई याही कैद झाल्या. ' प्रतिपक्षाचा पाडाव करण्याकरितां लढाया करणें, सरदार फोडणें, मोगलांचें पाठबळ घेणें वगैरे युक्त्या तर शाहूनें योजल्याच. पण त्याशिवाय अत्यंत नाजूक युक्ति ह्मणजे छत्रपतीला वेडा ठरवून ताराबाईच्या हातचें शस्त्र काढून घ्यावें, ती शाहूनें व बाळाजीनें योजिली. राजसबाई व संभाजी यांस फारशी स्वतंत्रता नसल्यामुळें त्यांना ताराबाईच्या कचाटींतून निसटून जाण्याची फार इच्छा होती. शाहूनें व बाळाजीनें सल्ला दिल्यावरून त्यांनीं ताराबाई व शिवाजी यांस पन्हाळयावर कैद केलें; आणि आपण

---

(१) खं. ३ ले. २३९ चें इनामपत्र ता० १६ नोव्हेंबर स० १७१३ चें शिवाजीच्या नांवचें आहे. परंतु त्यावर निळकंठ मोरेश्वर पिंगळयाचा शिक्का आहे. निळकंठ मोरेश्वर या वेळेस जिवंत नव्हता, तेव्हां हें पत्र खरें नसेल, अगर त्याची मिति चुकली असेल. शिवाजी स. १७१२ त कैद झाला याविषयीं संशय घेण्यास जागा नाहीं. शिवाजीच्या पदच्युति व मृत्यूसंबंधानें विवेचन ३-५-१९१० च्या केसरींत रा० आठल्ये यांनीं केलें आहे. का. सं. पत्रें यादी ले० ४९२, पृ० ५०५ वर ' ताराबाईचे पुत्र शिवाजीराजे चैत्र शु० २ पराभव नाम सं० शके १६४८, राजशक ५३ सालीं शांत झाले, ' असा स्पष्ट उल्लेख असून, भारत वर्षांतील शकावलींत ही असाच काळ दिलेला

कोल्हापुरची राज्यसूत्रे धारण केली. या कामांत संभाजीला शाहूचें साह्य होतें, ह्मणून संभाजी शाहूचा मिंधा राहिला आणि ताराबाईकडून होणारा शाहूचा जाच कायमचा बंद पडला. शाहूचें साह्य घेतल्यामुळें संभाजी बहुतेक त्याचा अंकित झाला. ' ( राजवाडे–ग्रंथमाला मार्च १९०४ ).

इत उत्तर राज्यकारभारांत ताराबाईचें महत्त्व राहिलें नाहीं. घरांतील व्यवहारांत मात्र तिला विचारून कारभार होत असे. लौकिकांत ताराबाई वजनदार होती, पण क्षुद्र दृष्टि, क्षणिक बुद्धि, तापट स्वभाव आणि शिवाय स्त्रीजात यांजमुळें स्वतः समरांगणांत फौजा चालवून लोकांवर छाप बसविणें तिला शक्य नव्हतें. मुत्सद्देगिरीचा गंधही तिला नव्हता. स्वार्थ, हट्ट, संशय, सत्ता मिरविण्याची हौस, इत्यादि दोष मात्र तिच्यांत भरपूर होते. या दोषांमुळें, जरूर नसतां, पन्नास वर्षें पावेतों, मराठशाहींत तिनें नानातऱ्हेच्या उलाढाली केल्या, पण कोणासच निर्धास्तपणें काम करूं दिलें नाहीं. स्वतः तिच्या पक्षांतले म्हणून जे लोक होते, त्यांचेंही तिनें चालूं दिलें नाहीं. निदान वर्ष दोन वर्षें पावेतों केलेले प्रयत्न विफल झाल्यावर तरी, तिनें

---

आहे. ( पृ. ७ ). ह्मणजे या शिवाजीचा मृत्यु स. १७२६ च्या एप्रिलांत झाला असें होतें. यास विरोधी पुरावा अगर उल्लेख कोठेंही बाहेर आलेला नाहीं. रामचंद्रपंताचा मुलगा भगवंतराव हा अमात्य झाल्यावर, शिवाजी नजर बंद असतां स. १७२६ त मृत्यु पावला, आणि त्याच सालांत त्याचा मुलगा रामराजा यास सुरक्षिततेकरितां ताराबाईनें बावड्यास अमात्याकडे पाठविलें. या रामराजाच्या जन्मकाळा संबंधानेंही संशय आहे. स. १७४५ त रामराजा सतरा अठरा वर्षांचा होता असें ताराबाई ह्मणते ( खं ८—१६९ ) व स. १७५० त नानासाहेब पेशवे ह्मणतो रामराजा बावीस तेवीस वर्षांचा आहे. ( इ. सं. ऐ. टि. भा. १ अं. ४२ ). यावरून रामराजाचा जन्म शिवाजीच्या मृत्यूपूर्वी नुकताच स. १७२६ च्या सुमारास झाला असें ठरतें. देवीच्या आजारानें शिवाजी स. १७१४ त वारला, आणि रामराजा स. १७१२त

माघार घेतली असती तर राज्याचा फायदा झाला असता. ताराबाईच्या कारस्थानांनीं जुने अनुभवी मुत्सद्दी निरुपयोगी झाले; आणि जे नवीन होतकरू व साहसी लोक पुढें आले, त्यांस पाठबळ मिळालें नाहीं. याच स्वभावामुळें प्रस्तुत तिला बंदिवास प्राप्त झाला, आणि शाहूच्या निधनोत्तर कांहीं वर्षें जरी तिनें पुनः खटपटी केल्या, तरी तिच्या आयुष्याचीं एकंदरींत सुमारें चाळीस वर्षें कैदेंत गेलीं, म्हणजे तिला कोठें तरी अडकवून ठेवण्यांतच राष्ट्रकर्त्यांस राज्याची सुरक्षितता वाटली हें निर्विवाद आहे.

चंद्रसेन जाधव ताराबाईकडे निघून गेल्यानें उत्पन्न झालेली अडचण दूर करण्याकरितां तूर्तातूर्त शाहूनें बाळाजी विश्वनाथास सेनाकर्तेपद दिलें, तेव्हां पासून म्हणजे ऑगस्ट स. १७११ पासूनच्या दोनवर्षांत बाळाजीनें नानाप्रकारचे उद्योग करून प्रथम ताराबाईचा पक्ष हतप्रभ केला, अंतस्थ संधानांनीं तिच्या पक्षांतील प्रमुख मंडळी शाहूचे बाजूस आणिली; आणि जे उघड बंडें करीत होते, त्यांजवर चालून जाऊन त्यांचा बंदोबस्त केला. दोन वर्षांत हीं कामें केल्याबद्दल शाहूनें त्यास पेशवाईचें पद दिलें. तें सांगण्यापूर्वीं वरील कामें बाळाजीनें कशीं केलीं, तें प्रथम सांगितलें पाहिजे.

ताराबाई कैदेंत पडल्यानें चाललेल्या युद्धास निराळें स्वरूप प्राप्त झालें. चंद्रसेनासारखी आग्रही मंडळी सोडून दिली तर इतर लोक त्या युद्धांत

---

जन्मला, हीं रा. राजवाड्यांचीं विधानें चूक आहेत. या बाबतींत रा० आठल्ये यांचें प्रतिपादन मुद्देसूद व स्पष्ट आहे. ' पन्हाळ्यास तीर्थरूप नजरबंद असतां आमचा जन्म झाला ' असा स्वतः रामराजाचा उल्लेख आहे ( इ. सं. पेशवे द० माहिती ले. ४४ ); ' ते प्रसंगीं ( कैदेंत असतां ) शिवाजीराजे यांसि संतान पार्वतीबाई यांसी दोघे पुत्र झाले. त्यांपैकीं पहिला पुत्र क्रमला. दुसरा पुत्र, त्यासि देवी सगर्भ होती, प्रसूत झाली. त्याचा फेर मोबदला करून हा मूल देवीच्या स्वाधीन केला, पालग्रहण करविलें. त्यानंतर चिरंजिवास देवी येऊन कालवशें समाप्त झाले. सौ० भवानीबाई पोटीसी होती, ती प्रसूत झाली, पुत्र झाला तो चिरंजीव संभाजीराजे व राजसबाई यांणीं कपट

फारसें लक्ष घालिनातसे झाले. ताराबाईची दुराग्रही सत्ता अदृश्य होतांच उभय पक्षांत विचारशीलतेची शांत भावना उत्पन्न होऊं लागली. युद्धाचे दुष्परिणाम अनुभवावे लागल्यानें तिऱ्हाईत लोकांस त्याचा कंटाळा आला; आणि दोनही पक्षांकडील मुत्सद्दी युद्ध थांबवून तडजोडीच्या नादास लागले. मात्र आपमतलबी व बंडखोर लोकांची गोष्ट निराळी होती; आणि त्यांचा उपद्रव कायमच होता. रामचंद्रपंत ताराबाईचे पक्षांतला असल्यामुळें तो कारभारांतून दूर झाला; आणि तितक्या पुरतें शाहूचें वजन वाढलें. रामचंद्रपंत स. १७१६ सप्टेंबरच्या पुढें व १७१८ एप्रिलच्या अगोदर केव्हांतरी वारला ( वा. वि. जोशी, सातारा. ) पुढें पुढें शाहू व संभाजी यांजमध्यें सलोखा उत्पन्न होऊन दोनही पक्षांतले मुत्सद्दी भांडण मिटविण्याच्या उद्योगास लागले. तरी स. १७३१ त तह होईपर्यंत हें भांडण कायमचें मिटलें नाहीं. उलट मध्यंतरीं प्रसंगानुसार त्यास तेजही चढलें; आणि बादशाहींतील भानगडींमुळें हा तंटा महाराष्ट्राच्या बाहेरही परिणाम दाखवूं लागला. किंबहुना, निजामाच्या वगैरे कारस्थानास तोंड देण्याच्या हेतूनें या स्वकीय युद्धांतूनच मराठशाहीचा महाराष्ट्राबाहेर फैलाव होऊं लागला.

---

बुद्धिकरून मारिला, ' असे ताराबाईचे शब्द आहेत. ( खं. ८—१६९ ). ' भवानीबाई गरोदर असतां चिरंजिवांचा काल झाला, नंतर तीन महिन्यांनीं प्रसूत झाली. ' ( भा. व. अमात्य बा. कै. पृ. १८–१९ ). ' शके १६४७ विश्वावसु सं., फसली सन ११३५ राजशक ५२ या सालीं मातुश्री ताराऊ आईसाहेब यांणीं आपला पुत्र धाकटे वेडे शिवाजीराजे यास ह्मणविला, तो सातारे किल्ल्यावर नजरबंद शाहू छत्रपतींनीं ठेविले होते ते मि. चैत्र शु. ७ रोजीं वेडे शिवाजीराजे कैलासवासी शांत झाले. ( ठाणें, भो. म. ब. रुमाल १ ला, पृ. १२२ ). शाहूनें शिवाजीला मुद्दाम वेडा ठरविलें हें रा. राजवाड्यांचें प्रतिपादनही आग्रहाचें दिसतें.

अशा रीतीनें शाहूचा जम हळू हळू बसत चालला. तो जात्या कलहप्रिय नव्हता. क्षमाशीलत्व त्याचे आंगीं पुष्कळ होतें, हें प्रतिनिधि वगैरेंच्या उदाहरणावरून उघड होतें. कोणीकडून तरी गोडीगुलाबीनें आपलें काम व्हावें, अशी समजूत धरून, भाईबंदांच्या पाठीस लागणें सोडून देऊन, सामोपचारानें जवळ असलेल्याची त्यानें प्रथम व्यवस्था केली. ' जे जे अष्टप्रधान, कारखानदार व दरखदार येऊन निष्ठेनें राहिले, त्यांचे अधिकार त्यांस देऊन चालविलें. वडील असून आईसाहेबांकडे राहिले, आणि धाकट्यांनीं सेवा केली, त्या धाकट्यांसच पदें दरख दिल्हे. सर्वांचे सन्मान करून आपले लक्षीं लाविलें. सर्व मनुष्यमात्रांस कृपा, ममता लावून वेध लाविला. तैनाता, नेमणुका, जमिनी, इनामगांव ज्याचे जसे श्रम, साहस, सेवा, त्याप्रमाणेंच बक्षिसें द्यावीं. गुण तितका प्रगट करून घ्यावा, अवगुण घेऊं नये. ' ( शा. म. च. ).

२ प्रतिनिधीची कैद व खटावकराचें बंड ( स. १७१३ ).—ऑगस्ट स. १७११ त सेनाकर्ते पद मिळाल्यापासून बाळाजीनें विशिष्ट कामें कोणतीं केलीं याची स्पष्टता पाहिजे तशी मिळत नाहीं. बहुधा स. १७१२ ची हकीकत अगदीं अपुरी आहे. मात्र लढाईत सुद्धां बाळाजीनें, चार दोन प्रसंगीं चांगली मर्दुमकी दाखविलेली असून, पुष्कळदां त्यास पळही काढावा लागला. या वेळीं चंद्रसेन जाधव, दमाजी थोरात, उदाजी चव्हाण, कृष्णराव खटावकर, व आंगरे ही मंडळी शाहूच्या विरुद्ध झगडत होती. अशा मंडळीस बखरकार पुंड असें म्हणतात. ते मुलखांत पुंडाई करीत असत, पण त्या पुंडाईचा हेतु केवळ संभाजीस मदत करण्याचा होता, मराठशाहीच्या विरुद्ध नव्हता. रा. राजवाडे म्हणतात, 'ताराबाई व शाहू यांच्या कलहाचें वर्णन खंडोबाच्या वंशजांनीं निस्पृहतेनें केलेलें नाहीं. सर्व प्रमुख मराठे सरदार ताराबाईच्या तर्फेनें झगडत होते, असें स्पष्ट न सांगतां, त्यांस पुंड, बंडखोर अशा संज्ञा चिटणिसांच्या ग्रंथांत

दिलेल्या आहेत; आणि चिटणिसांवर सर्वस्वी विश्वास ठेविल्यामुळें ग्रँट-डफ्ही फसला आहे.'

परशुरामपंत यास शाहूनें बंधमुक्त करून प्रतिनिधिपदावर स्थापिलें; आणि विशाळगडासुद्धां त्याचा प्रांत त्याच्या हवालीं केला. नंतर परशुरामपंतानें आपला वडील मुलगा कृष्णाजी यास विशाळगड व सभोंवारचा प्रदेश ताब्यांत घेण्यास पाठविलें. कृष्णाजीनें जाऊन किल्ला ताब्यांत घेतला; पण तो शाहूस सोडून उघडपणें संभाजीस मिळाला; आणि संभाजीनें त्यास आपला प्रतिनिधि केलें. ही गोष्ट परशुरामपंताच्या संमतीनें झाली कीं काय तें समजत नाहीं; पण चंद्रसेनानें जो फितवा चालविला होता, त्यांत परशुरामपंताचें अंग होतें, हें वर दाखविलेंच आहे. त्याचा व चंद्रसेनाचा पत्रव्यवहार शाहूस सांपडला, तेव्हां परशुरामपंतास त्यानें पुनः कैद केलें; व त्याचे डोळे काढण्याचा हुकूम फर्माविला. हें वर्तमान खंडो बल्लाळास समजतांच तो धांवत महाराजांकडे गेला व अशा अविचारी क्रूर कृत्यानें आपल्याच पक्षाची शक्ति कमी होईल, पराक्रमी सेवक माणूस असे मारूं नयेत, अघटित कामावर घालून मारावे, इत्यादि नानाप्रकारें महाराजांची समजूत खंडोबानें घातली; तेव्हां आपल्या स्वभावानुरूप शाहूनें परशुरामपंताची शिक्षा रद्द करून त्यास पुनरपि कैदेंत ठेविलें, आणि प्रतिनिधिपद नारो प्रल्हाद यास सांगितलें, ( सन १७१२ ? ). परशुरामपंताच्या घरसोडीचा हा परिणाम होय. या प्रसंगांतील चिटणिसाचा उपकार स्मरण्याकरितां प्रतिनिधीच्या घरीं श्राद्धाच्या दिवशीं चिटणिसांकडील एका खाशास जेवणास बोलावून, त्यास ब्राह्मणांबरोबर भोजनास बसविण्याची वहिवाट बरेच दिवस चालली होती, असें सांगतात.

कृष्णराव खटावकर हा जातीचा देशस्थ ब्राह्मण, शंभु महादेवाचे डोंगराजवळ खटाव येथें राहून, आसपासच्या मुलखांत उपद्रव करीत असे. संभाजीच्या वधापासून हा ब्राह्मण मोगलांस मिळून असल्यामुळें, त्यांजकडून

त्यास राजा असा किताब मिळाला होता. ग्रँट डफ यास या खटावच्या घराण्याकडून एक फारशी पत्र मिळालें होतें. तो म्हणतो कीं ह्या ब्राह्मण घराण्यांत बायकांत पडद्याची चाल होती. कांहीं दिवस बुध व मलवडी येथील घाडग्यांच्या देशमुखीचें उत्पन्न खटावकरांकडे होतें. अद्यापि खटाव गांवांत कांहीं उत्पन्न त्याच घराण्याकडे चालत आहे. सुमारें दहा वीस वर्षें तरी ह्या घराण्याकडून मोगलांचें साह्य उत्तम प्रकारें होत होतें. हें घराणें विद्वान् म्हणून नांवाजलेलें होतें. कृष्णरावाचे बापाचें नांव भगवंतराव व आजाचें राघवपंडित. भगवंतरावानें मोगलांची नोकरी धरून प्रतिष्ठा मिळविली. संभाजीच्या मरणानंतर बादशहाकडून कृष्णरावास खटाव परगण्याची जहागीर मिळाली, तेथें ते पुढें कोट बांधून राहूं लागले. असा हा कृष्णराव खटावकर मूळपासूनच बंडखोर होता. सन १७१३ च्या आरंभींच (?) शाहूनें बाळाजीस फौज देऊन त्याजवर पाठविलें. त्या वेळेस अटकेंत असलेल्या परशुरामपंत प्रतिनिधीचा दुसरा मुलगा श्रीपतराव महाराजापाशीं होता, त्यास परशुरामपंतानें सांगून पाठविलें, 'तुम्हीं सेनाकर्ते यांजबरोबर लढाईत जाऊन आपली शर्थ करून महाराजांस संतोषीत करून आम्हांस सोडवावें, अगर मरून जावें.' त्याप्रमाणें श्रीपतराव लढाईस जाऊन मोठ्या शिकस्तीनें खटावकरांशीं लढला. खटावकरानेंही लढण्याची शिकस्त केली, पण शेवटीं मोड होऊन कृष्णराव व त्याचा वडील मुलगा मारले गेले; मग दुसरे दोघे मुलगे शरण आले. तेव्हां तह करून महाराजांस येऊन भेटून पदरीं पडले, तेव्हां शाहूनें त्याला क्षमा करून खटाव गांव इनाम देऊन तैनात वगैरे करून पदरीं ठेविलें. कृष्णरावानें संस्कृतांत लिहिलेली विष्णुसहस्रनामावरची द्वैतमताची सुंदर टीका उपलब्ध आहे. ( भा. व. पु १, पं. प्र. ब,–टिप्पण ).

खटाव गांव सातारा रेल्वेच्या पूर्वेस १५ मैल आहे. मंबाजीचे दोघे मुलगे व्यंकोबाच्या गिरीवर अनुष्ठान करीत. पहिल्या कृष्णाजीस बाद-

खटावकराची वंशावळ.

मंबाजी
- राघो मंबाजी विद्वान पंडित
  - भगवंतराव ( शूर पुरुष )
    - कृष्णराव[शाहूनें पाडाव केलेला].
- कृष्णाजी

शहानें खटावची ठाणेदारी दिली; आणि त्याचे वंशज निजामचे राज्यांत बाराहळळीचे पाटिलकीवर गेले. दुसऱ्या कृष्णरावानें खटाव येथें दत्तमंदिर बांधून नवीन ग्रंथ उतरून घेण्याकरितां १२ लेखक निरंतर बसविले होते. तो न्याय व व्याकरण या शास्त्रांत निष्णात असून शूर होता. जेजुरीचा खंडोबा यांचा कुलस्वामी होय. तेथील खंडोबाचें देऊळ कृष्णरावानें बांधिलें, तें कायम ठेवून सभोंवारचें आवार पुढें अहल्याबाई व तुकोजी होळकर यांनीं पुष्कळ वाढविलें. चंपाषष्ठीच्या दिवशीं खंडोबास पहिला नैवेद्य खटावकरांचा होतो. [इ.वृ.१८३७ले.१९३].

इकडे श्रीपतरावाच्या मर्दुमकीची तारीफ बाळाजीनें शाहूपाशीं केल्यावरून त्याची मर्जी प्रसन्न झाली. ताराबाई व संभाजीचा पक्ष उत्तरोत्तर मोडत चालल्यामुळें, प्रतिनिधींचें घराणें शाहूस मिळत चाललें. परशुरामपंताची निखालस चालण्याची खातरजमा झाली, तेव्हां बाळाजी व खंडोबा यांचे मध्यस्थीवरून शाहूनें परशुरामपंतास सोडून पुनः प्रतिनिधिपद व बहुमान वस्त्रें दिलीं. ( एप्रिल, सन १७१३ )[1]

---

१ टीप.—हें प्रतिनिधिपद राजशक ४० विजयनाम संवत्सर वैशाख शुद्ध ५ गुरुवार रोजीं दिलें, त्या दिवशींची सनद रा. खं. २ पृ. १९ वर दिलेली आहे. राजशक ४० ह्मणजे शक १६३५, अर्थात् त्याच पुस्तकांत पृ. १५ वर राजशक ४० ला जयनाम संवत्सर दिला आहे तो चुकीचा ठरतो. जयनाम संवत्सर राज श. ४१ ला येतो. त्यामुळें रा. राजवाड्यांनीं प्रतिनिधीच्या वस्त्रदानाची मिति पृ. १५ वर एप्रिल १७१४ दिलेली एक वर्षानें मागें घेतली पाहिजे. या वरून स. १७१३ च्या एप्रिलांत परशुरामपंतास प्रतिनिधिपद

परशुरामपंत प्रतिनिधि पुढें शके १६४० ज्येष्ठ शुद्ध ८, ता० २७ मे सन १७१८ रोजीं वारला ( मेहेंदळेकृत च० ), आणि त्याचा मुलगा श्रीनिवासराव यास शाहूनें प्रतिनिधिपद दिलें. परशुरामपंतास सदाशिव, कृष्णाजी, श्रीपत उर्फ श्रीनिवास आणि जगजीवन असे चार मुलगे असून तिसरा श्रीनिवासराव हा, चुलता माधवराव यास दत्तक दिला होता, परंतु शाहूनें तें दत्तविधान रद्द करून श्रीनिवासरावास आपल्याजवळ आणून प्रतिनिधि केलें, आणि त्याजवर अखेरपर्यंत अकृत्रिम लोभ ठेविला. परशुरामपंताची योग्यता ठरविण्याइतकी माहिती उपलब्ध नाहीं. तो चतुरस्र व अनुभवी होता. कांहीं दिवस त्यानें पेशवेगिरीचें व अमात्याचें ही काम केल्याचा उल्लेख सांपडतो. त्याच्या नांवाचा मुख्य प्रधानकीचा ही शिक्का उपलब्ध आहे. ( रा. खं. १५–१७९, खं २०–१६५, सत्कार्यो० स० खं. ९—१५५, व शा०म०रो०पृ०४२ ). परशुरामपंत योद्धा होता, पण मुत्सद्दी नव्हता. धरसोडीमुळें त्याचा पराक्रम गाजला नाहीं. जमीन महसुलाच्या व हिशेबी कामांत तो चांगला वाकब असून त्यानें मुलखाची पाहणी करून जमिनींचे धारे बांधलेले आहेत. तो संस्कृतांत व मराठींत कवन करीत असे [ च० सं० वृ० पृ० ७१ ] त्याचें वृंदावन माहुलीस आहे. [ इ० वृ० १८३६–९० ]. वंशावळ पहा [ तृ० सं० वृ० पृ० १३२ ].

३. उदाजी चव्हाण.–दुसरा बंडखोर उदाजी चव्हाण. याच्या घराण्याची

---

मिळाल्यावर त्याच सालच्या नोव्हेंबरांत बाळाजीस पेशवे पद मिळालें. या अनुरोधानें कृष्णराव खटावकरावरील स्वारी स. १७१३ च्या जानेवारीपासून एप्रिलचे दरम्यान झाली. आंगऱ्यावरील मोहीम फत्ते करून आल्यानंतरच बाळाजीस पेशवे पद मिळालें हेंही शकावलीवरून उघड होतें. तथापि स्पष्ट उलगडा अन्य पुराव्यानें झाला पाहिजे.

हकीकत का. सं. प. या. ले. ४२२ येथें दिलेली आहे. राणोजी चव्हाण हा मालोजी घोरपड्याजवळ चाकरीस होता. राणोजी लढाईत पडल्यावर त्याचा मुलगा विठोजी यास मालोजीनेंच वाढविलें. मालोजीच्या मृत्यूनंतर विठोजी चव्हाण व संताजी घोरपडे यांनीं बादशहाच्या तंबूवर छापा घालून सोन्याचे कळस काबीज करून आणिले तो प्रकार मागें सांगितलाच आहे. [ मं०रि० पू० ६२७ ]. त्या वेळीं हिंमतबहाद्दर हा किताब विठोजीस मिळाला. तेव्हांपासून विठोजी रामचंद्रपंताचे हाताखालीं असे. स.१६९६ सालीं कर्नाटकांत युद्ध चालू असतां विठोजी मारला गेला. नंतर त्याचा पुत्र उदाजी यास हिंमतबहाद्दर पदाचीं वस्त्रें मिळालीं. उदाजीही पूर्वजां-सारखाच पराक्रमी असून, या वेळीं ताराबाईचे पक्षांत जाऊन शिरोळ, रायबाग, विजापूर एवढ्या टापूंत दंगा करीत होता. सांप्रत तो बत्तीस-शिराळ्यास गढी करून राहिला होता. त्याचा दंगा फार वर्षें अधून मधून चालू होता, त्याची हकीकत पुढें यथास्थळीं येईल.

**४. दमाजी थोराताचें पारिपत्य** ( सन १७१४—१८ ).— दमाजी थोराताचें बंड सुलभ रीतीनें मोडलें नाहीं. हा थोरात रामचंद्रपंत अमात्य याचे पदरचा असून जिंजीच्या वेढ्याचे वेळेस पंतानें त्यास सुपें व व पाटस हे दोन परगणे जहागीर दिले होते. तो पाटस तर्फेतील हिंगण-गांव येथें गढी करून संभाजीच्या वतीनें मुलखांत पुंडपणा करीत होता. उदाजी चव्हाण व दमाजी थोरात या उभयतांनीं सातारा प्रांतापर्यंत स्वारी करावी, चव्हाणचौथाई ह्मणून घ्यावी, गांव लुटावे, मारावे, असा क्रम चालविला. सन १७१३ त शाहूनें थोराताच्या बंदोबस्ताकरितां बाळाजी विश्वनाथ यास पाठविलें. ' ते जाऊन लढाई झाली. तहाचें बोलणें कर-ण्यासाठीं ह्मणून जवळ बोलावून, दगाबाजी करून थोरातानें बाळाजी व अंबाजी पुरंदरे यांस धरिलें, व खंडणी द्यावी ह्मणून राखेचे तोबरे वगैरे देऊन बहुत तसदी केली, त्यावरून अंबाजीपंत व पिलाजी जाधव यांनीं

बाहेर येऊन पैक्याची तर्तूद करून नेऊन देऊन, बाळाजी सुद्धां निघून आले. कित्येक ठिकाणीं असें आहे, कीं आपले दोघे मुलगे व बायको यांस थोराताजवळ ओलीस ठेवून बाळाजी बाहेर आला, व पुढें दंड भरून त्यानें बायको मुलें सोडवून आणिलीं. त्यानंतर शाहूनें सचिव नारोशंकर याच्या आईकडे व कारभाऱ्यांकडे थोरातावर स्वारी करण्याचें काम सांगितलें. थोरातानें सचिवासही कैद केलें. तेव्हां पिलाजी जाधवाचे मार्फत दंड भरून बाळाजीनें सचिवास सोडवून आणिलें. नंतर शाहू स्वतः फौजेनिशीं बाहेर पडला. सामोपचारानें थोरातास आपणाकडे आणण्याच्या इच्छेनें त्यानें जेजुरी मुक्कामीं थोरातास विश्वास देऊन भेटीस बोलाविलें. तेथें आल्यावर त्याची नानाप्रकारें शाहूनें समजूत केली. पण थोरातानें अतिशय उद्दामपणा दाखविला. त्याच वेळेस थोराताचें पारिपत्य करावयाचें; पण विश्वास देऊन आणिला असल्यामुळें त्यास फसवणें चांगलें नाहीं, असें समजून, शाहूनें त्यास सोडून दिलें. 'श. १६४० सालीं म्ह. १७१८ इसवींत बाळाजी विश्वनाथ यांनीं सय्यदाची कुमक आणून दमाजी थोरात रुस्तुमराव यांस धरून कैद केलें. पुरंदरास ठेविलें. हिंगणगांवची गढी पाडून मुळा नदींत टाकली. पांढरीवर गाढवाचा नांगर फिरविला.' ( इ. वृ. १८३५—८७; का. सं. प. या., ले. ४०२ पृ. ५०४ ).

थोरातावरील स्वारीची अशी ही संक्षिप्त व बरीचशी घरसोडीची हकीकत आहे. रा. अ. ना. भागवतांनीं भोरच्या इतिहासांत थोराताच्या बंडाळ्याची विस्तृत हकीकत दिली आहे, तिजवरून थोरातावर शाहूनें एकंदर तीन स्वाऱ्या केल्या असें दिसतें. पहिली स्वारी स. १७१२–१३ त बाळाजी विश्वनाथ व पुरंदरे यांनीं केली, तींत ते गफलतीनें बायकामुलांसुद्धां कैद झाले, तेव्हां पिलाजी जाधव व अंबाजी पुरंदरे यांनीं दंड भरून बाळाजीची सुटका केली. तरी थोराताचा पुंडावा कायमच होता. दुसरी स्वारी

सचिव व त्याचा मुतालिक रोझेकर[1] यांनीं केली. या स्वारीची तयारी शंकराजी नारायणाची हुशार बायको येसूबाई इनें केली. हीच बाई या वेळीं सचिवाची सर्व व्यवस्था मोठ्या दक्षतेनें पाहत होती. तिचा मुलगा नारो शंकर[2] हा त्या वेळीं लहान सुमारें बारा वर्षांचा असून थोरातावर चालून गेला. परंतु त्यास व त्याचे मुतालिकास थोरातानें हिंगणगांवास कैद करून ठेविलें. तेथें ते सुमारें तीन वर्षें कैदेंत होते. मुलगा कैद झाल्यानें येसूबाईस अत्यंत दुःख झालें, आणि थोरात त्याच्या जिवास अपाय करील या भीतीनें शाहूला जोरानें युद्ध चालवितां आलें नाहीं. स. १७१५ त सीदी व आंगरे यांचें युद्ध संपल्यावर शाहूनें बाळाजीला भल्या मोठ्या फौजेनिशीं थोरातावर पाठविलें. सरलष्कर, पागा, तोफखाना वगैरे संपूर्ण तयारी त्याजबरोबर शाहूनें करून दिली; हिंगणगांवची गढी पाडून बाळाजीनें थोरातास कैद करून साताऱ्यास आणिलें, आणि बेडी घालून कैदेंत ठेविलें.

थोरातास कैदेंत घालून सचिवाची सुटका केल्यावर बाळाजीनें शाहूच्या विद्यमानें पुरंदर किल्ला व सासवड हीं दोन ठिकाणें सचिवापासून मागून आपल्या ताब्यांत घेतलीं, तीं अखेरपर्यंत पेशव्यांकडेच होतीं. या संबंधांत सचिवाचा प्रदेश पेशव्यानें घेतला हा मोठा अन्याय होय, असें कित्येकांचें मत आहे, सबब त्याची थोडी स्पष्टता केली पाहिजे. हा प्रांत शंकराजी नारायणानें औरंगजेबाचे हातून सोडविल्यापासून, सचिवाच्याच वहिवाटीस होता. त्या धामधुमींत प्रांताची योग्य वांटणी करण्याचा योगच आलेला नव्हता. पंचवीस वर्षेंपावेतों मोगलांचा पिच्छा मराठ्यांचे पाठीवर होता. जो कोणी मुलूख सोडवील त्यानेंच त्याचा बंदोबस्त ठेवावा, अशी व्यवस्था

---

१ टीप—शिवाजीचा पेशवा श्यामराजपंत रोझेकर याचे वंशांतील. रोझेकर असेंच नांव शुद्ध आहे, रांझेकर नव्हे.

२ टीप—नारोशंकरास शाहूनें दिलेली सनद राजशक ३३ वैशाख व॥ ५ (मे १७०८) ची भोरच्या इ० दिली आहे. (म. रि. पा. ७५२ व इ. सं. पे. द. म. ले. ३६ पहा.)

होती. अशा संधींत शाहू सुटून दक्षिणेंत आला. सचिव लहान असल्या-मुळें त्याच्या हातून प्रांताचा बंदोबस्त होईना. पुंडावे चालूं लागले. हा प्रदेश म्हणजे शिवाजीच्या स्वराज्याचा मूळारंभ. तोच जर बंडखो-रांचे ताब्यांत राहिला तर मग शाहूचें राज्य तें कसलें ! सबब या प्रांताचा बंदोबस्त तशाच इसमाचे ताब्यांत देणें जरूर होतें. या वेळेस शाहूचा सर्व आधार बाळाजीवर होता. बाळाजीसही इतर प्रधानांप्रमाणें आपलें वास्तव्य कोठें तरी मजबूद व सोयीच्या जागीं करावयाचें होतें. सुरू झालेल्या जहागिरी पद्धतीचाच तो एक परिणाम होता. सबब पुण्याच्या जवळ आपल्या वास्तव्यास सोयीचा समजून बाळाजीनें तो प्रांत शाहूच्या विद्यमानें सचिवाकडून काढून स्वतःकडे घेतला, तो केवळ सचि-वाची सुटका केल्याचें बक्षीस म्हणून नव्हे. बाळाजी पुणें प्रांताचा सरसुभे-दार असून या भागाची त्यास चांगली माहिती होती. सचिवानें तो प्रांत खुषीनें बाळाजीस दिला असें नाहीं. शाहूनें प्रांताची आपल्या मर्जीमाफक व्यवस्था केली, ती सचिवास मान्य करणें भाग पडलें. नजीकचा सिंहगड किल्ला सचिवाकडेच होता तो सुद्धां पुढें स. १७५०त बाळाजीच्या नातवानें सचिवापासून आपल्या ताब्यांत घेतला.

यात्रमाणें बाळाजी बंडावे मोडण्यांत गुंतला असतां, इकडे चंद्रसेन जाधव केवळ संभाजीचाच पक्ष स्वीकारून स्वस्थ बसला नाहीं. निजामु-ल्मुल्क्‌च्या मार्फत मोगलांशीं संधान बांधून शाहूचा पाडाव करण्याचा त्यानें निश्चय केला. वास्तविक ही चुरस बाळाजी व चंद्रसेन यांजमध्यें होती. चंद्रसेन हट्टी व बाळाजी धूर्त होता, आणि उभयतांची योग्यता ओळखूनच शाहूनें आपलें वर्तन ठेविलें. चंद्रसेनाचा शिरजोरपणा शाहूच्या इभ्रतीस कमीपणा आणणारा असल्यामुळें, बाळाजीस चंद्रसेनाचे हवालीं करून त्याचें मन वळविणें शाहूस शक्य झालें नाहीं. संभाजीचा पक्षही निर्बल असल्यामुळें चंद्रसेनाच्या कर्तृत्वास जागा राहिली नाहीं. अर्थात् आपला

आग्रह तडीस नेण्याकरितां तो मराठशाही सोडून मोगलांकडे निजामास जाऊन मिळाला. चंद्रसेनासारखा पराक्रमी सरदार शाहूस आपणाकडे वळवितां आला नाहीं, या योगें मराठशाहीचें पुढें मोठें नुकसान झालें. निजामाचीं कारस्थानें दीर्घ काल पावेतों चालू राहण्यास तोच कारण झाला. तीं कारस्थानें मराठ्यांच्या छातीवर नसतीं तर उत्तर हिंदुस्थानांतील मराठ्यांचे उद्योग ज्यास्त सफळ झाले असते.

ज्या शेवटच्या मोठ्या प्रकरणानें बाळाजीची योग्यता शाहूच्या मनावर विशेष ठसून त्यास पेशवाई मिळण्यास कारण झाली, तें प्रकरण आंगऱ्याचें होय. कान्होजी आंगरे शाहूस मुळींच जुमानीत नव्हता आणि त्याजवर पेशवा बहिरोपंत चालून गेला असतां, उलट त्यासच कान्होजीनें अडकवून ठेविलें. तेव्हां शाहूनें बाळाजीस कान्होजीवर पाठविलें. त्या प्रकरणाची प्रत्यक्ष हकीकत देण्यापूर्वी, हे आंगरे कोण, व त्यांचा मराठशाहींत उद्योग काय, या गोष्टी, जरा विस्तारानें येथेंच सांगण्याचें स्थल आहे. कारण या घराण्याची हकीकत पूर्वी देण्यांत आलेली नाहीं, आणि पुढें मराठशाहींत झालेले आंगऱ्यांचे झगडे समजण्यासही तिची जरूर लागणार आहे.

६. **कुलाब्याचे आंगरे, पूर्वपीठिका.**[1]—नौकानयनशास्त्रांत हिंदु लोकांची प्रवीणता पुरातन कालापासून प्रसिद्ध आहे. तरी पण अर्वाचीन काळीं आपल्या इकडे त्या शास्त्राचा प्रयोग मराठ्यानींच केला. उत्तरोत्तर देशाचें महत्त्व या शास्त्राच्या उपयोगावर अवलंबून राहणार, असें जणूं काय शिवाजीस स्वप्नच पडलें होतें. निदान सातासमुद्रांपलीकडून एकमेकांवर चढाओढ करीत हिंदुस्थानांत येऊन झगडणाऱ्या कित्येक पाश्चात्य राष्ट्रांची नौकाशक्ति पाहून, आपण काय बोध घ्यावयाचा, हें शिवाजी चांगलें जाणत होता. त्याच्या वेळेपासून मराठे लोकांनीं या कामांत प्राविण्य

---

१. आधार, आठवलेकृत 'आंगऱ्यांचा इतिहास,' डग्लसचें 'बुक ऑफ बाम्बे' चेऊलची बखर, काडिंग्टनस् नाणीं इ०.

संपादिलें. त्यांत जे मराठे सरदार विशेष नामांकित झाले, त्यांमध्यें कुलाब्याच्या आंगऱ्यांचें नांव प्रमुख आहे. त्यांचा खरा व कच्चा इतिहास उपलब्ध होईल, तर नौकाशास्त्रांतील मराठ्यांचें प्रावीण्य जगाच्या निदर्शनास आल्यावांचून राहणार नाहीं.

ज्या समुद्रकांठच्या प्रदेशांत आंगऱ्यांनीं आपलें नांव गाजविलें त्यास पूर्वीं अष्टागर म्ह. आठ गांवांचा समुदाय असें म्हणत. हल्लीं या गावांचा समावेश अलीबाग तालुक्यांत होतो. या गावांत पूर्वीं चौल हा गांव फार प्रसिद्ध होता, व व्यापाराच्या योगानें तो परकीयांसही माहीत होता. पुढें शिवाजीला या प्रांताची उपयुक्तता विशेष वाटून त्यानें तेथें किल्ले बांधून आपलीं ठाणीं बसविलीं. त्यानें अलीबाग येथें सन १६८० त एक मजबूत किल्ला बांधिला, तोच कुलाबा होय. परंतु अल्पायुषी झाल्यामुळें शिवाजीस ह्या प्रांताचा बंदोबस्त मनाजोगता करतां आला नाहीं.

संभाजीच्या कारकीर्दींत ह्या प्रांतांत खालीं लिहिलेले मराठे सरदार होते. सागरगडावर माणकोजी सूर्यवंशी; खांदेरीवर उदाजी पडवळ; राजकोटावर सुभानजी खराटे; कुलाब्यावर भीवजी गुजर; आणि कान्होजी आंगरे संकपाळ यास दर्यावर्दी व फिरतीं आरमारें यांजवर मुख्य नेमिलें होतें. कान्होजी संकपाळ हा मूळचा हर्णै जवळ आंगरवाडी म्हणून गांव आहे, तेथील राहणारा असल्यामुळें त्यास व त्याच्या वंशजांस आंगरे हें उपनांव प्राप्त झालें.

कान्होजीच्या आजाचें नांव सखोजी, व बापाचें नांव तुकोजी. तुकोजी व कान्होजी हे दोघेही आरंभीं शिवाजीच्या आरमारांत नोकर होते. ते आपल्या कामांत प्रवीण व नेकीनें वर्तत असून शिवाजीच्याच वेळेस ते प्रसिद्धीस आले होते. उत्तरोत्तर त्यांनीं आपल्या कामांत कसकसा लौकिक मिळविला, हें समजण्याकरितां आंगऱ्यांचें वैभव, त्यांचे पराक्रम, व त्यांची समुद्रावरील सत्ता ह्यांची खालील हकीकत ' डग्लसचें बुक ऑफ बॉम्बे ' या पुस्तकांतून येथें उतरून घेतली आहे.

सतराव्या शतकाचें उत्तरार्ध व अठराव्याचें प्रथमार्ध या वेळीं इकडे पश्चिम समुद्रांत चांचेपणाचा धंदा फार किफायतीचा झाला होता. हल्लीं जरी हिंदुस्थानचा नौकागत व्यापार पुष्कळ वाढला आहे, तरी त्या वेळीं तो विशेष कमी होता असें समजूं नये. हल्लीं एकट्या पाश्चात्यांच्याच हातांत असल्यामुळें व हिशेबाच्या वगैरे सोयीमुळें तो पुष्कळसा वाटतो. तथापि त्या वेळीं एकंदर जगाचा बहुतेक व्यापार हिंदुस्थानाशींच चालू होता. बहुतेक राष्ट्रें आपापल्या जहाजांतून हिंदुस्थानाशीं व्यापार करीत. त्या वेळीं मोठमोठे नामांकित व्यापारी व पेढीवाले हिंदुस्थानांत होते. पैशाची किंमत आजच्यापेक्षां त्या वेळीं तिप्पट ज्यास्त होती. ह्या सर्व गोष्टी ध्यानांत घेतल्या ह्मणजे त्या वेळच्या व्यापाराची कल्पना होईल. सन १८०४ त होळकराबरोबर लढत असतां इंग्रजांस पैशाची जरूर लागली, तेव्हां अर्जुनजी नाथजी त्रिवेदी नामक सुरतेच्या एका व्यापाऱ्यानें त्यांस बत्तीस लाख रुपयांची रक्कम उसनवार ह्मणून सहज काढून दिली. व्होर्ज् व्होरा (Vorge Vora,) ह्मणून शिवाजीच्या वेळेस सुरतेस एक व्यापारी होता, त्याच्या इतका धनसंपन्न इसम त्या वेळीं सगळ्या पृथ्वीवर दुसरा कोणी नव्हता. हॅमिल्टन ह्मणतो, ' अब्दुल ' गफूर ह्मणून एक व्यापारी माझ्या ओळखीचा होता, त्या एकट्याचा व्यापार ईस्ट इंडिया कंपनीच्या एकंदर व्यापाराएवढा होता. तो मरण पावल्यावर, कंपनीचें त्याजकडे कांहीं घेणें निघालें, तेव्हां त्याच्या जिंदगींतून सुमारें एक कोट रुपये कंपनीस मिळाले. सारांश, त्या वेळच्या व्यापाराचा अंदाज अशा उदाहरणांवरून केला पाहिजे.

आंगऱ्यांचें घराणें दर्यावर्दीपणांत विलक्षण धाडसी होतें. लहानपणापासून समुद्राच्या लाटांवर हेलखावे खाऊन, त्यांच्या अंगीं कंटकपणा व धाडस हे गुण उपजतच पैदा झाले होते. तेव्हां व्यापारी जहाजांवर हात मारून संपन्न होण्याकडे ह्या गुणांचा उपयोग आंगऱ्यांनीं केला. त्या

वेळच्या व्यापाराच्या मानानेंच चांचेपणाचा धंदा किफायतशीर होता. गुलामांचा व्यापार, चांचेपणा इत्यादि शब्द आज आपण ऐकिले म्हणजे ते आपल्या कानास कसेसेच लागतात; व त्या गोष्टी प्रत्यक्ष करणारे लोक, मनुष्य ह्या नांवास योग्य आहेत कीं नाहींत अशी शंका येते. परंतु कोणत्याही गोष्टीचा विचार करणें तो परिस्थितीच्या मानानें करावा लागतो. प्रत्यक्ष इंग्रज व्यापाऱ्यांनीं सुद्धां चांचेपणांत अग्रगण्यता संपादिली होती. डग्लस्–ह्मणतो, मराठे चांचे दुष्ट तर खरेच, पण इंग्रज चांचे त्यांहीपेक्षां दुष्ट होते; कारण इंग्रजांचें ज्ञान जास्त असून त्यांची भूक शमलेली नव्हती. इंग्रजांचा तो पिढीजात धंदा, व मराठे तर त्यांत नवाशिके. किड्ड, एव्हरी, ग्रीन हे इंग्रज गृहस्थ चांचेपणांत अगदीं अट्टल ह्मणून प्रसिद्ध आहेत. प्रत्यक्ष इंग्रजांस सुद्धां त्यांचा दरारा अतोनात वाटे. या चांचेपणामुळेंच ईस्ट इंडिया कंपनीचा गव्हर्नर चाइल्ड यास मोगल बादशहाशीं युद्ध करावें लागलें. त्या युद्धास कंपनीचा खर्च ४४ लाख रुपये झाला. पण समाधानाची गोष्ट एवढीच, कीं ह्या समुद्रावरील दरोडेखोरांस इंग्लंडच्या सरकारानें आपलें पाठबळ कधीं दिलें नाहीं. एवढेंच नव्हे तर त्याच सरकारानें हा निंद्य प्रकार बंद करण्याची अतिशय खटपट केली. इंग्रजांनीं आंगऱ्यांवर शस्त्र धरिलें हा चांचेपणा नाहींसा करण्याचाच त्यांचा हिंदुस्थानांतला पहिला उद्योग होय. थोड्याच काळांत आरबी समुद्रावर पाहिजे त्या राष्ट्राचीं जहाजें निर्धास्तपणें हिंडूं लागलीं. ह्या चांचेपणाच्या धंद्यांत अनेक निरपराधी लोकांवर नानातऱ्हेचे जुलूम झाले, व अनेक निंद्य प्रकार घडले. आंगऱ्यांचा व इंग्रजांचा समुद्रावर पुष्कळ वर्षें झगडा चालू होता. त्याची हकीकत वाचली असतां ह्या पाश्चात्य कलेंत आमचे लोक इंग्रजांसारख्यांची बरोबरी करूं शकले, इतकेंच नव्हे, तर शेंकडो वर्षें त्यांनीं इंग्रजांची डाळ शिजूं दिली नाहीं, ह्याचें आज मोठें नवल वाटतें. सन १७२४ पासून १७५४ च्या दरम्यान इंग्रजांचीं दोन, फ्रेंचाचें एक

व डच लोकांचीं तीन मोठालीं लढाऊ जहाजें आंगऱ्यांनीं काबीज केलीं. इंग्रजांनीं नाना प्रकारचे कावे केले. केव्हां पोर्तुगीझांची मदत घ्यावी, केव्हां सीदीशीं सख्य करावें, व केव्हां तर नाइलाज होऊन आंगऱ्यांशींच तह करावा, असे अनेक प्रकार त्यांस करावे लागले. घेरिया ऊर्फ विजयदुर्ग किल्ल्यावर इंग्रजांचे जे गोळे जाऊन पडत, ते कापसाचे, लोकरीचे किंवा भुशाचे केले आहेत असें आंतल्या लोकांस वाटे. पश्चिम किनाऱ्यावर आंगऱ्यांशीं लढण्याचें म्हणून एक आरमार कंपनीनें निराळेंच ठेविलें होतें. त्याचा खर्च सालीना पांच लाख रुपये होता. ' ससेक्स ' नांवाचें इंग्रजांचें जहाज आंगऱ्यानें काबीज केलें, तेव्हां उभयतांत जो संग्राम मातला, तो सतत ३८ वर्षें चालू होता. आंगऱ्यांचा दरारा इतका होता, कीं आरबी समुद्रांतून येणारीं इंग्रजांचीं जहाजें किनाऱ्यावर सुखरूप आणण्याबद्दल आंगऱ्यांचे वाटाड्यास पांच हजार रुपये बक्षीस देण्याचा कंपनीचा रिवाज पुढें पुष्कळ दिवस चालू होता. आंगऱ्यांचे घराण्यांतील पुष्कळ बायकाही पुरुषांप्रमाणेंच पराक्रमी होत्या. जयसिंगाची बायको सकवारबाई हिनें सन १७९८ च्या सुमारास खांदेरी बेट काबीज केलें, तें तिजपासून परत घेण्याची कोणासच छाती होईना. तिचा नवरा पुण्यास तुरुंगांत होता, ' बेट स्वाधीन करशील तर नवऱ्याची सुटका करितों ' असें वचन शिंद्यानें तीस दिलें. त्याजवर भरवंसा ठेवून तिनें किल्ला खालीं करून दिला. पण शिंद्यानें वचनभंग करून तिचे नवऱ्यास ठार मारिलें. ही गोष्ट दुसरे बाजीराव पेशव्याच्या कारकिर्दींतील आहे. रघूजीची बायको आनंदीबाई अशीच पराक्रमी होती. ती अनेक प्रसंगीं मोठ्या शौर्यानें लढली. सीदीच्या शेजारानें व सीदीचा प्रतिकार करावा लागल्यामुळें, आंगऱ्यांचें अंगांत क्रूरपणाही बराच उत्पन्न झाला होता. निदान आंगऱ्यांच्या वाटेस जाऊन त्यांच्या अनियंत्रित जलधिसत्तेस जो कोणी अडथळा करी, त्यास विलक्षण हाल भोगावे लागत. पोत्यांत घालून सागरगडाचे टोंका-

वरून खालीं समुद्रांत कडेलोट करणें ही नेहमींची ठरलेली शिक्षा होती. आंगऱ्यांचे पदरीं उत्तम जातीचे आरबी व इराणी बहुमोल घोडे पुष्कळ असत. जमिनीवरही आंगऱ्यांचा अंमल बराच होता. शाहू छत्रपतीच्या वेळेला आंगऱ्यांचें प्रस्थ फारच मोठें होतें. लोहगडचा मजबूद किल्ला त्यांचे ताब्यांत होता. तथापि आंगऱ्यांनीं राजचिन्हें कधींही धारण केलीं नाहींत. शिवाजीच्या पश्चात् मराठशाहीवरील बिकट प्रसंगांत सीदी, मोगल व पोर्तुगीझ ह्या तीन सत्तांशीं शौर्यानें आणि हिकमतीनें टक्कर देऊन, मराठे लोकांचा अंमल समुद्रकिनाऱ्यावर कायम राखिल्यामुळें आंगऱ्यांचें घराणें राष्ट्रेतिहासांत प्रमुख समजलें जातें.

७. कान्होजी आंगरे ( सन १६९०–१७२९ ).—आंगऱ्यांचा पहिला प्रसिद्ध पुरुष तुकोजी सन १६९० च्या सुमारास मरण पावला, व त्याचा मुलगा कान्होजी हा त्याचें काम पाहूं लागला. तेव्हांपासून सुमारें दीडशें वर्षें पावेतों म्हणजे सन १८४० पर्यंत आंगऱ्यांची सत्ता आरबी समुद्रावर चालू होती असें स्थूल मानानें म्हणण्यास हरकत नाहीं. इंग्रजांच्या मुंबईस खेटा देऊन, त्यांचें राज्य सुमारें दीडशें मैल लांब व ३० पासून ६० मैल पर्यंत रुंद इतक्या जमीनीच्या टापूवर पसरलेलें होतें. सन १८४० त वारसाच्या अभावानें त्यांचें राज्य इंग्रजांकडे खालसा झालें. त्या वेळीं त्याचें उत्पन्न ३ लाखांचें होतें.

त्या वेळच्या इंग्रजांच्या हकीकती व आंगऱ्यावर दांत ओंठ खाऊन त्यांनीं पाखडलेली आग या गोष्टि वाचल्या म्हणजे कान्होजीच्या कामगिरीची कल्पना होते. आंगऱ्यास त्यांनीं चांचा म्हणजे समुद्रावरचा लुटारू या विशेषणानें संबोधून कांहीं विशेष हकीकत दिली आहे.

---

१ टीप—उदाहरणार्थ पहा. VictorSurridge's India (Romance of Empire Series ) T. C. and E. C. Jack,—Chapter 4, Angria the Pirate, and Chapter 5, How the British fought the Pirates. ].

याचा एक मासला येथें देतों. दर्यावर लूट करणाऱ्या या सरदाराची हांव विजयदुर्ग हस्तगत करूनच थांबली नाहीं. पोर्तुगीज व इतर व्यापाऱ्यांस घालवून देऊन पश्चिम किनाऱ्यावर बंदरें व किल्ले बांधून तो एक स्वतंत्र राजाच बनला. एकदां सुंदर आरबी घोड्यांनीं भरलेलें जहाज सहज गत्या त्याच्या हस्तगत झालें, तेणेंकरून नवीन घोडेस्वारांची फौज त्यानें तयार केली. हिंदु, मुसलमान, डच, पोर्तुगीझ, फ्रेंच इत्यादि अठरा पगड जातींचे लोक रक्तानें डागळलेल्या या चोराच्या निशाणाला मान देत. अर्थात, असे लोक म्हणजे निष्ठुर व बेपर्वा असावयाचे, त्यांस बऱ्यावाइटांची चाड थोडीच असणार. एकंदरींत मराठी राज्याच्या तर्फेनें आंगरे हा पश्चिम किनाऱ्याची रखवाली करीत असतां, त्याजकडून पाश्चात्यांच्या मनमुराद संचाराला अडथळा होई, म्हणून हे लोक त्याच्या नांवानें असे खडे फोडीत. विजयदुर्गचा घेरिया किल्ला आपण केव्हां हस्तगत करूं असें इंग्रजांस होऊन गेलें होतें.

तारीख २६ डिसेंबर स. १७१५ रोजीं गव्हर्नर बून हा मुंबई बंदरांत येऊन दाखल झाला. 'पश्चिम किनाऱ्यावर आमच्या अनिरुद्ध संचारास अडथळा करील त्याची मी खोडकीच जिरविणार,' असा या नवीन गव्हर्नरानें आपला निश्चय लगेच प्रगट केला. दोन वर्षांचे आंत नऊ उत्कृष्ट लढाऊ जहाजें त्यानें मुंबईच्या बंदरांत नवीन तयार केलीं. त्यांचीं नांवेंच वाचलीं असतां, बांधणाराचा हेतु व्यक्त होतो. Britannia ब्रिटानिया, Victory विजय, Defiance मज्जाव, Revenge सूड, Fame कीर्ति, Hunter चाबूक, Hawk ससाणा, Eagle गरुड, Princess Amelia राजकन्या अमिलिया, अशीं नांवें होती. या सर्वांवर मिळून १४८ तोफा व साडेबाराशें लढाऊ खलाशी होते. याशिवाय जमिनीवरून लढण्यासाठीं अडीच हजार युरोपियन व

दीड हजार एतद्देशीय एवढी फौज मुद्दाम विजयदुर्ग वगैरे आंगऱ्यांचे किल्ले पाडाव करण्यासाठीं तयार करण्यांत आली.

ता. १७ एप्रिल स. १७१७ रोजीं हें जंगी आरमार विजयदुर्ग किल्ल्यावर आलें. तेथें किल्ला हस्तगत करण्याचा त्यानें कसून प्रयत्न केला. परंतु कान्होजी आंगऱ्याचे मारापुढें नामोहरम होऊन मुठींत नाक घेऊन आरमारास मुंबईस परत यावें लागलें. इंग्रजांचे दोनशें लोक मेले व तीनशें जखमी झाले. पण अशा अपजयानें गव्हर्नर बून खचून जाणारा नव्हता. आणखी दोन नवीन जहाजें बांधून पुनः दीड वर्षानें त्यानें आरमार प्रथम खांदेरीवर पाठविलें. पण तेथेंही चांगला मार खाऊन आरमार परत मुंबईस आलें. वरील दोन प्रसंगांनीं आंगऱ्याचा जोर ज्यास्तच वाढला हें सांगणें नको. या दोन पराभवांची बातमी विलायतेस जाऊन तेथील अधिकाऱ्यांस ज्यास्तच चेव आला. त्यांनीं राजाची मनधरणी करून मुंबईस ज्यास्त मदत पाठविली. अॅड्मिरल मॅथ्यूझच्या हाताखालीं हें आरमार सेप्टेंबर १७२१ त मुंबईस आलें. पोर्तुगीझ लोकांचीही या प्रसंगीं त्यांनीं मदत मिळविली. जय्यत तयारी करून त्यांनीं या वेळीं अलीबागचा किल्ला कुलाबा याजवर हल्ला केला. परंतु पूर्वीप्रमाणेंच त्यांस ह्या प्रसंगींही हार खावी लागली. कान्होजी आंगरे जिवंत असे-पर्यंत या पाश्चात्यांचा शिरकाव पश्चिम किनाऱ्यावर झाला नाहीं. संभाजी आंगऱ्यानेंही कांहीं वर्षें चांगला टिकाव धरला आणि पोर्तुगीझांचे युद्धांत चिमाजी आपास चांगली मदत केली.

संभाजीच्या कारकिर्दींत मराठयांच्या झगड्याचा बराच भाग कोंकणांत घडल्यामुळें लढाईचें बहुतेक ओझें आंगऱ्यावर होतें. संभाजीच्या वधानें जो आपात मराठशाहीवर कोसळला, त्यामुळें आंगऱ्यांचीही बरीच पिछे-हाट झाली. त्यांच्या ताब्यांतील बहुतेक प्रदेश व किल्ले मोगलांनीं

'जिंकिले; शेवटीं तह होऊन मराठे सरदार व मोगल यांनीं तिकडचा वसूल *निमेनिम वांटून घेतला. तेव्हां माणकोजी सूर्यवंशी, सुभानजी खराटे व* उदाजी पडवळ प्रबळगडास गेले व भिवजी गुजर व कान्होजी आंगरे हे कुलाबा व खांदेरी येथेंच राहिले. त्यांत गुजर हा मुख्य असून कान्होजी त्याच्या हाताखालीं होता. तथापि सीदी व आंगरे यांचा तंटा चालूच होता. पुढें राजाराम जिंजीकडे जाऊन मोगलांस शह देत असतां, कान्होजीनेंही समुद्रकिनाऱ्यावर आपली सत्ता वाढवून मोगलांस हांकून देण्याचा क्रम चालविला. कोंकणचा सुभा व आरमाराचा अधिकार संभाजीनें भिवजी ऊर्फ सिधोजी गुजर याजकडे दिला होता. त्याच्या हाताखालीं कान्होजी आंगरे होता. ' शहाणे, शूर, मर्द जाणोन राजारामानें आंगरे यास सुवर्णदुर्गी ठेविलें. त्यांनीं तेथें राहून बहुत खबरदारीनें सर्व जंजिरे व प्रांत राखिला; कांहीं किल्ले व ठाणीं पातशाहींत गेलीं तीं जवामर्दीनें घेतलीं. झाडींतून हिंडणें, स्वाऱ्या करणें, खराब केलेले मोडलेले जागे नीट करून स्वारी शिकारी करणें, असे बहुत कर्तें, त्याजवरून महाराज ( राजाराम ) चंदीहून आल्यावर, त्यांनीं सर्फराजी करून, कान्होजीस ' सरखेल ' हा किताब दिला. ' सारांश, मराठशाहीवरील भयंकर आपातांत कान्होजी आंगऱ्यानें पश्चिम किनाऱ्यावरील मराठ्यांच्या सत्तेचें उत्तम प्रकारें संरक्षण केलें. सर्व राष्ट्रांच्या गलबतांवर तो हल्ले करी. त्रावणकोरपासून मुंबईपावेतों एकंदर किनाऱ्यावर कान्होजीची छाप बसली नाहीं असें एकही ठिकाण नव्हतें. किनाऱ्यावरचे सर्व किल्ले त्यानें मराठयांच्या ताब्यांत ठेविले. सुवर्णदुर्ग व विजयदुर्ग येथें आरमारसंबंधीं सर्व साहित्याचीं कोठारें असून कुलाबा हें आरमाराचें मुख्य ठाणें होतें. वाडीचे सावंतही राजारामास मिळून होते.

' आंगऱ्याच्या घराण्याचा संपादक कान्होजी हा अंगानें स्थूल, वर्णानें काळा, व बांध्यानें मजबूद होता. त्याचा चेहेरा उग्र व डोळे पाणीदार होते. त्याचे हुकूम कडक असून ते मोडणारास जबरदस्त शिक्षा होत असे.

*एरवीं हाताखालच्या लोकांशीं तो फार उदार बुद्धीनें, ममतेनें व बरोबरीच्या नात्यानें वागे.'* *

आंगऱ्याच्या उत्पत्तीविषयीं खालील हकीगत रा. राजवाडे यांनीं दिली आहे.—'संभाजीच्या कारकिर्दींत कान्होजी आंगरे फिरतें आरमार घेऊन कोंकणकिनाऱ्याचा बंदोबस्त करीत होता, असा उल्लेख बखरींत सांपडतो. म्हणजे स. १६८० पासून १६८९ पर्यंतच्या कालांत कान्होजी उदयास येत चालला होता. स. १६८० च्या पूर्वी कान्होजी शिवाजीच्या आरमारांत असला पाहिजे हें उघड आहे. संभाजीच्या वेळीं माणकोजी मराठे, उदाजी पडवळ, सुभानजी खराटे, व भिवजी गुजर, खांदेरी, सागरगड, राजकोट व कुलाबा ह्या चार बंदरी किल्ल्यांवर अंमलदार होते. बंदरी किल्ल्यांवरील अंमलदार आरमारांतील सरदार असलेच पाहिजेत. कान्होजी आंगऱ्याकडे ह्या वेळीं कोणता बंदरी किल्ला होता तें समजत नाहीं. स. १६८९ त संभाजीचा वध झाल्यावर कोंकणपट्टींतलि बराच भाग राहिला, नाहीं असें नाहीं. स. १६८९ नंतर माणकोजी मराठे, उदाजी पडवळ व सुभानजी खराटे आपले अंमल सोडून प्रबळगडास गेले. त्यांच्या जागीं भिवजी गुजर व कान्होजी आंगरे हे दोघे राहिले. मुख्य सत्ता उद्ध्वस्त झाली असतां, स्वतःच्या कर्तबगारीनें शत्रूला तोंड देणाऱ्या अनेक मराठा सरदारांपैकीं कान्होजी असल्यामुळें, त्याला उदयास येण्यास ही वेळ उत्तमोत्तम मिळाली. राजकोट, सागरगड व पाली ह्या ठिकाणीं मोगलांचा अंमल बसला; व कुलाबा, खांदेरी, व उंदेरी येथे मराठ्यांनीं आपला तळ दिला. दुतर्फी अंमल सुरू झाला. स. १६८९ त लढाई होऊन व स. १६९१त ह्या दोनही सत्ताधाऱ्यांमध्यें तह होऊन दुतर्फा अंमल कायम झाला. ह्या दुतर्फा अंमलासंबंधाचें भांडण म्हणजेच मराठे व सीदी यांच्यामधील भांडण होय. सीदीला जोंपर्यंत दिल्लीच्या पातशहाचें पाठबळ होतें, तोंपर्यंत

* ग्रोसचा वृत्तान्त, डगलसचे मुंबईतून, पु. २, पृ. १४८

मराठ्यांना तो फारसा जुमानीत नसे. स. १७००च्या पुढें दिल्लीच्या पातशहाचा जोर कमी कमी होत गेला, व सीदी कोंकणांत एकटाच राहिला. तेव्हांपासून सीदीची सत्ता क्षीण होत होत स. १७३७त ती अर्धमेली झाली, व स. १७५९त केवळ धुगधुगी राहिली. स. १६९८ त कान्होजी आंगऱ्याचें व सीदीचें मोठें कडाक्याचें युद्ध झालें.'

सन १६९७–९८ च्या सुमारास भिवजी गुजर व कान्होजी आंगरे यांचा आपसांत कांहीं तंटा लागला; व आंगऱ्यानें गुजर यास अटकेंत ठेविलें. पुढें गुजर लवकरच वारला व आंगरे हे मराठ्यांच्या आरमाराचा अधिपति झाला. तेव्हांपासून त्याचा प्रतिकार करण्याकरितां इंग्रज, फिरंगी व मुसलमान हे त्रिवर्ग एकत्र जमून आंगऱ्याशीं युद्ध करूं लागले. त्यांत इंग्रजांनीं हा झगडा पुष्कळ दिवस चालू ठेविला. मुसलमानांनीं मात्र थोडक्याच दिवसांत आंगऱ्याशीं तह करून युद्धांतून आपलें अंग काढून घेतलें. इंग्रज व आंगरे यांचा हा झगडा पुढें विशेष जोरानें चालला, त्यावरूनच आंगऱ्याची खरी योग्यता दिसून येते.

राजारामाच्या पुढची कान्होजीची कच्ची हकीगत उपलब्ध नाहीं. इतकें मात्र समजतें, कीं ताराबाईला या शूर पुरुषाचा फार उपयोग झाला; व किनाऱ्यावरची बाजू, सीदी वगैरे परशत्रूंशीं अव्याहत झगडून, त्यानें उत्तम प्रकारें संभाळिली. शाहू छत्रपति राज्याधिष्ठित झाल्यावर ताराबाईनें जे कित्येक सरदार आपणाकडे वळविले, त्यांपैकीं कान्होजी हा एक होय. तो बरेच दिवसपर्यंत ताराबाईच्या पक्षानें लढत होता.

७. **कान्होजीवर स्वारी व तह, (स. १७१३ ).**–बाळाजी विश्वनाथास शाहूनें कृष्णराव खटावकरावर पाठविलें, त्या वेळेस कान्होजी आंगऱ्यानें कोंकणांत ताराबाईच्या तर्फेनें बराच उच्छेद मांडिला होता. सावंतवाडीपासून मुंबईपर्यंतची कोंकणपट्टी त्याचे ताब्यांत असून, शिवाय अलीकडे मुंबईच्या उत्तरेकडील पेशव्याचे ताब्यांतील कल्याण प्रांत काबीज

करून, राजमाची, लोहगड वगैरे घांटमाथ्यावरचे किल्ले त्यानें हस्तगत केले होते. त्याच्या बंदोबस्ताकरितां शाहूनें पेशवे बहिरोपंत पिंगळे यास फौज देऊन पाठविलें, ( सुमारें सन १७१३ ).बहिरोपंताबरोबर खंडोबल्लाळचा भाऊ निळोबल्लाळ होता. आंगऱ्यानें त्यांचा पराभव करून उभयतांस लोहगडावर कैद करून ठेविलें. हें वर्तमान ऐकून शाहूला मोठी धास्ती पडली. इतक्यांत बाळाजी खटावकराच्या मोहिमेहून परत आल्याबरोबर त्यास शाहूनें बरीच मोठी फौज देऊन आंगऱ्यावर पाठविलें. त्या वेळीं कान्होजी लोहगडावर असावा. लोहगडाखालीं लोनावळ्याजवळचें वलवण म्ह. ओलवण येथें कान्होजी आंगरे लोहगडावरून येऊन बाळाजीस भेटला आणि पुढें तह होऊन लोहगड पेशव्यास मिळाला. [ एका स. का. रो. उतारे–वि. ज्ञा. वि. ऑगस्ट १९१६ ]. या आंगऱ्याच्या प्रकरणासंबंधानें खालील मजकूर सवाई माधवरावाकरितां लिहिलेल्या पेशवाईच्या बखरींत आहे. ही बखर सरकारी स्वरूपाची असल्यामुळें विश्वसनीय मानली पाहिजे ( रा. खं. ४ ).

'बहिरोपंतास धरून नेलें. राज्याचा बंदोबस्त झाला पाहिजे. पिंगळे नाकर्ते. ते समयीं परशुरामपंतास, पेशवाई तुह्मी करून राज्याचा बंदोबस्त करणें, आंगरे यांणीं घेतले त्याचें पारिपत्य करून, किल्ले घेणें, म्हणून आज्ञा केली. त्यास परशुरामपंत यांणीं विचार केला कीं बाळाजी विश्वनाथ यांजकडे फौजेचें वळण आहे; त्यांस पेशवाईचीं वस्त्रें द्यावीं; ते बंदोबस्त करतील. तेव्हां खंडोबल्लाळ यांसही महाराजांनीं विचार पुसून बाळाजीपंतनानास आज्ञा केली; त्याहीं मान्य केलें; ते समयीं वस्त्रें व शिक्केकटार प्रधानपंताची देऊन रवाना केलें. त्यांहीं तीन चार हजार फौज जमा करून दरमजल लोहगडाखालीं आले. नानाचा व आंगरे यांचा कागदोपत्रीं घरोबा होता. आंगरे यांस पत्र लिहून पाठविलें व दर मजल कुलाब्यास गेले. सरखेल पुढें सामोरे येऊन भेटीचा समारंभ झाला. उपरांत खलबतास

बसोन त्यांस सांगितलें, कीं 'तुमचा आमचा भाऊपणा. पेशवाई तुमच्या घरांत. आयते किल्ले देत असाल तरी तसेंच सांगावें.' शिक्के कटार व वस्त्रें त्यांस दाखविलीं व त्यांस विचार सांगितला कीं सरखेलीचें पद ताराबाईकडून आहेच; इकडूनही करार करून देववितों. महाराजांचे चाकर होऊन कृपा संपादून घ्यावी. त्याजवरून त्यांनीं मान्य करून राजमाची मात्र ठेवून, लोहगड व घनगड व तुंगतिकोना या किल्यांच्या चिठ्या देऊन किल्ले देवविले. जंजिरेकर हबशाचा व आंगरे यांचा कलह लागला होता तो तह करून दिला. बहिरोपंतास सोडवून समागमें घेऊन आले. महाराजांचे लोक किल्यांवर चढविले.साताऱ्यांस जाऊन महाराजांचें दर्शन घेतलें. कान्होजी आंगरे यास सरखेलीचें पद करार करून वस्त्रें व शिक्के कटार पाठविलीं.'(रा.खं४पृ.३५). तह झाला त्याचीं कलमें: १ खांदेरी, कुलाबा, सुवर्णदुर्ग, विजयदुर्ग, जयगड, देवगड, कनकदुर्ग, फत्तेगड, अवचितगड व यशवंतगड असे दहा मोठे किल्ले व बहिरवगड, कोटला, विकटगड, माणिकगड, मीरगड, सागरगड, रसाळगड, पालगड, रामदुर्ग, गढी खारेपाटण, राजापुर, अंबेड, सातवडें, कामतें, श्रीवर्धन व मनरंजन हीं सोळा लहान ठिकाणें व गढ्या, इतकीं कान्होजीला शाहूनें देऊन टाकिलीं; २ आरमाराचा अधिकार व सरखेल पदवी कान्होजीकडे कायम केली; ३ वरील कलमांत सांगितलेल्या मुलखाशिवाय बाकी सर्व नवीन जिंकलेला प्रदेश व ठाणीं कान्होजीनें सोडून द्यावीं; तसेंच, ४ त्यानें संभाजीचा पक्ष सोडून कायमपणें शाहूचे पक्षांत राहवें, असें ठरलें. मात्र राजमाची किल्ला आंगरे याजकडेच राहवयाचा होता.

या तहाअन्वयें मुंबईपासून खारेपाटणपर्यंतचा सर्व मुलूख शाहूनें आंगऱ्यास देऊन टाकिला, 'अथवा खरें म्हटलें असतां, शाहूला देणें भाग पडलें. सन १७१३ त संभाजीचा पक्ष धरून आंगरे साताऱ्यावर चाल

करून आला, तेव्हां भिऊन जाऊन शाहूनें त्याला हा सबंध मुलूख जहागीर देऊन टाकिला. ' (रा. खं.२).

चौल प्रांतांत चिटणिसाचें वतन चालत असलेलें आंगरे दडपून बसला होता, तेंही या वेळेस आंगऱ्यानें सोडून चिटणिसास परत देण्याचें कबूल केलें; वास्तविक लगेच परत दिलें नाहीं, हें पुढें दिसून येईल. एकंदरींत बाळाजीनें युक्तीनें आंगऱ्यास वळवून शाहूचें अंकितत्व पत्करण्यास लाविलें. चंद्रसेनाशिवाय बाकीचे सरदारांनीं शाहूचा पक्ष घेतला, तोच मार्ग आंगऱ्यानेंही स्वीकारिला.

मात्र वरील तहानें जंजिरेकर सीदीशीं आंगऱ्याचा तंटा लागला. गेल्या दहा बारा वर्षांत हबशानें कोंकणांत बरेच प्रांत हस्तगत केले होते, ते परत घेण्यास बाळाजीनें आंगऱ्यास मदत दिली, तेव्हां थोडा बहुत झगडा होऊन सीदी व आंगरे यांचाही तह ठरला ( सन १७१५, जानेवारी ). ह्या तहांत गोरेगांव, गोवेळ, निजामपुर, नागोठणें, अष्टमी, पाली, आश्रें व अंतोणें हे महाल सीदीच्या ताब्यांत होते, त्यांचा निंमा वसूल शाहूच्या कमावीसदारांनीं घ्यावा असें ठरलें.

बाळाजीनें आंगऱ्याचें प्रकरण केव्हां चालविलें हें निश्चित नाहीं. 'आंगरे यांचा तह सालगुदस्त झाला ' असें विधान शकावलींत ( रा. खं.२) मे १७१४ चें आहे; म्हणजे बाळाजीस पेशवाई मिळण्यापूर्वीं आंगऱ्याचें प्रकरण संपलें असावें. वास्तविक बहिरोपंतास आंगऱ्यानें अटकाविल्याबरोबर बाळाजीनें पेशवाई आपणांस द्यावी असी विनंती शाहूकडे केली असावी, आणि प्रकरण यशस्वी झाल्यास शाहूनें ती विनंती कबूल केली असावी, असें वरील बखरींतील संदर्भावरून दिसतें. या अनुमानानें आंगऱ्याचें प्रकरण सन १७१३ च्या एप्रिलपासून ऑक्टोबरपर्यंत चाललें असें म्हणतां येतें.

बाळाजी विश्वनाथाचा तह आंगऱ्यास प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष फायदेशीर झाला. प्रत्यक्ष त्यास स्वतंत्र मुलूख तोडून मिळाला, त्याशिवाय बाहेरच्या भानगडींतून त्याची मुक्तता होऊन स्वस्थता प्राप्त झाल्यामुळें कोंकणांत आपली सत्ता मजबूत करण्यास त्यास स्वस्थता मिळाली. कान्होजी शूर व हुशार होता. पुढील पंधरा वर्षांत त्यानें आपली शक्ति पुष्कळच वाढविली. सन १७१५ त ' वसईपासून सावंतवाडीपर्यंत पूर्ण स्वतंत्र किंवा अंशतः परतंत्र असे अधिकारी येणेंप्रमाणें होते. ( १ ) वसई, ठाणें, व चेऊल या ठिकाणीं पोर्तुगीझ लोक; ( २ ) मुंबईस इंग्रज; ( ३ ) जंजिऱ्यास हवशी; ( ४ ) अलीबागेस आंगरे; ( ५ ) सावंतवाडीस सावंत; ( ६ ) मालवणपासून पन्हाळ्यापर्यंतच्या प्रदेशांत कोल्हापूरकर; व ( ७ ) गोव्यास पोर्तुगीझ. आंगऱ्याच्या व्यतिरिक्त स्वतंत्र असे पांच सत्ताधारी ह्या वेळीं कोंकणांतील निरनिराळ्या भागांत असल्यामुळें, शाहूच्या वतीनें आंगऱ्यास वेळोवेळीं ह्या पांच लोकांशीं युद्धप्रसंग पडत. ' ( राजवाडे खं. २ ). ह्या युद्धप्रसंगांत आंगऱ्याला आपलें लक्ष स्वसत्ता बळकट करण्याकडे लावतां आलें, हा बाळाजी विश्वनाथाच्या तहाचा परिणाम होय. आरबी समुद्राच्या सबंद किनाऱ्यावर आपला ताबा असावा अशी आंगऱ्याची इच्छा असल्यामुळें लवकरच त्याचा झगडा इंग्रजांशीं सुरू झाला. कारण इंग्रजही दर्यावर्दी कामांत ह्या वेळेस पुढें सरसावूं लागल्यामुळें आंगऱ्याचे प्रतिस्पर्धी बनले. त्यांच्या झगड्याची हकीकत पुढें यथास्थळीं देण्यांत येईल.

बाळाजी विश्वनाथानें कान्होजी आंगऱ्याशीं तह केला, त्यावरून पुढें कान्होजीचा व शाहूचा चांगलाच प्रेमभाव जडला. त्या उभयतांची भेट स. १७१८ त जेजुरीस मोठ्या समारंभानें झाली. महाराजांनीं आंगऱ्याचा सन्मान केला. बादली चादर घातली. आंगऱ्यानीं नजर केली. बंदरी जिन्नस उत्तम पदार्थ बहुत आणिले, ते सर्व व खजिना महाराजांस नजर केला. जेजुरीस शिमगी पौर्णिमा झाली. प्रतिपदेस कूच होऊन निघाले,

तेव्हां आंगरे यांनीं पांच रंगांचा गुलाल व रंगीत सामान बहुत आणिलेलें दरकूच हत्तीवर रंग व गुलाल भरून पांच चार कोस मजल करावी. तेथपर्यंत तक्तराव्यावर ( गाड्यावर घातलेला ताफा ) नाच व रंग व गुलाल खेळत मुक्कामापर्यंत चालावें. ऐसें करीत पंचमीस सातारा येऊन पावले. जेजुरीपासून साताऱ्यापर्यंत रस्ता गुलालांनीं भरला. बहुत सफाईचीं बोलणीं होऊन महाराजांस डेऱ्यास नेऊन पंचमीस समारंभ करून वस्त्रें, जवाहीर, हत्ती, घोडे ऐसें देऊन अष्टप्रधान सरदार दरखदार सुद्धां वस्त्रें देऊन मेजवानी केली. सुभ्याच्या सनदा व महाराजांनीं बहुमान दिला तो घेऊन आंगरे परत गेले. ( स. १७१८, शा. म. ब. पृ. ४२ ).

**८. बाळाजी विश्वनाथाची पेशवाईवर नेमणूक** ( ता. १६ नोव्हेंबर १७१३ ) **व इतर नेमणुका.**—गेल्या दोन वर्षांत शाहूची बाजू पुष्कळ वर आली. खटावकर व आंगरे यांचीं प्रकरणें मिटलीं. कोल्हापुरचा संभाजी आपल्या टापूंतच वावरूं लागला. प्रतिनिधि शाहूच्या बाजूस आला. प्रमुख मंडळींपैकीं चंद्रसेन जाधव मात्र हट्टानें संभाजीलाही सोडून मोगलांकडे गेला. जितकी व्यवस्था लागेल तितकी जेव्हांच्या तेव्हां लावून स्थीरस्थावर करणें ती करून बाळाजीनें शाहूचा जम बसविला, ह्मणून अष्टप्रधानांपैकीं पद आपणास द्यावें अशी त्याची मागणी शाहूपाशीं होती. वास्तविक पेशवा हाच राज्यांत मुख्य कारभारी असें असतां बहिरोपंताचे हातून एकही काम तडीस गेल्याचा उल्लेख नाहीं, व एकाही कामांत शाहूस त्याचा उपयोग झाला नाहीं. शाहूच्या संकटसमयीं त्यास पैशाची मदत विशेष पाहिजे होती, ती बहिरोपंत करूं शकला नाहीं. बाळाजीनें अनेक खटपटीकरून पैशाची व्यवस्था शाहूस करून दिली, तेव्हां शाहूच्या मतें बहिरोपंत सहजच नालायक ठरला. अद्यापि पुष्कळ कामें व भानगडी शाहूला उरकावयाच्या होत्या. त्याचें राज्य अस्थिर होतें. केव्हां काय होईल, याचा नेम नव्हता. सबब आपल्या अत्यंत भरंवशाचा व कर्तृत्ववान पुरुष

शाहूला नेहमीं हाताजवळ अवश्य पाहिजे होता. हा इसम केव्हांही विरुद्ध पक्षास सामील होणारा असूं नये, अशी खात्री शाहूस पाहिजे होती. जुने प्रधान केव्हां काय कारस्थानें करतील याचा नेम नसल्यामुळें, आणि बाळाजीच्याही विशेष आग्रहावरून बहिरोपंतास सोडवून आणिल्याबरोबर शाहूनें बाळाजीस मुख्य प्रधानाची जागा दिली. प्रधानकीचीं वस्त्रें देण्याचें कृत्य शाहू व बाळाजी मोहिमेवर असतांच मांजरी येथें झालें; साताऱ्यास झालें नाही. खंडोबल्लाळाचें साह्य बाळाजीस पूर्ण होतें. 'कर्ता ब्राह्मण, पेशवाईस योग्य' असे खंडोबाचे उद्गार त्याचे चरित्रांत आहेत. ( इ. सं. ). दुसरा ज्यास्त लायक इसम पेशवाईचे योग्य असता तर खंडोबल्लाळानें बाळाजीस साह्य केलें नसतें, असें त्याच्या कर्तव्यनिष्ठेवरून म्हणतां येतें. पेशवाई देतांना खालील ताकीद शाहूनें बाळाजीस दिली. 'खानदेश, माळवा, व बागलाण सुभा सांगितला. पुढें हिंदुस्थानचा अंमल साधेल तो व गंगातीरीं मोगलाईतील सुभा दिला. कर्नाटकचा अंमल गेला तो बसवावा, संस्थानिकांकडून खंडण्या येत ना, त्या घ्याव्या,' अशी शाहूची या वेळीं बाळाजीस ताकीद होती. राज्यांतील दुही मोडणें, आणि राज्यवृद्धि करणें हीं दोन मुख्य कामें त्यास करावयाचीं होतीं. थोरल्या शिवाजीप्रमाणेंच मुलूखगिरीच्या जोरावर राज्यवृद्धि केल्याशिवाय शाहूची व्यवस्था लागत नव्हती. फेब्रुवारी १७१३ त दक्षिणच्या सुभ्यांवर निजामाची नेमणूक होऊन नवीनच संकट मराठशाहीवर कोसळलें, त्याचा प्रतिकार करण्यासाठीं बाळाजीसच पेशवाईचा कारभार देणें शाहूस कसें भाग पडलें, त्याची स्पष्टता पुढें मोगलांचें कलमांत होणार आहे.

सर्वांच्या मतानें शाहूनें सुमुहूर्तावर बाळाजी विश्वनाथ भट श्रीवर्धनकर यास पेशवाईचीं वस्त्रें दिलीं, तीं त्याच घराण्यांत पुढें वंशपरंपरा कायम झालीं. मुख्यप्रधानपदाचीं वस्त्रें, बादली सणगें सहा, व जवाहीर, शिरपेच तुरा, कंठी, चौकडा, ढाल, तलवार, शिक्के, कटयार, व चौघडा, साहेब-

नौबत, हत्ती, घोडे, जरीपटका, वगैरे देऊन मौजे मांजरी, प्रांत पुणें, या मुक्कामीं बाळाजीस मुख्य प्रधान केलें. ( १६ नोव्हेंबर स. १७१३, आश्विन मास, विजयनाम संवत्सर शके १६३५–धडफळे यादी–भा. इ. मं. इ. वृ. १८३५. ) पेशवेपदास सरंजाम महाल वगैरे दिले. पो कडे रांजणगांव वगैरे पांच महालांचें सरदेशमुखीचें वतन नानास दिल्हें. [ खं. ४. पे. ब. ] बाळाजीनें अंबाजी त्रिंबक पुरंदरे यास आपली मुतालकी व रामाजीपंत भानू यास फडनविसी महाराजांस विनंती करून देवविली. प्रतिनिधिपद परशुरामपंताकडे कायम झालें. अमात्यपद अंबूराव हणमंते* याजकडे होतेंच. सचिवपदावर नारो शंकर होता. सेनापतिपद

---

* हणमंते घराण्याची वंशावळ म. रि. प्रथमार्ध पृ. ७५१ वर दिलेली चुकली असल्यामुळें, रा. ब. साने यांनीं तयार केलेली खालीं दिली आहे. ( चित्रमयजगत्, जानेवारी १९१६, इ. वृ. १८३६-ले०७६ ). हनुमंते कुलामात्य भोसल्यांचे, मुद्गल गोत्री ऋक्शाखीय वैष्णव. त्रिमल्ल ऊ. तिमाजी मू. पु. हनुमंतासारखा पराक्रमी असल्यामुळें हणमंते हें आडनांव पडलें.

- त्रिमल्ल ऊ० तिमाजी
  - बाळकृष्ण चुलत बंधु.
  - नारायण स्त्री राजूबाई
    - रघुनाथ, पंडित स्त्री सीताबाई
      - नारोबा
      - त्रिमल ऊ० तिमाजी
        - गंगाधर
        - रघुनाथ
    - जनार्दनपंत
      - वासुदेव
        - बाळकृष्ण ऊ. अंबूराव
          - जगजीवन

बाळकृष्णपंत जिजाबाईचे गरोदरपणीं तिच्या जवळ शिवनेरीवर होता. नारायण ऊ० नारायणाध्वरि हा शहाजीचा मुज्मुदार. यानें विजापुरतंजावरकडे शहाजीचा प्रवेश करविला. तो १७५३ त मृत्यु पावला. रघुनाथ नारायण राजव्यवहारकोशाचा कर्ता. यानेंच शिवाजीच्या हुकुमानें संस्कृत नांवें प्रचारांत आणिलीं. बाळकृष्ण वासुदेव हाच शाहूचा अमात्य अंबूराव ऊ० बाबूराव. तिमाजी रघुनाथ हा कोल्हापुरकर संभाजीचा प्रधान होता.

मानसिंग मोरे यास देण्यांत आलें. या पदाची बरीच भानगड झालेली दिसते. धनाजीच्या मृत्यूनंतर एक वर्षभर चंद्रसेन जाधव सेनापतीचे जाग्यावर होता. तो उघडपणें बंडखोर झाल्यावर सन १७१२-१३ त त्याचा सावत्रभाऊ संताजी जाधव धनाजीचा वडील मुलगा कांहीं दिवस सेनापति होता; परंतु बाळाजीस पेशवाई मिळाली, त्या सुमारास मानसिंग मोरे सेनापति झाला. याजकडे हें काम सुमारें तीन वर्षें होतें. नंतर सन १७१७ त खंडेराव दाभाडे याजला सेनापतिपद मिळालें, तें पुढें त्याच्या कुटुंबांत कायम झालें. ( शा. म. रो. ले. १ ५ ६ ता. १० सफर सब्बां अशर मया व आलफ स. १७१७ ). मंत्रिपद रामचंद्रपंत पुंडे याजकडे होतें, तें काढून नारोराम याजकडे सांगितलें. सुमंतपद महादाजी गदाधर याजकडे होतें, तें काढून आनंदराव रघुनाथ भोपळे याजला दिलें. हा गृहस्थ औरंगाबादचा राहणारा शाहू सुटून येतांना त्याजबरोबर आला. तेव्हांपासून सातारा वगैरे काबीज करण्यांत शाहूच्या तो चांगला उपयोगीं पडला. सन १७१०तच त्यास सुमंतपद शाहूनें दिलें होतें. ( अष्ट प्र. इ. ). हा आनंदराव सुमंत स १७४८ सालीं वारला; पुढें तें पद त्याच्य वंशाकडे चाललें. ( इ. सं. पे. द. मा. पृ. ३२१-३५१ ).

पंडितराव श्रीकराचार्य हा कोल्हापुरकरांकडे गेला, सबब तें पद मुद्गलभट उपाध्ये यास दिलें. न्यायाधिशी सखो विठ्ठल याजकडून काढून होनाजी अनंत याजला सांगितली. या प्रधानांचे दिंमतीचे सरदार, मुतालिक, फडणवीस वगैरे नेमून दिले. ( शाहू म. रोजनिशी. पृ. ४४ ) याप्रमाणें अष्टप्रधान, दरकदार सरकारकून वगैरे नेमिले. नवीन व पूर्वींचे उपयोगी ऐसे पाहून घालमेली करून, यथापद्धति बहुमान देऊन, सर्वांनीं राज्याचे बंदोबस्तांत निःसीम सेवा करावी ऐशी आज्ञा केली. देवब्राह्मण ह्यांचें इनाम, अग्रहार, पूजा, नैवेद्य, नंदादीप व उत्साह वगैरे यथायोग्य चालावे, आतिथि विन्मुख जाऊं नये असें ठरविलें. सारांश, पेशव्याबरोबरच राज्यांतील इतर सर्व नेमणुका नवीन करण्यांत आल्या.

येणें प्रमाणें तूर्त बरीच स्थीरस्थावर झाली. बाळाजीची हातोटीच अशी होती कीं, एकवार हातीं आलेला डाव गमावण्याची संधिच त्यानें येऊं दिली नाहीं. बहिरोपंत शाहूच्या शत्रूंत सामील झाला नाहीं हें त्याचें सौजन्य होय. शाहूनें थोड्याच काळांत पुष्कळसे प्रधान बदलिले यावरून या जागा लायकीप्रमाणें द्यावयाच्या आहेत, वंशपरंपरा चालावयाच्या नाहींत ही त्याची समजुत व्यक्त होते. पुढें मात्र हळूहळू या व इतर नोकऱ्या अनेक कारणांनीं वंशपरंपरा चालू झाल्या. बाळाजीच्या नेमणुकी संबंधानें रा. राजवाडे म्हणतात. 'आंगऱ्यावरील भावी कामगिरी करण्याबद्दल बाळाजीस शाहूनें पेशवाई दिली. पिंगळे अटकेंत असतांना बाळाजीला पेशवाई देणें विशेष सोयीचें झालें. अटकेंतून सुटल्यावर पिंगळ्याला बरतर्फ करून, बाळाजीला पेशवाई देणें गोड व सयुक्तिक दिसलें नसतें. शिवाय शाहू प्रधानपद जुनें काढून घेऊन नवें देऊं शकतो, असें कान्होजी आंगऱ्याच्या निदर्शनास आणून देणें ह्या वेळीं जरूर होतें. कान्होजी शाहूच्या बाजूला आल्यास त्याचें सरखेलीचें पद राहील, अन्यथा काढिलें जाईल, हा अर्थ कान्होजीच्या ध्यानांत यावा, हाही पिंगळ्याची पेशवाई काढण्यांत व बाळाजीला ती ह्या वेळीं देण्यांत शाहूचा होता.' स्कॉट् वेरिंग आपल्या पुस्तकांत म्हणतो, बहिरोपंत पिंगळे आंगऱ्याच्या अटकेंत पडला, तेव्हां त्यास सोडवून आणण्याचें काम शाहूनें प्रतिनिधीस सांगितलें. प्रतिनिधीनें तें कबूल केलें नाहीं, व 'अशा प्रकारें पेशवाई मिळविण्याची उत्कृष्ट संधि त्यानें फुकट घालविली.' परकीयांना वस्तुस्थिति कशी कळत नाहीं ह्याचा हा एक मासला आहे. परशुरामपंत हा प्रतिनिधि असल्यामुळें त्यास पेशवाईचा लोभ सुटण्याचें कारण नव्हतें.

---

# प्रकरण तिसरें.

—:o:—

## मोगल रियासतीवर मराठ्यांची चढाई.

—:o:—



**१. मोगल रियासतीवर मराठयांची चढाई.**—शिवछत्रपतीच्या मृत्यूपासून औरंगजेबाच्या अखेरीपर्यंत मराठयांनीं बादशहाशीं जो प्रचंड झगडा केला तो केवळ बचावाचे स्वरूपाचा होता. या बचावानें मराठी राज्याचें संरक्षण मात्र झालें; परंतु स्वराज्यास कायमपणा येण्यास नुसत्या बचावानें काम भागत नाहीं. विरोधकांवर चढाई करून जाण्याची ताकद राज्यास दाखवावी लागते. खुद्द शिवाजीनें ही चढावाची पद्धत स्वीकारली होती, आणि शाहूची स्थीरस्थावर झाल्यावर त्या पद्धतीचा पुनरवलंब करणें हेंच मराठमंडळाचें आतां ओघास आलेलें मुख्य कर्तव्य होतें. निजामाच्या द्वारा मोगलांचें प्रचंड दडपण मराठयांच्या छातीवर असून, खरें म्हटलें तर शेंपन्नास मैलांपलीकडे शाहूची सत्ता पोंचत नव्हती. स.

१७०७ पासून १७१३ पावेतों या बाबतींत होत असलेला मोगलांचा जाच मुकाट्यानें सहनकरण्यापलीकडे शाहूस त्याच्या प्रतीकाराचा उपाय योजणें शक्य नव्हतें. चंद्रसेन मोगलांस मिळाल्यानें या प्रकरणाची निकड लागली. बाळाजी हाच आतां शाहूचा मुख्य सल्लागार असून, पुढील उद्योगासंबंधानें नानाप्रकारची वाटाघाट या दोघांची व इतर मंडळीची कैक वर्षें चालली असली पाहिजे. तिचा पुरावा कागदावर नसला तरी त्याची आपणास सहज कल्पना करितां येते. यापुढील उद्योगाचा नवीन उपक्रम बाळाजीनें केला आणि त्या योगें जी मराठशाहीच्या कारभारास त्यानें नवीन दिशा लाविली, त्यांतच बाळाजीचें व त्याच्या अनुयायांचें कर्तृत्व निदर्शनास आलें आहे. बाळाजीला पेशवाई मिळाल्यानें हा नवीन उद्योग हातीं घेण्यास तो मोकळा झाला. तेव्हां या विषयास आतां आरंभ करावयाचा आहे. त्यासाठीं प्रथम मोगल दरबार व त्यांचा दक्षिणचा कारभार यांचें स्वरूप तपशीलवार समजणें अवश्य आहे. त्यांत अनेक पक्षांचा व व्यक्तींचा संबंध येत असून त्यांचे वर्तनोद्देश समजून घ्यावे लागतात. उत्तर-मोगल बादशाही व मराठ्यांचा उदय या बाबती समकालीन असून, त्यांतील अनेक भानगडींचें व्यवस्थित स्पष्टीकरण झाल्याशिवाय एकंदर व्यवहारांची गुंतागुंत सुटणार नाहीं. सबब प्रथम तोच भाग हातीं घ्यावयाचा आहे.

२. **बादशाही दरबारांतले पक्ष.**—मोगल, इराणी, व तुराणी असे पक्ष बादशाही दरबारांत असून, त्या पक्षांच्या रचनेवर राज्यकारभाराचें धोरण पुष्कळ अंशीं अवलंबून असे. मुसलमानांनीं हिंदुस्थानदेश जिंकल्यापासून येथील संपत्तीच्या व सुखसाधनांच्या लालसेनें पश्चिम व वायव्य दिशांकडून बाहेरच्या मुसलमानांचा प्रवाह या देशांत सारखा येत होता. मोगलबाद-शाहीचा संस्थापक बाबर येथें आल्यावर ऑक्सस नदीच्या पलीकडील त्याच्या जन्मभूमींतील लोकांस मोगलबादशाहीवर आपला हक्कच आहे असें वाटून, तेव्हांपासून तिकडच्या बाजूचे लोक येथें विशेष येऊं लागले.

लष्करी बंदोबस्ताची मुख्य भिस्त बादशहा या बाहेरच्या स्वजातीयांवरच ठेवीत असत. औरंगजेब बादशहा दक्षिणेंत येऊन लढूं लागल्यावर त्यानें मुद्दाम बाहेरचे लोक एकसारखे लष्करांत आणविण्याचा क्रम सुरू केला. ऑक्सस नदीच्या उत्तरेकडील प्रांतास तुराण हें नांव असून, तिकडच्यांस तुराणी व दक्षिणेकडील प्रदेशास इराण हें नांव असून त्या बाजूच्यांस इराणी म्हणण्याचा प्रघात पडला. तुराणी हे बहुधा सुनीपंथाचे असून, इराणांत शियापंथाचें प्राबल्य असल्यामुळें, इराणी लोक शिया असत. मोगलबादशाहींत तुराणी लोकांचाच भरणा विशेष असे. तथापि कांहीं इराणी घराणींही तेथें प्रसिद्धीस आलीं. इराणांत शिराझ हें नामांकित शहर असून; कवी, हकीम व विद्वान लोक बहुधा शिराझहून हिंदुस्थानांत येत. शिया व सुनी या धर्मभेदांमुळें इराणी व तुराणी या दोन पक्षांमध्यें दरबारांत मोठा विरोध असे; मात्र हिंदु लोकांशीं प्रसंग पडला कीं ते दोघे एक होत.

सिंधुनदीच्या पश्चिमेकडील अफगाण प्रदेशांतून जे लोक येत त्यांस अफगाण म्हणत. त्यांसच पठाण अशीही संज्ञा होती. हिंदुस्थानास जवळ असल्यामुळें यांचाच भरणा बादशाही फौजेंत विशेष असे. येथेंच वसाहती करून कायमचे राहण्याचा स्वभाव या अफगाण लोकांचा होता. तुराणी व इराणी बहुधा कायमचे राहत नसत. उत्तर हिंदुस्थानांत मोठमोठीं गांवें या पठाणांनीं वसविलेलीं आहेत. बरेली गांव अलीमहंमदखानानें व फरुखाबाद महंमदखान बंगसानें वसविलें. अफगाण लोक शूर असत, पण राज्यकारभारांत त्यांचा फारसा प्रवेश नव्हता. त्यांस बुद्धि व विद्वत्ता बेताची असून, पैशाचा लोभ अनिवार असल्यामुळें, ते एक धनी सोडून वाटेल तेव्हां दुसऱ्याकडे जात. शहाजहानच्या वेळेस अफगाणांचें प्रस्थ अगदींच मोडलें, तरी औरंगजेबाच्या दक्षिणेंतील युद्धांत पुनः त्यांचा खप जोरानें वाढला. रोहिले पठाण हे अफगाणच होते.

यांशिवाय आरब, हबशी, रूमी, फिरंगी वगैरे कित्येक परकी लोक बादशाहींत होते. युरोपीय लोकांस सामान्यतः फिरंगी म्हणत; आणि कान्स्तांतिनोपलकडील तुर्क लोकांस रूमी अशी संज्ञा होती.

शिवाय, हिंदुस्थानांत कायमचे येऊन राहिलेल्या लोकांची जी संतति उत्पन्न होई त्यांस हिंदुस्थानी असें नांव होतें. बाराचे सय्यद हिंदुस्थानी म्हणविले जात. राजपूत, जाठ वगैरे लोकांचाही हिंदुस्थानी म्हणूनच उल्लेख केला जात असे. खालच्या कारकुनी पेशाच्या सर्व नोकऱ्या हिंदूंसच मिळत. खत्री, बनिया, कायस्थ वगैरे अनेक हिंदु लोक नोकरींत असत. काश्मीरचे मुसलमानही कारकुनी नोकरींत प्रवीण होते. हिंदुस्थानी लोकांत पुनः दोन भाग असत, पश्चिमेकडचा तो पंजाबी, बंगाल बहार वगैरे पूर्वेकडचा तो पूर्बिया. असे अनेक पक्ष व प्रकार बादशाहींत असून फर्रुखसेयरच्या वेळेस तर ज्याच्यावर बादशहाची मर्जी, त्याचें प्रस्थ वाढून, बाकीचे वर सांगितलेले भेद तात्पुरते नष्ट होत.

**राजा सभाचंद खत्री** हा गृहस्थ झुल्फिकारखानापाशीं होता. जहांदरशहास गादी मिळून झुल्फिकारखान वजीर झाला, तेव्हां सभाचंदास खानानें राजा असा किताब देऊन दिवाणी म्हणजे वसूल व हिशेब या कामांवर नेमिलें. झुल्फिकारखान सभाचंदाच्या मसलतीनें वागे, त्याजबद्दल दरबारच्या मंडळीस मोठा राग आला, आणि खानाचा कारभार लोकांस अप्रिय झाला. पुढें जहांदरशहाची व फर्रुखसेयरची आग्रा येथें लढाई झाली, तींत सभाचंद आपली सर्व फौज घेऊन हजर होता. या लढाईंत सय्यदांचा जय झाला, तेव्हां अब्दुल्ला सय्यदानें सभाचंदास कैदेंत टाकून त्याचें सर्व घरदार लुटून घेतलें.पुढें झुल्फिकारखान व त्याचा बाप आसदखान वगैरेंचा वध झाल्यावर सभाचंदाची पाळी आली. त्यानें अखेरपर्यंत या दुष्ट कृत्यांचा जोरानें निषेध केल्यावरून प्रथम त्याची जीभ कापून, मग त्याचा शिरच्छेद करण्यांत आला. ( ४ जुलै स. १७१३ ).

बादशाहींतील घडामोडींत शाहूचें लक्ष नेहमींच विशेष असे, आणि बादशाही पाठिंब्यामुळेंच त्याचा मराठी राज्यांत निभाव लागला. मराठशाहींतील दुफळी कशी मोडावी हाच त्याजपुढें व त्याच्या साह्य-कर्त्यांपुढें मुख्य प्रश्न होता; आणि ही दुफळी मोडण्यासाठीं त्यास बादशाही कारस्थानांत पडावें लागलें. औरंगजेबाचा पुत्र बहादुरशहा ता. २७ फेब्रुवारी सन १७१२ रोजीं लाहोर येथें मरण पावला. पुढें बहादुरशहाच्या मुलांत लढाया होऊन वडील मुलगा जहांदरशहा झुल्फिकारखानाचे साह्यानें गादीवर बसला. एक वर्षाच्या आंत फर्रुख्सेयरनें सय्यद बंधूंच्या मदतीनें जहांदरशहास ठार मारून ता. २१ जानेवारी १७१३ रोजीं बादशाही तख्त मिळविलें. फर्रुख्सेयरची ही कार-कीर्द ता. २८ फेब्रुवारी सन १७१९ रोजीं संपली. याच कारकीर्दींतील कारस्थानें व घडामोडी मराठ्यांच्या संबंधानें महत्त्वाच्या आहेत. दक्षिणेंत बादशाही मुलुखाचे ब-हाणपुर ( खानदेश ), व-हाड, हैदराबाद, बेदर, विजापुर व कर्नाटक असे सहा सुभे असून, त्या सर्वांवर मुख्य सुभेदार औरंगाबाद येथें राहत असे. शिवाय दिवाण नांवाचा एक मुलकी व हिशेबी कामदार सुभेदाराच्या मदतीस असे. शाहूच्या आगमनापासून येथें खालील मुख्य सुभेदार झालेः—

दाऊदखान पन्नी—स. १७०८-१७१३ जानेवारी;

निजामुल्मुल्क्—फेब्रुवारी १७१३ एप्रिल १७१५;

सय्यद हुसेनअली--मे १७१५ नोव्हेंबर १७१८;

आलम्अली--डिसेंबर १७१८ ऑगस्ट १७२०;

निजामुल्मुल्क—( पुनः ) ऑगस्ट १७२० जानेवारी १७२२.

इतक्या इसमांचा संबंध बाळाजी विश्वनाथाच्या कारभारांत येतो.

**३. दाऊदखान पन्नीचा कारभार** ( स. १७०८--१७१२ ). औरंगजेब बादशहाच्या वेळेपासून दक्षिणच्या सहा सुभ्यांस विशेष महत्त्व आलें.

पुढें पुढें तर दिल्लींतील कारभाऱ्यांचें पटेनासें झालें, म्हणजे दक्षिणेंत येऊन स्वतंत्र कारभार करण्याची हांव त्यांस उत्पन्न होत असे. झुल्फिकारखानास दक्षिणची सुभेदारी पाहिजे होती; परंतु बहादुरशहानें त्यास आपल्याबरोबर दिल्लीस नेल्यामुळें, दक्षिणच्या सुभेदारीवर दाऊदखान पन्नी यास झुल्फिकारखानाचा दुय्यम म्हणून बादशहानें नेमिलें. ही व्यवस्था फर्रुखसेयर गादीवर येईपावेतों म्हणजे सन १७१३ जानेवारीपर्यंत चालली. दाऊदखान हिंदूंचा बराच पक्षपाती होता; आणि मराठे सरदारांची त्यास चांगली ओळख होती. औरंगजेबाच्या मरणसमयीं मराठ्यांनीं शिवाजीच्या वेळचें स्वराज्य म्हणून होतें तेवढें बहुतेक सोडवून कबजांत घेतलें होतें. शाहूची सुटका झाली तेव्हां हें स्वराज्य त्यास देण्यांत येऊन शिवाय मोगलांच्या सहा सुभ्यांवर चौथाई व सरदेशमुखी वसूल करण्याचा हक्कही त्यास देण्यांत येणार होता; आणि त्याचे बदल्यांत शाहूनें फौज घेऊन बादशहास मदत करावी असें ठरलें होतें. परंतु ताराबाईच्या खटपटीमुळें वरील हक्कांच्या सनदा शाहूस मिळाल्या नाहींत; आणि ताराबाईशीं लढून आपला हक्क स्थापन करावा असा मुन्यिमखान वजिरामार्फत शाहूस जबाब मिळाला. पुढें वजीर मुन्यिमखान स. १७११ त मरण पावला, आणि मराठे सरदारांचा उपद्रव मोगलांचे मुलखास होऊं लागला, तेव्हां दाऊदखानाच्या मध्यस्थीनें सहा सुभ्यांवर चौथाई वसूल करण्याची परवानगी शाहूस मिळाली. [ मागील पृष्ठ ५ पहा. ] मात्र ही चौथाई त्यांनीं परभारें वसूल करूं नये, दाऊदखानानें वसूल करून द्यावी, असा करार होता. परंतु लवकरच ही व्यवस्था बदलली.

४ **निजामुल्मुकचा कारभार** ( स. १७१३–१५ ), **त्याचा कौटुंबिक वृत्तान्त.**—मराठ्यांच्या इतिहासांत निजामाचें नांव चिरस्थायी असल्यामुळें त्याच्या घराण्याचा पूर्व वृत्तान्त प्रथम सांगितला पाहिजे.

१ अर्विहन, मनूची वगैरेंच्या आधारानें.

निजामुल्मुल्कचा बाप आजा व पणजा सर्व मोठे पराक्रमी पुरुष होते. एकसारखे पुष्कळ पिढयांपर्यंत पराक्रमी पुरुष निपजल्याचीं जीं थोडीं घराणीं इतिहासांत आढळतात, त्यांपैकीं हें एक प्रमुख घराणें आहे. विशेषतः मुसलमानांच्या अमदानींत इराण, मध्य आशिया वगैरे देशांतून अनेक साहसी व पराक्रमी लोकांचा प्रवाह एकसारखा तीनशें वर्षे हिंदुस्थानांत येत होता. त्यांपैकीं जे पराक्रमी होते ते नांवलौकिकास चढले, जे हीन होते ते नाहींसे झाले. पेशवाईचे वेळेस ब्राम्हण पुढें आले हा आपण दोष मानितों, परंतु मुसलमानांचा प्रकार पाहिला म्हणजे पेशव्यांनीं कांहींच केलें नाहीं असें वाटूं लागतें. मुसलमान इतिहास वाचतांना शंभर शंभर दोनदोनशें अधिकाऱ्यांच्या नांवांत एखादादुसऱ्या हिंदूचें नांव चुकून कोठें आढळलें तर मोठें भाग्य. अर्व्हिननें उत्तर मोगलशाहीचा दहा वर्षांचा इतिहास [ १७१२–२२ ] लिहिला आहे, तेवढाच वाचून पाहिला तरी वरील विधानाची सत्यता भरपूर पटेल. औरंगजेब दक्षिणेंत असतां हिंदुस्थानच्या बाहेरून अनेक पराक्रमी मुसलमानांचा तांडा सारखा त्याजकडे येत होता. त्यांच्याच जोरावर औरंगजेबानें मराठ्यांशीं युद्ध चालविलें. त्याच्या तालमींत जीं माणसें तयार झालीं तीं पुढें पन्नास वर्षे पावेतों पुरलीं; आणि अशीं माणसें इकडे येऊन तयार होण्याचा क्रम बंद पडतांच मोगल बादशाही मोडली. राज्यकर्त्यांस आपल्या जातीचीं विश्वासाचीं माणसें राज्यांत ठेवावीं लागतात, हा प्रकार हल्लींच्या इतकाच त्या वेळीं मोगल बादशहांस व पुढें पेशव्यांसही स्वीकारावा लागला. बुद्धिमत्ता, शौर्य, राज्यचातुर्य, दीर्घायुष्य इत्यादि गुण आनुवंशिक प्रघातानें ह्या निजामाचे घराण्याचे पुरुषांत स्पष्ट दिसून येतात. निजामाचा आजा ख्वाजा आबीद हा बुखाऱ्याहून मक्केस जाण्याकरितां हिंदुस्थानांत आला. मक्केस जाणाऱ्या यात्रेकरूंची सोय त्या वेळीं मोगल बादशाहींतून उत्कृष्ट ठेवली जात असे; आणि हिंदुस्थानांतून जहाजांनीं मक्केस जाणें सोयीचें

असल्यामुळें या निमित्तानेंही पुष्कळसे बाहेरचे मुसलमान हिंदुस्थानांत येत. मनाजोगा रोजगार मिळाला तर ते येथेंच वास्तव्य करून रहात. हल्लींच्या ब्रिटिश अमलांत सुद्धां युरोप अमेरिकेंतले अनेक प्रवासी या देशांत येत असतात. तसाच कांहींसा प्रकार त्या वेळींही जारी होता. ख्वाजा आबीद मक्केहून परत आला तेव्हां राजपुत्र औरंगजेब बापाचें राज्य घेण्याकरितां दक्षिणेंतून चालून दिल्लीकडे जात होता. त्या वेळीं औरंगजेबानें आबीद यास आपल्या नोकरींत घेतलें. पुढें औरंगजेबास राज्य मिळाल्यावर आबीद यानें अजमीर, मुलतान वगैरे ठिकाणीं मोठ्या दरजाचीं कामें केलीं. ख्वाजा आबीद यास किलीचखान असा किताब बादशहानें दिला. तो तारीख ३० जानेवारी १६८७ रोजीं गोवळकोंड्याचे वेढ्यांत गोळी लागून मरण पावला. त्यास पांच मुलगे होते, त्यांपैकीं तीन पराक्रमी निघाले. सर्वांत वडील मीरशहाबुद्दीन ऊर्फ गाजी-उद्दीन फिरूजजंग हा विशेष लौकिकवान निघाला.

मीरशहाबुद्दिनचा जन्म समरकंद येथें स. १६४९--५० त झाला. उदेपुरच्या राण्याशीं लढत असतां, औरंगजेबाची एक नाजूक कामगिरी स्वतःचा जीव धोक्यांत घालून त्यानें बजावल्यामुळें बादशहानें त्यास मोठ्या पदवीस चढविलें; आणि ता.२ जानेवारी स.१६८४ रोजीं गाजीउद्दीन हा किताब दिला. (मनूची). पुढें हैदराबादचा किल्ला त्यानेंच काबीज केला. औरंगजेबानें आपला वडील मुलगा शहाआलम व त्याचा मुलगा यांस कांहीं काळ कैद केलें होतें, तें कामही बादशहानें याच सरदाराकडून करविलें. स. १७०३-४ सालीं मराठ्यांनीं माळव्यांत स्वारी केली असतां शहाबुद्दीननें त्यांचा पाठलाग केला. स. १७०७ त बादशहाचे मरणसमयीं तो वऱ्हाडच्या सुभ्यावर एलिचपुर येथें होता. बहादुरशहाची मर्जी या तुराणी मंडळीवर चांगलीशी नसल्यामुळें, त्यानें शहाबुद्दीन यास दक्षिणेंतून काढून गुजराथच्या सुभ्यावर पाठविलें, तेथेंच तो ता. ८ डिसेंबर स. १७१०

रोजीं मरण पावला, त्या वेळीं त्याचें वय साठ वर्षांचें होतें. त्याजवळ लाखों रुपयांची संपत्ति होती ती त्याच्या मृत्यूनंतर जप्त करण्यांत आली. अशा प्रकारें मयत सरदारांची संपत्ति सरकारांत घेण्याचा रिवाज मोगल बादशाहींत जारी होता. त्या वेळच्या तुराणी सरदारांत शहाबुद्दीनची गणना प्रामुख्यानें आहे. तो सुस्वभावी, रुआबदार व शूर असून राज्यकारभारांत त्याची बुद्धि उत्तम होती. शहाजहानचा प्रसिद्ध वजीर सादुल्लाखान याची मुलगी शहाबुद्दीन यास दिलेली असून तिच्याच पोटीं कमरुद्दीनखान ऊर्फ निजामुल्मुल्क याचा जन्म ता. ११ ऑगस्ट १६७१ त झाला. अर्थात् ता. २१ मे १७४८ त मरणसमयीं त्याचें वय ७७ वर्षांचें होतें. १०४ वर्षांचें त्याचें वय असल्याचा प्रवाद ग्रंटडफनें प्रचलित केला तो खोटा आहे.[1]

## निजामुल्मुल्कची वंशावळ

आलमशेख समर्कंदचा

| ख्वाजा आबीद | मीर बहुद्दीन |
|---|---|
| मीरशहाबुद्दीन, गाजीउद्दीनफिरूजजंग. | महंमद अमीनखान वजीर |
| चीन किलीचखान, निजामुल्मुल्क | कमरुद्दीनखान [ वजीर १७३९–४८ ] |

( ज. ११-८-१६७१, मृ. २१-५ १७४८ ).

[ या पुढची वंशावळ पुढें देण्यांत येईल. ]

शहाबुद्दीनचा मुलगा तेरा वर्षांचा असतां त्यास १०० घोडेस्वारांच्या तुकडीचें काम औरंगजेबानें दिलें. स. १६९० त त्यास चीन किलीचखान हा किताब मिळाला. बादशहाच्या मरणसमयीं तो विजापुरचा अंमलदार होता.

---

१ ( रा. खं. ८ पृ. २०२ ). (Irvine). एल्फिन्स्टनचे इतिहासांत हें वय बरोबर दिलेलें आहे.

बहादुरशहाचें तुराणी कुटुंबावर प्रेम नसल्यामुळें आणि झुल्फिकारखानाचा व या कुटुंबाचा खासगी द्वेष असल्यामुळें, हा निजाम व त्याचा चुलता अमीनखान यांची बादशहानें मुरादाबाद व अयोध्या इकडे बदली केली. परंतु वजीर मुन्यिमखानानें त्यास ज्यास्त महत्त्वाचें काम दिलें. पुढें कांहीं दिवस नोकरी सोडून तो घरीं बसला. बापाच्या मृत्युनंतर तो पुनः दिल्ली दरबारीं गेला, तेथें त्यास गाजीउद्दीन व फिरूजजंग हे किताब मिळाले, जहांदरशहाच्या व झुल्फिकारखानाच्या मृत्यूनंतर त्यास दक्षिणच्या सहा सुभ्यांचा अधिकार व खानखानान, निजामुल्मुल्क बहादूर हे किताब मिळाले ( १७१३ फेब्रुवारी ). त्या वेळीं बादशहानें सहा सुभ्यांवर खालील अंमलदार नेमून त्या सर्वांवर औरंगाबाद येथें निजामाची नेमणूक केली.

| | |
|---|---|
| बऱ्हाणपुर—शुकुल्लाखान; | कर्नाटक—सादुल्लाखान; |
| वऱ्हाड—ऐवजखान, | बेदर—अमीनखान; |
| विजापुर—मनसूरखान; | हैदराबाद--यूसुफखान. |

बऱ्हाणपुरास दाऊदखान पन्नी होता त्याची बदली गुजराथच्या सुभ्यावर करण्यांत आली. निजामाच्या मदतीस मुलकी कामावर ‘ दिवाण ’ ह्मणून हैदरकुलीखान याची नेमणूक झाली. या गृहस्थाचा संबंध पुढें मराठ्यांचे इतिहासांत येतो. तसेंच बखरींतून व इतरत्र वरील अनेक नांवाचा उल्लेख मराठ्यांचे इतिहासांत कारणपरत्वें येत असल्यामुळें तीं येथें मुद्दाम दिलीं आहेत.

५. **निजामाचे व बाळाजीचे परस्पर व्यूह.**—फार दिवस दक्षिणेंत राहिल्यामुळें इकडची भाषा, रिवाज, पूर्व इतिहास व प्रस्तुतचीं कारस्थानें निजामास चांगलीं माहीत होतीं. औरंगजेबाच्या राजनीतीचें त्यास बाळकडूच होतें; आणि दिल्लींतील धामधुमीचा फायदा घेऊन दक्षिणेंत स्वतंत्र पंथ काढण्याचा त्याचा विचार होता. त्याच्या दुर्दैवानें या प्रसंगीं दक्षिणचा कारभार त्याजकडे दोन वर्षांपेक्षां ज्यास्त राहिला नाहीं. नेमणूक झाल्या-

बरोबर त्यानें इकडे येऊन औरंगाबादेस ठाणें दिलें. मराठ्यांस चौथाई वसूल करूं द्यावयाची नाहीं असा प्रथमपासूनच निश्चय करून त्याप्रमाणें त्यानें सर्व तजवीज चालविली. जुलै स. १७१३ मध्यें त्यानें औरंगाबादनजीक मराठी फौजेचा एक दोनदां चांगला समाचार घेतला.

चौथाईस विरोध करण्याकरितां प्रथमपासूनच निजाम कोल्हापुरकर संभाजीच्या पक्षास सामील होता, तरी शाहूशीं सलोखा करून त्यास आपणाकडे वळविण्याचे प्रयत्न त्यानें करून पाहिले. दक्षिणेंत येतांनाच त्यानें बादशहाकडून शाहूस दहा हजारांची मनसब देवविली ( डफ १-३६० ). शाहूच्या मनांत बादशाहीसंबंधानें पूज्यभाव वसत असल्यामुळें, त्यांचा ताबेदार म्हणवून घेण्यांत त्यास वाईट न वाटतां उलट एक प्रकारचें भूषण वाटे. चंद्रसेन जाधव शाहूवर रुसून निघून गेला, त्यास निजामानें आश्रय दिला; आणि फौजेच्या खर्चाकरितां बेदरच्या पूर्वेस भालकी येथें बरीच मोठी जहागीर त्यानें चंद्रसेनास दिली. चंद्रसेनाबरोबरच सर्जेराव घाटगे हा एक नामांकित सरदार शाहूस सोडून गेला, त्याचाही निजामानें परामर्ष घेऊन, संभाजीकडून त्यास कागल येथें कायमची जहागीर देवविली, तीच हल्लींची कागलची जहागीर होय. हैबतराव निंबाळकर सरलष्कर याचा मुलगा रंभाजी निंबाळकर हा सुद्धां निजामाकडे गेला त्यास त्यानें रावरंभा असा किताब दिला, व एक लहानशी जहागीर मुद्दाम पुण्यानजीक दिली. तेणेंकरून शाहूच्या स्वराज्यांत मराठे सरदारांच्या मार्फतच निजामानें मोगलांचा उपद्रव सुरू केला. दाऊदखानाच्या पांच वर्षांच्या कारकीर्दींत जी गोष्ट साध्य झाली नाहीं, ती वरप्रमाणें निजामानें हां हां म्हणतां चार सहा महिन्यांत तडीस नेली. निजामाची

१ हल्लींच्या अमदानींत सुद्धां एखादा जबरदस्त गव्हर्नर वगैरे हिंदुस्थानांत येऊन अशा प्रकारचेंच धोरण कसें स्वीकारितो हें निजामाच्या वर्तनावरून सहज मनांत आल्याशिवाय रहात नाहीं.

तशी जबरदस्त फूस मिळाली नसती तर या सरदारांची शाहूस सोडून जाण्याची छातीच झाली नसती. निंबाळकरानें बाजी कदम नांवाच्या इसमास आपल्या तर्फेनें पुणें प्रांताचा कारभार करण्यास पाठविलें, तेव्हां पुण्यांत प्रत्यक्ष दोन अंमल सुरू झाले. ' पुणें प्रांतीं ढमढेरे याचा फिसाद वाढून त्रिंबकजी ढमढेरे याणें फाल्गुन मासीं ठाणें बसविलें. रंभाजी निंबाळकरानें ढमढेरे याचें ठाणें लुटून बाजीराव कदम याजकडे पुण्याची वहिवाट सांगितली [ भा० व० पु० २ श०, व शा० म० ब० पृ० ४३].

' शके १६२९ वैशाखमास बाजी कदम फौजदार व गुंडाबा नाईक सेखदार हे, रंभाजी निंबाळकर, नबाब आसफजाकडील सरदार, यांजकडून आले. त्यांनीं पुण्यांत अंमल बसवून ठाणें घेतलें. आठ वर्षे अंमल पुण्यांत होता. ' ( भा. इ. सं. मं. इ. वृ. १८३५ ले. ८७ ). येणेंप्रमाणें शिवाजीच्या स्वराज्यावरच निजामानें घाला घातला. चंद्रसेन जाधव व निंबाळकर रावरंभा यांच्या मदतीस फौज देऊन त्यानें पुण्यावर चाल केली. तेव्हां पुरंदर नजीक मोगलांची व बाळाजी विश्वनाथाची लढाई झाली. ( १७१३ ? ) तींत सालप्याच्या घाटापर्यंत मराठ्यांस मागें हटावें लागलें, आणि बाळाजीनें स्वतः चांगला पराक्रम गाजविला. कृष्णराव खटावकर, दमाजी थोरात, व कोल्हापुरकर संभाजी यांसही या वेळेस निजामानें शाहूवर उठविलें. त्यांचें निरसन बाळाजी विश्वनाथ तितक्याच नेटानें करीत होता. पुणें प्रांताचा बंदोबस्त एकदम करणें जरूर होतें, त्यासाठींच आंग्र्याकडून लोहगड व सचिवाकडून पुरंदर हे दोन किल्ले शाहूचें मन वळवून मुद्दाम बाळाजीनें आपल्या कबजांत घेतले; आणि लोहगडावर रामाजी महादेव भानु यास सबनिशी व हरिमहादेवास मावळची मुजमी देऊन, खास आपल्या भरंवशाचे हे दोन इसम त्या भागांत त्यानें ठेवून दिले. नंतर पुण्यांत येऊन राहिलेला निंबाळकराचा सरदार बाजी कदम यासही बाळाजीनें आपल्या बाजूस वळाविलें; आणि सरलष्कर हें पद निंबाळकराचें काढून

कुटुंबें मुसलमान सरदारांजवळ पिढ्यानुपिढ्या कामें करून नांवाजलेलीं होतीं. थेट पानपतच्या संग्रामापर्यंत अशा कुटुंबांचा थांग लागतो.

रतनचंद हा वसुलाच्या व हिशेबाच्या कामांत परिपूर्णतेनें निपुण असून शिवाय दिल्लींत राहून राज्याच्या उलाढाली करणाऱ्या मंडळींत बनिया रतनचंदाचें नांव प्रमुख आहे. अबदुल्ला सय्यदाचा हा केवळ उजवा हात असून त्याच्याच नाशाबरोबर तोही नाश पावला. दिवाण–इ–खालिसा ह्मणजे वसूल व हिशेब या कामांवर रतनचंदाची नेमणूक वजीर अब्दुल्लानें कांहीं दिवस करविली होती. सन १७१७ त या जागेवर बादशहानें औरंगजेबाच्या तालमेंत तयार झालेला इनायतुल्ला यास नेमिलें. हा इनायतुल्ला हिंदूंचा द्वेष्टा असून, सय्यदांचे वेळेस हिंदु कामगारांचें माहात्म्य बरेंच वाढलें, तें इनायतुल्लास खपलें नाहीं. रतनचंदाच्या शिफारसीनें जिझिया कर बंद झाला होता तो इनायतुल्लानें पुनः सुरू केला; आणि हिंदूंच्या जहागिरी पुष्कळ कमी केल्या. हा प्रकार रतनचंद व दुसरे अंमलदार यांस खपला नाहीं. त्यांनीं वजिराकडे तक्रारी केल्या. तेणेंकरून वजिराचें व बादशहाचें ज्यास्तच वांकडें आलें. रतनचंदास नोकरींतून काढून टाकण्याचा बादशहानें हुकूम केला, तो अब्दुल्लानें मानिला नाहीं. अब्दुल्लाचे सगळे उद्योग रतनचंदामुळेंच यथास्थित चालले होते. पुढें फर्रुखसेयर बादशहास पकडण्यास सय्यदांनीं जनानखान्यांत फौज पाठविली, तिजवर रतनचंद मुख्य होता. बादशहास त्यांनीं २८ फेब्रुवारी १७१९ रोजीं कैद करून पुढें ठार मारिलें; आणि नवीन कारकीर्द सुरू झाली, तेव्हां रतनचंद, अजितसिंग व कोट्याचा भीमसिंग यांच्या आग्रहावरून सय्यदांनीं लगेच जिझिया कर माफ केला. पुढें कांहीं काळ दोघां सय्यद बंधूंचें वांकडें आलें, तेव्हां रतनचंदानें अनेक प्रसंगीं उभयतांची समजूत घालून त्यांचें भांडण मिटाविलें. राजागिरिधर बहादुरची व सय्यदांची लढाई अलाहबादेस झाली, तेव्हां

त्या दोघांचा तह घडवून आणण्याची महत्त्वाची कामगिरी रतनचंदानें उत्तम बजावून गिरिधरसारखा शूर पुरुष त्यानें सय्यदांच्या बाजूस आणिला.

रतनचंदाचा शेवट मात्र वाईट झाला. ऑक्टोबर ता. ८ सन १७२० रोजीं जयपुरच्या पूर्वेस साठ मैलांवर बादशहाचा मुक्काम असतां हुसेन-सय्यदाचा खून झाला, आणि त्याची छावणी व संपत्ति सर्व लुटली गेली, त्या गर्दींत हुसेनसय्यदाचे सरदार, ज्यास जिकडे वाट फुटली तिकडे, चालते झाले. त्यांत पुष्कळांनीं रतनचंदास पळून जाण्यास सांगितलें असतां त्यानें तें मानिलें नाहीं. एकाएकीं धन्याचा खून झालेला पाहून तो अगदीं वेडा होऊन गेला. मात्र हुसेनचा खून झाल्याची बातमी त्यानें ताबडतोब अब्दुल्ला सय्यद दिल्लीस वजीर होता त्यास कळविली. हुसेन-सय्यदास मारण्यांत महंमद अमीनखान प्रमुख असून तोच पुढें वजीर झाला. राजा गिरिधरचा बाप दयाराम हा अमीनखानाजवळ होता, त्यास पाठवून खानानें रतनचंदास पकडून हालहाल करीत आपल्यापुढें आणिलें; आणि कांहीं काळ त्यास मोगल लोकांच्या पहाऱ्यांत ठेविलें. कांहीं दिवसांनीं पुढें अब्बदुल्ला सय्यद व बादशहा यांची लढाई चालू असतां बादशहानें रतनचंदास आपल्या समोर आणून त्याचा शिरच्छेद करविला, ( १३-११-१७२० ). मुसलमान ग्रंथकारांचा अभिप्राय असा आहे, कीं, सय्यद स्वतः स्वभावानें चांगले होते; परंतु रतनचंदाच्या संगतीस लागून त्यांनीं अनुचित कृत्यें केलीं. असे अभिप्राय पुष्कळ अंशीं पक्षपाताचे असतात. एक गोष्ट उघड होते, कीं सय्यदांचा पुष्कळसा ओढा हिंदूंकडे होता, आणि त्यांचे जवळ रतनचंदासारख्यांचें वजन होतें. रतनचंदाचे बहिणीचा नवरा केशवराय हाही एक गृहस्थ दिल्लींत मोठ्या कामावर होता. हिंदुस्थानच्या इतिहासांत या मंडळीचीं नांवें स्मरणीय होत.

---

# प्रकरण सातवें.

———:o:———

## बाजीरावाचा निजामावर शह

### ( स. १७२०-२८. )



**१. बाजीरावाच्या हालचाली व त्यांचें रहस्य.**—बाजीरावानें पेशवाई मिळतांच जे उद्योग सुरू केले त्यांत त्याचा उद्देश काय होता, हें बिनचूक ताडण्यास लागणारा अस्सल पुरावा अद्यापि भरपूर उपलब्ध नाहीं. या संबंधानें वीस वर्षांपूर्वी रा. राजवाडयांनीं दर्शविलेला खेद अद्यापि कायम आहे, [ खं. २ पृ. ५१—५२ ]. तीन शकावल्यांतील उडते उल्लेख, नानासाहेबाच्या रोजनिशीच्या दुसऱ्या भागाच्या शेवटीं दिलेले तारीखवार मुक्काम व शाहू छत्रपतीच्या रोजनिशींतील कित्येक टिपणें, यांजवरूनच बाजीरावाच्या वर्तनोद्देशाचा अंदाज बांधावा लागतो. तथापि त्याच्या अंमदानींतील एकंदर घडामोडी एका दृष्टिकेंद्रांत घेऊन सामान्य विचार केला असतां, त्यांचे पहिल्या अकरा व दुसऱ्या नऊ वर्षांचे असे दोन मुख्य खंड स्पष्ट दिसूं लागतात. बापानें अंगीकारिलेली राज्यकारभाराची दिशा त्यास तशीच जोरानें पुढें चालावावयाची होती; परंतु तसें करण्यास त्यास मुख्य अडचण दरबारांतील मंडळीकडूनच आली. सय्यदांबरोबर झालेला करार पुरा पाडण्यास निजाम नानासाहेब्या

हरकती आणूं लागला, आणि पुढें तो स्वतंत्र होऊनच दक्षिणेंत येऊन वावरूं लागला, तेव्हां संभाजीसारख्या शाहूच्या प्रतिस्पर्धी इसमास फोडून, अगर शाहूच्या पक्षांतील प्रतिनिधि, दाभाडे वगैरे मंडळीस नाना प्रकारचें आमिष दाखवून, तो पूर्वीचाच खेळ पुनः खेळूं लागला. अशा परिस्थितींत तरुण व अननुभवी बाजीरावावर शाहूचाही आरंभीं पूर्ण विश्वास बसला नाहीं. हा ह्मणतो तें बरें कीं, तो ह्मणतो तें बरें, अशी शाहूची स्थिति होई. इकडे निजामासही बाजीरावाच्या कर्तृत्वाचा अंदाज नसल्यामुळें आपण शाहूच्या दरबारांत पुनः दंगल उडवून देऊं असें वाटलें. ही अनिश्चिति उलथून देणें बाजीरावाचें पहिलें काम होतें. पेशवाईचा अधिकार गाजविण्याची ताकद आपल्या अंगांत आहे, बापाची पद्धत, प्रसंग पडल्यास लष्करी जोरानेंही आपण सिद्धीस नेणार, पूर्वीं संभाजीशीं किंवा चंद्रसेनाशीं जसे निजामानें डाव केले, तसे तो पुनः [illegible]जूं लागेल तर ते डाव खेळणाऱ्या स्वकीय मंडळीस व निजामास संपूर्णपणें [illegible] देण्यास आपण सर्वथैव समर्थ आहों, आड येणाऱ्यास प्रखर [illegible]सन करण्यास आपण कधीं कचरणार नाहीं, हें बाह्य जगाच्या व विशेषतः शाहूच्याही नजरेस आणून देण्याचा बाजीरावाचा पहिला मोठा उपक्रम होता. तो सिद्धीस नेण्यांत त्याचीं जवळ जवळ बारा वर्षें गेलीं. ह्या बारा वर्षांत त्यानें निजामाचा चांगलाच समाचार घेतला. त्याजबरोबर लाडीगोडी लावणाऱ्या संभाजीस कायमचें जाग्यावर बसविलें, आणि चंद्रसेनाचा पूर्वींचा खेळ नवीन सेनापति दाभाडेही खेळूं लागेल तर ती गोष्ट आपण कदापि चालूं देणार नाहीं हें त्यानें दाभाड्यासही चांगलें शिकवि[illegible] इतकें काम सिद्धीस जाण्यास स. १७३१ साल आलें. बाळा[illegible] नाथाच्या तहांतील चौथाई सरदेशमुखीचे हक्क गुजराथ, [illegible] प्रांतांवर बसविण्याचें काम या अकरा वर्षांत बाजी[illegible] तथापि स्वकीय विरोधकांवर त्याचा पगडा संपू[illegible]

स्वैरपणें प्रगट होण्यास अवधि मिळाला नाहीं. दाभाड्याचा पाडाव झाल्यावर सर्व लोक त्याची हुकमत निमूटपणें पाळूं लागले. तेव्हां पुढील नऊ वर्षांच्या उत्तर भागांत बाजीरावानें बापाचा अंगीकृत उद्योग बहुतेक सिद्ध करून दाखविला. नादीरशहाची स्वारी व स्वतःचें अल्पायुष्य हीं दोन विघ्नें उपस्थित झालीं नसतीं तर बाजीरावानें हिंदुस्थानचा भावी इतिहास सर्वस्वी बदलून टाकिला असता. तूर्त आपणांस बाजीरावाच्या कामगिरीचे वरील दोन पल्ले नेहमीं दृष्टीपुढें ठेविले पाहिजेत. स्वकीय विरोधकांचे कावे, शाहूच्या मनाची धरसोड व निजामाच्या खटपटी, यांच्या योगानें पहिल्या पल्यांतील बाजीरावाच्या हालचाली उपस्थित झाल्या आहेत. निजाम, संभाजी व दाभाडे यांचीं प्रकरणें या भागांत प्रमुख आहेत; आणि त्या सर्वांची एक व्यवस्थित सांखळी बनलेली आहे. अर्थात् बाजीरावाचें खरें धाडस व स्वैर संचार नऊ वर्षांच्या उत्तर भागांत आपल्या नजरेस येतो. पहिल्या भागांत त्याची स्थिति बरीचशी हातपाय आंखडल्यासारखी होती, म्हणून तो भाग दुसऱ्याची तयारी होय, असें ह्मणतां येईल.

या पहिल्या हालचाली बिनचूक ठरविण्यास भरपूर साधन नाहीं. शकावलींतले उल्लेख अपुरे व धरसोडीचे आहेत. नानासाहेब पेशव्याच्या रोजनिशीच्या दुसऱ्या भागाचे शेवटीं बाजीरावाचे मुक्काम तारीखवार दिले आहेत, परंतु तपासून पाहतां ते बिनचूक आहेत असें वाटत नाहीं. दोन दोन वर्षें बाजीराव केवळ पुणें व साताऱ्याचे दरम्यान लुडबुडत राहिला असेल हें शक्य नाहीं. दुसऱ्याही अनेक चुका त्यांत दिसतात. तूर्त आ-[illegible]च्या कामापुरती त्याच्या हालचालींची खालील यादी ठोकळ मानानें [illegible]क धरून चालण्यास हरकत नाहीं.

[illegible]० एप्रिल १७ पेशवाईवर नेमणूक.

जून १९ खांडव्याची लढाई, दिलावरअलीचा पाडाव. या ठिकाणीं हजर नाहीं.

,, ऑगस्ट १० बाळापुरची लढाई. बाजीराव बहुधा हजर.

,, सेप्टेंबर–नोव्हेंबर, सातारा.

,, डिसेंबर–जानेवारी १७२१ मोगलाईंत सावर्डिया येथें

,, निजामाची भेट. विजापुर जुन्नरकडे निजामावर स्वाऱ्या.

स. १७२२ फेब्रुवारी–मे, पूर्वेकडे मोगलाईवर स्वारी.

,, जुलई–सेप्टेंबर, सातारा. या सालीं अगर पुढील सालीं प्रतिनिधीशीं वाद.

ऑक्टोबर. सासवड, सुपें, पुणें. पुण्यास वास्तव्य करण्याचा उपक्रम. सासवडास गैरसोय होऊन कांहीं दिवस सुप्यास मुक्काम.

स. १७२३ डिसेंबर–जून, उत्तर हिंदुस्थानांत पहिली स्वारी, मोगलाई, बऱ्हाणपुर, हंडिया, माळव्यांत झाबवा, व वाघेलखंडांत ( रीवा वगैरे ).

,, जुलई–नोव्हेंबर, सातारा व आजूबाजूचा प्रदेश, डिसेंबर–जुलई १७२४ माळवा, उज्जेन, बुंदेलखंड.

स. १७२४ चा आरंभ, सारंगपुरची लढाई, राजा गिरिधरचा पाडाव.

जुलई–ऑगस्ट, सातारा.

सेप्टेंबर–ऑक्टोबर मोगलाई.

२ ऑक्टोबर–साखरखेड्याच्या लढाईत निजामास मदत.

नोव्हेंबर–मार्च १७२५ माळवा.

स. १७२५ एप्रिल–सेप्टेंबर, सातारा.

,, सेप्टेंबर–जून १७२६ कर्नाटकची पहिली स्वारी

स. १७२६ एप्रिल–सेप्टेंबर, सातारा.

,, ऑक्टोबर–स. १७२७ मे, कर्नाटकां

थेट श्रीरंगपट्टण पर्यंत केल्याचा उल्ले

( ना. सा. रो. भा. २ पृ. २२

२२ व २५ यांवरून ही स्वारी झाल्याचा पुरावा मिळतो.)

स. १७२७ पावसाळा, सातारा.

,, सेप्टेंबर–स. १७२८ मार्च. निजामावर स्वारी. रेवातीरीं मुक्काम जानेवारी १७–२८ त.

स. १७२८ फेब्रुवारी २५, पालखेडची लढाई, निजामाचा पाडाव.

,, ६ मार्च, मुंगीशेवगांवचा तह. पुढें वर्ष अखेर मुक्काम सातारा पुणें.

स. १७२९ जानेवारी–जुलई, वऱ्हाड, माळवा बुंदेलखंड; मार्च–एप्रिल जैतगडचा वेढा, बंगसाचा पाडाव. चिमाजी आपाकडून माळव्याची व्यवस्था. ऑगष्ट–डिसेंबर, सातारा पुणें.

स. १७३०मार्च एप्रिल, संभाजीचा पाडाव, ताराबाई शाहूकडे आली.

,, ऑक्टोबर–मे १७३१ खानदेश गुजराथ वगैरे.

,, फेब्रुवारी–एप्रिल–शाहू संभाजींची भेट, वारणेचा तह

स.१७३१ता.१एप्रिल डभईची लढाई.पावसाळ्यांत उभयपक्षांचीसमजूत.

,, १२ ऑक्टोबर, तिरळ्याची लढाई, दयाबहादुरचा पाडाव.

स. १७३२ कोंकण व पुणें सातारा, माळवा व उत्तर हिंदुस्थान.

स. १७३३ चा आरंभ, बुंदेलखंड प्रकरण, छत्रसालाचा मृत्यु, बाजीरावास प्रदेशप्राप्ति.

,, एप्रिल–डिसेंबर, जंजिऱ्यावरील मोहीम. गोवळकोटची लढाई ता.८जुलई.

[illegible] ३६ माळवा व उत्तर हिंदुस्थान, कर्जानें गांजणूक.

[illegible] ४–एप्रिल ३, आंगऱ्यांचे दौलतीचा विभाग.

जुलई १७३८ दिल्लीवरची मोठी स्वारी.

स. १७३७ फेब्रुवारी मार्च, बादशहाचा पराभव झील, तलावावर.

,, १३ डिसेंबर-८जानेवारी १७३८ निजामाचा पाडाव, भोपाळचीलढाई, व सिरोंजचा तह.

स. १७३९ फेब्रुवारी, वऱ्हाडांत रघूजी भोसल्याकडून आवाजी कवड्याचा पाडाव.

स.१७४० नासिरजंगाचा पराभव व,मुंगी पैठणचा तह फेब्रुवारी २७.

,, २८ एप्रिल मृत्यु रावेर येथें नर्मदाकांठीं.

निजामानें बंडखोरी करून स. १७२०च्या मे महिन्यांत नर्मदापार होऊन दिलावरअली व आलमअली यांस वेगवेगळे गांठून जून महीन्यांत पहिल्याचा व ऑगस्ट महिन्यांत दुसऱ्याचा बाळापुर येथें फडशा उडविला, हेंवर सांगितलेंच आहे.निजाम दिल्लीहून निघण्याचे सुमारास इकडे बाजीरावास पेशवाई मिळाली; करारान्वयें त्यास आलम अलीच्या मदतीस ताबडतोब जावें लागलें. वेळ मोठी आणीबाणीची होती. सय्यदांचा पाडाव झालेला नव्हता, आणि त्यांच्याच मार्फतीनें व मदतीनें मराठ्यांचीं सर्व कारस्थानें चाललीं होतीं. तेव्हां निजामासारखा प्रबळ शत्रु दक्षिणेंत येऊन आपल्या शेजारीं रोवला जावा हें मराठयांस हितावह नव्हतें, त्याचा प्रतीकार करण्यासाठीं बाजीराव ताबडतोब खानदेशांत गेला. बाळापुरच्या लढाईत तो स्वतः हजर असल्याचा स्पष्ट उलेख आढळत नाहीं. तरी रोजनिशींतील उल्लेखावरून त्याचा मुकाम त्या वेळीं बाळापुरास होता. त्या लढाईत शंकराजी मल्हार निजामाचे हातीं सांपडला, आणि पुढें ते जखमांनीं लवकरच मरण पावला. खंडेराव दाभाडे व दमाजी गा[illegible] हे सरदार आलमअलीच्या मदतीस होते, आणि लढाईत [illegible] लोक पडले. दमाजी गायकवाडाचा पराक्रम ह्या ल[illegible] योगानें पुढें त्याच्या घराण्याचा उदय झाला.

बाळापुरची लढाई ही मराठ्यांच्या इतिहासांत क्रांतिकारक समजली जाते. ह्या लढाईंत सय्यदांस यश येऊन निजाम पडला असता, तर पुढील इतिहासाचें स्वरूप सर्वस्वी बदललें असतें. कारण निजाम ही एकच व्यक्ति या अठराव्या शतकांत मराठ्यांचा व हिंदुस्थानचा भावी इतिहास बनवीत होती. दिलावरअलीप्रमाणेंच आलमअलीनेंही लढण्याची घाई केली. त्याचा पक्ष सबळ असूनही युध्दनिपुण व धूर्त असा सेनानायक त्याजकडे नव्हता. मराठ्यांचे बाजूस अनुभवी सरदार होते. शंकराजी मल्हारानें सर्व सरदारांस उत्तेजन देऊन कारस्थानांतही कांहीं कमी केलें नाहीं; म्हणून त्याजवर निजामाची वक्र दृष्टि होती. परंतु मराठे कसे झाले तरी ह्या प्रसंगीं मदतगार म्हणून असल्यानें त्यांस मुखत्यारीनें आपल्या मर्जीमाफक व्यवस्था करितां आली नाहीं. बाजीरावाची व आलमअलीची गांठ १३ साबान ह्म० ८ जून १७२० रोजीं पडली होती, ( भारतवर्ष शकावलि ). ह्यावरून बाजीराव ह्या बाळापुरच्या लढाईंत हजर होता असें अनुमान होतें. परंतु तो तरुण असून युध्दकलेंत त्याचें नांव अद्यापि पुढें आलें नव्हतें. चंद्रसेन जाधव वगैरे शाहूचे प्रतिपक्षी ह्या लढाईंत हजर राहून निजामाचे बाजूनें लढले.

आलमअलीचा पराभव झाल्यावर पुढील उद्योग ठरविण्याकरितां बाजीराव सेप्टेंबरांत सासवडास आला, तों मागून निजामानें मुहकमसिंग वगैरे कोणा तरी आपल्या हस्तकास पुण्यावर रवाना केलें असावें. कारण ऑक्टोबर नोव्हेंबर महिन्यांत बाजीरावानें बारामती येथें मोगलांशीं लढाई [illegible]ल्याचा उल्लेख सांपडतो ( राजवाडे खंड२ ). ही लढाई संपतांच शाहूस [illegible]ढील विचार ठरविण्यासाठीं बाजीराव नोव्हेंबर महिन्यांत साताऱ्यास [illegible]शीं बोलणें करून पुढील विचार ठरवावा अशी वाटाघाट [illegible]राव तारीख १७ डिसेंबर रोजीं मोरालाईत गेला. [illegible] रोजीं सावर्डिया येथें त्याची व निजामाची

भेट झाली[1]

दक्षिणेंत निजामाची सरशी झाली हें वर्तमान दिल्लीस कळलें तेव्हां, आणि पुढें सय्यदांचाही पाडाव झाला त्याबद्दल, बादशाहानें दिल्लींत मोठा उत्सव केला. सय्यदांच्या पाडावानें राज्यांत सर्वत्र आनंद झाला तरी तो क्षणिक होता. बादशहाला सत्ता वापरण्याचें सामर्थ्य कधीच आलें नाहीं. निजामानें मात्र तूर्त बादशहाचें अभिनंदन करून आपल्या बंडखोरीचें समर्थन केलें. बादशहानें प्रथम महंमद अमीनखानास वजिरी दिली, परंतु तो १७२१ च्या जानेवारींत मरण पावला, तेव्हां त्यानें निजामास वजिरी देण्याचें ठरवून त्यास दिल्लीस बोलाविलें; आणि अमीनखानाचा मुलगा कमरुद्दीनखान यास महत्पदास चढवून खानडौरान यास तात्पुरतें वजिरीचें काम दिलें. निजाम दिल्लीस येऊन पोंचण्यास एक वर्षाचा अवधि लागला.

सय्यदांच्या पाडावानें मराठ्यांचे उपक्रम कांहीं अंशीं ढांसळले. दिल्लींतील इराणी पक्ष नाहींसा होऊन निजामाचा तुराणी पक्ष अधिकारारूढ झाला. अर्थात् सय्यदांचे मार्फत गेल्या ३-४ वर्षांत शंकराजी मल्हार व बाळाजी विश्वनाथ यांनीं रचिलेला व्यूह थोडा बहुत बिनसला. उलट संभाजी व चंद्रसेन जाधव यांनीं निजामास मदत केल्यामुळें त्याचें वजन वाढलें. बाजीराव जरी पेशवाईवर होता तरी मुत्सद्दी मंडळांत त्याचें वजन नव्हतें. वयानें व अनुभवानें श्रीनिवासराव प्रतिनिधि वरचढ मानला जात असून त्याजवरच शाहूची मर्जी ज्यास्त होती. श्रीनिवासरावाचें वय त्या वेळीं सुमारें ३५ वर्षांचें ह्मणजे शाहूच्या बरोबरीचें होतें. संभाजीकडेही प्रतिनिधीचा वशिला होता, तसा बाजीरावाचा नव्हता. अशा स्थितींत शाहूच्या पक्षानें निजमाशीं व बादशहाशीं कोणतें धोरण स्वीकारावें या संबंधानें मोठा प्रश्न उपस्थित होऊन, प्रतिनिधि व बाजीराव यांचा शाहूच्या दरबारीं कडाक्याचा वाद झाल्याची आख्यायिका

टीपः—सावर्डिया कोठें आहे ? भारतवर्ष शकावलीकार या भेटीचें स्थान चिखलठाण असें देतो.

प्रसिद्ध आहे. तो वाद या मुद्द्यावरच पुढील वर्षं सहा महिन्यांत केव्हां तरी झाला असला पाहिजे.

इकडे निजामालाही मराठयांच्या संबंधानें आपण काय धोरण स्वीकारावें याची अडचण होती. कोल्हापुरकर संभाजी व चंद्रसेन वगैरे दोस्तांशीं त्यानें आपली मैत्री दृढ केली, आणि शाहूलाही त्यानें प्रथम कळविलें कीं दिल्लीस झालेले करार आपण पाळूं; पण पुढें सय्यदांचा पाडाव झाल्याची बातमी आली तेव्हां त्याचें मन फिरलें, आणि संभाजीचा व शाहूचा तंटा आहे तोंपर्यंत पूर्वींचे करार अमलांत आणतां येत नाहींत, अशी सबब तो सांगूं लागला. या वेळीं आनंदराव सुमंत याचा मुलगा महिपतराव औरंगाबाद येथें निजामाजवळ बोलणें करून चौथाई वसूल करण्यासाठीं आपले इसम ठिकठिकाणीं नेमण्याची परवानगी मागत होता. पण ती परवानगी निजाम देईना. इकडे आलमअलीचा पाडाव झाल्याबरोबर शाहूनें दिल्लीस आपल्या वकिलामार्फत बादशहाचें अभिनंदन करून पूर्वींचे तह कायम करून घेतले. त्याबद्दलचीं फर्मानें दक्षिणेंत आलीं; तेव्हां हक्क वसूल करण्यासाठीं गंगथडीजवळ सरलष्करचे हाताखालीं कांहीं मराठी फौज जमा होऊं लागली. हे प्रकार पाहून निजामानें सुमंतास चौथाई वसूल करण्याची परवानगी दिली. औरंगजेबाच्या वेळचें युद्ध निजामानें पाहिलें असल्यामुळें, मराठयांशीं पुनः लढण्याचा प्रसंग आणण्याची त्याची इच्छा नव्हती. फक्त संभाजी व शाहू यांच्या मधील वैरभाव होईल तितका कायम ठेवून आपला डाव साधण्याचा त्याचा विचार होता. दिल्लीच्या दरबारांत आपलें वजन कायम ठेवणें व दक्षिणेंत आपला कारभार स्वतंत्र करणें, हे निजामाचे मुख्य उद्देश होते. त्यासाठीं मराठमंडळांतील दुफळी कायम ठेवून प्रसंगीं त्यांच्या मदतीची जरूर लागल्यास त्याजबद्दल संधान ठेवणें, असा उद्योग त्यानें जन्मभर चालू ठेविला. प्रस्तुत म्हणजे सन १७२१ त वाजि-

रीसाठीं बोलावणें आल्यावर दक्षिणेंत जास्त वेळ राहण्यास त्यास फावलें नाहीं. त्याचें मन द्विधा झालें. दक्षिणचा उद्योग व वजिरी या दोन्ही गोष्टी त्याच्यानें धरवेनात व सोडवेनात. तूर्त सुमंतास पैसे चारून त्यानें वळविलें, आणि प्रतिनिधीची समजूत करून त्या दोघांच्या मार्फत शाहूचा विश्वास त्यानें संपादिला, असें डफ ह्मणतो. सावर्डीया येथील भेटींत निजामाचें व बाजीरावाचें विशेष सख्य झाल्याचें दिसत नाहीं. कारण लगेच पुढें बाजीरावानें निजामाचे मुलखांत उपद्रव आरंभिला. बाजीराव पराक्रमी निघेल आणि पुढें तो पावलोपावलीं आपणांस जाच करील, अशी निजामास या वेळीं कल्पना नव्हती. बाळाजी विश्वनाथाच्या मृत्यूनें शाहूचा पक्ष लंगडा झाला, अशीच त्याची समजूत होती. इकडे प्रतिनिधीच्या मतलबी कारस्थानांची बाजीरावास एव्हांपासूनच थोडीथोडी ओळख होऊं लागली, आणि पावलोपावलीं प्रतिनिधींकडून, आडून किंवा समोर, बाजीरावास विरोध येत गेल्यामुळें, त्या दोघांचें उत्तरोत्तर फाटत गेलें. ह्मणूनच बाजीरावाचा उद्योग त्याच्या हयातींत चांगला सफल झाला नाहीं. प्रतिनिधि व शाहू यांनीं बाजीरावास मनापासून पाठबळ दिलें असतें तर त्यानें निजामाचा व बादशहाचा फन्ना तेव्हांच उडविला असता. या उद्योगांत उत्तरेंतील रजपूत राजांचें पूर्ण साह्य मराठ्यांस होतें.

निजामास दिल्लीहून पाचारण आलें तरी त्यास एकदम तिकडे जातां आलें नाहीं. सन १७२१ त बाजीराव व अंबाजीपंत पुरंदरे विजापुराकडे गेले. रस्त्यांत ब्रह्मपुरीनजीक भडभुंजा मोगल सरंजामसुद्धां होता, त्याचा लढाईंत पराभव करून त्यास त्यांनीं लुटून घेतलें; आणि विजापुराकडील निजामाचे मुलुखांत उपद्रव करून बाजीराव ऑगस्टांत सातान्यास आला, तो पुढें दोन महिने तेथेंच होता. बाजीरावाचा उपद्रव मिटविण्याकरितां निजामही त्याचे मागोमाग विजापुर-कर्नाटकाकडे सफर करून आला आणि लगेच हिंदुस्थानांत जाण्यासाठीं

निघाला, तो सन १७२२ च्या जानेवारींत दिल्लीस पोहोंचला. सन १७२० च्या अखेरीस मुहकमसिंग व चंद्रसेन जाधव यांनीं शाहूचे प्रदेशावर स्वारी केली असतां, सरलष्करानें त्यांचा पराभव केला. [ शा. म. च. पृ. ४२ ]. या प्रसंगीं धारराव प्रभु कळंबेकर हे शिपाइगिरी बहुत करून कामास आले; तेव्हां शाहूनें धाररावाची सरदारी कनिष्ठ बंधु आपाराव यास दिली. ' हा धारराव पूर्वी चंद्रसेनाचे फौजेंत असून त्याज-बरोबरच शाहूस सोडून मोगलांकडे गेला होता; व नंतर तो परत येऊन शाहूस मिळाला. स. १७२०–२१ च्या डिसेंबर व जानेवारी महिन्यांत बाजीराव जुन्नरकडे असून त्या स्थळीं करीमबेगाशीं त्यानें युद्ध केल्याचा उल्लेख आहे ( रा. खं. २ शकावलि ).

२. **साखरखेड्याची लढाई, निजामशाहीची** स्वतंत्र **स्थापना** ( २. १०. १७२४ ).—दिल्लीस कारभार करूं लागल्यावर निजामाचें व बादशहाचें लवकरच बिनसलें. निजामाचें औरंगजेबी कडक व साधें वर्तन आणि बादशहाचा रंगेल स्वभाव यांचा मेळ बसेना. दरबारांत पुनः विरोधी पक्ष उत्पन्न झाले. सय्यदांचा पाडाव करण्यांत हैदरकुलीखान व सादतखान हे दोन सरदार बादशहाचे उपयोगीं पडले होते, त्याजबद्दल बादशहानें पहिल्यास ( १७२२ त ?) गुजराथच्या व दुसऱ्यास अयोध्येच्या सुभ्यावर नेमिलें. हैदरकुलीचें व निजामाचें गोड नव्हतें, तेव्हां परभारें निजामाचा पाडाव करण्याची बादशहानें सय्यदांच्याच वेळची युक्ति पुनः योजिली. पुढें नोव्हेंबर १७२२ त निजामासही बादशहानें गुज-राथची सुभेदारी देऊन हैदरकुलीचा पाडाव करण्यास पाठविलें. हुकुमा-प्रमाणें फौज घेऊन निजाम उज्जन पावेतों हैदरावर चालून आला. निजाम आपल्यावर चालून येतो असें ऐकून हैदरकुली पळून गेला. तें पाहून उज्जन येथें राहूनच निजामानें गुजराथ प्रांत आपल्या दक्षिणच्या सुभ्यास जोडिला, आणि तेथील कारभारावर अहंमदाबाद येथें

आपला मामा हमीदखान यास नेमिलें. माळवा प्रांतही पूर्वी निजामाकडेच होता. त्याजवर त्यानें आपल्या तर्फे अजीमुल्लाखान या नांवाचा कारभारी नेमिला. येणें प्रमाणें तीन प्रांत हस्तगत करून निजाम पुनरपि दिल्लीचे कारभारावर लगेच येऊन हजर झाला. यामुळें बादशहाचें धाबें दणाणलें. निजामाचा पाडाव करण्यासाठीं तो अनेक कारस्थानें रचूं लागला. निजामालाही दिल्लीस राहणें नकोच होतें. तेथचा प्रकार पाहून त्यानें दक्षिणेंतच स्वतंत्र होण्याचा मनाचा निश्चय कायम केला, आणि आजाराचें निमित्तानें आपल्या कामाचा राजीनामा देऊन आणि कित्येक नवीन पदव्या संपादन करून, सन १७२३ च्या ऑक्टोबरांत निजाम दिल्ली सोडून दक्षिणेंत येण्यास निघाला. त्या वेळेपासूनच मोगल बादशाहीचा नर्मदेच्या दक्षिणेकडील प्रांत स्वतंत्र झाला असें ह्मणण्यास हरकत नाहीं. येतांना निजामानें माळव्याचा बंदोबस्त स्वतःच्या हस्तकांकडून चांगला करून ठेविला.

दक्षिणेंत मुबारीजखान नांवाचा बादशहाचा सरदार हैदराबाद व कर्नाटक ह्या प्रांतांचा कारभार पहात होता, त्याचें व निजामाचें वांकडें होतें. ह्या गोष्टीचा फायदा घेऊन बादशहानें मुबारीजखानास स्वदस्तुरचें पत्र पाठविलें कीं, ' निजाम स्वतंत्र होत आहे त्यास कसेंही करून लढून मारून टाकावें. ' ह्या खटपटींचा सुगावा निजामासही होताच. ह्मणून तो एकदम त्वरेनें दक्षिणेंत न येतां, शत्रुपक्षांत फूट पाडीत व आपली तयारी करीत हळू हळू पुढें आला, तो सन १७२४ च्या जुलईंत औरंगाबादेस पोहोंचला. त्याजवर मुबारीजखान चालून आला. तारीख २ ऑक्टोबर सन १७२४ रोजीं दौलताबादनजीक साखरखेडें येथें निकराची लढाई होऊन मुबारीजखान व त्याचे दोन मुलगे मारले गेले. ' अमानतखान दिल्लीहून सुभा आला होता तो, व त्याजकडील सरदार इब्राहीमखान व अबदूलखान हे मयत झाले.

अमानतखानाचे सतरा हत्ती पाडाव झाले. निजामानें कंब्रजखानाचें शीर कापून, दिल्लीस पाठवून बादशहास पत्र लिहिलें कीं, 'स्वामींच्या दैवयोगानें आम्हीं हा बंडवाला मारिला.' नंतर निजाम हैदराबादेस गेला. तेथें कंब्रजखानाचा मुलगा ख्वाजाआदब म्हणून होता त्याशीं सल्ला करून निजामानें गोवळकोंडा व इतर किल्ले घेतले.' ( रा. खं. २ शकावलि, पृष्ठ ४९–५० )–.[1]

बाळापुरच्या लढाईप्रमाणेंच साखरखेड्याची लढाई दक्षिणच्या इतिहासांत क्रांतिकारक आहे. ही लढाई निजामाच्या स्वतंत्र सत्तेचा आरंभ होय. या लढाईनें पुनरपि मराठ्यांच्या छातीवर निजामाची ही नवीन धोंड कायमची येऊन बसली.

**३. बाजीरावाची परिस्थिति व अडचणी.**–इकडे सन १७२२–२३–२४ ह्या तीन सालांत बाजीरावाच्या हालचाली काय होत्या तें पाहिलें पाहिजे. पूर्वीं मिळालेले चौथाईचे हक्क वसूल करून त्यांची व्यवस्था लावीत बाजीराव मुख्यतः खानदेशांत व बागलाणांत राहिला. निजामाचा पाडाव करण्याच्या हेतूनें बादशहानें आंतून शाहूशीं संधान चालविलें असलें पाहिजे, कारण ह्याच वेळीं शाहूच्या हुकमानें बाजीरावानें माळवा प्रांत जिंकण्यासाठीं शिंदे व होळकर या आपल्या भरवंशाच्या सरदारांस माळव्यांत रवाना केलें आणि अल्पावकाशांत तो प्रांत पादाक्रांत केला स. १७२३ चें व स. १७२४ चे आरंभीं स्वतः बाजीराव दोनही सालीं माळव्यांत जाऊन आला.

मराठशाहीच्या प्रधानकीचीं सूत्रें हातीं घेतल्यावर थोड्याच काळांत राज्यव्यवस्थेंतील दोष बाजीरावाच्या नजरेस आल्याशिवाय राहिले नाहींत. बाजीरावाचे अंगीं हिंमत होती, पराक्रम होता, तारुण्याची धमक

---

१ मुबारीजखानास मराठ्यांचे बखरींत कंब्रजखान असें नांव आहे.

व तडकाफडकी निकाल करण्याची ताकद होती. शिवाय स्वतःच्या खात्रीचे असे कित्येक अप्रतिम मुत्सद्दी त्यानें पैदा केले होते. त्याची सर्व मंडळी तरुण वीसपंचविसांचे आंतली होती. प्रत्यक्ष शाहू बाजीरावाहून सोळा वर्षांनीं मोठा होता. खंडो बल्लाळ, श्रीनिवासराव प्रतिनिधि, आनंदराव सुमंत खंडेराव दाभाडे, फत्तेसिंग व कान्होजी भोसले, कान्होजी आंगरे, नारोराम मंत्री, इत्यादि दरबारांतील प्रमुख मंडळी वयानें व अनुभवानें बाजीरावाहून वरचढ होती. बाजीरावास ते पोर समजत. त्यांतही बाजीरावाचा स्वभाव थोडासा उद्दाम असल्यानें आणि वर्ष दीड वर्षांत त्याच्या पराक्रमाची छाप चहूंकडे, बसत चालल्यानें त्याजबद्दल या पोक्त मंडळींस वैषम्य वाटूं लागलें. करामत व तारुण्य यांचें बहुधा साहचर्य असतें आणि त्याजबद्दल जुन्या मंडळींस हेवा वाटणें साहाजिक असून राज्यकारभांत तें व्यंग गणलें जातें. यामुळें आरंभीं कांहीं वर्षें बाजीरावाचे हात सर्वस्वी आंखडून गेले. ही त्याच्या वाटेंत मोठी अडचण होती. त्याच्या पराक्रमाची शाहूला खात्री होती. नाहीं तर त्यानें त्यास प्रधानकीची जागाच दिली नसती. परंतु शाहूला जागेवरून हलावयाचें नव्हतें. बादशाहाचे जनानखान्यांत ऐन तारुण्याचे दिवस गेल्यानें त्याचा स्वभाव कांहींसा आरामप्रिय बनला होता. तशांत त्यास बाहेर पडण्याची कोणी सल्ला दिली असती तर ती त्यानें स्वीकारली नसती असें नाहीं. परंतु 'आम्ही सर्व सरदार असतां आपण आयास का म्हणून करावे! प्रत्यक्ष दिल्लीच्या बादशाहाशीं लढण्याचा प्रसंग येईल तेव्हांच आपण त्याचे सामन्यास जाणें योग्य-.' अशा प्रकारचे आपल्या स्वभावानुरूप निःसत्त्व कोटिक्रम लढवून, बाजीरावाचे वयस्क प्रतिपक्षी शाहूस बाहेर पडण्यापासून निवृत्त करीत. यामुळें बाहेरच्या ज्या प्रांतांत शाहूचे सरदार उद्योग करीत तेथील परिस्थिति, त्यांच्या अडचणी, किंबहुना तेथील भूगोलिक रचना यांची यत्किंचित् माहिती नसतां, केवळ

सत्तेच्या जोरावर शाहूला जाग्यावर बसून हरएक बाबतींचे हुकूम सोडावे लागत. ते हुकूम शेंकडों कोसांवर कालांतरानें पोंचून परिस्थित्यनुरूप अनेक कारणांनीं अमलांत न आल्यास, त्यामुळें आज्ञाभंगाचा दोष सरदारांवर येई. बाजीरावाचा उद्योग तीव्र वेगानें प्रगट होतांच वर सांगितलेली कित्येक वयोवृद्ध मंडळी शाहूपाशीं सातान्यास बसून, नाहीं नाहीं ते कुतर्क काढून बाजीरावाविरुद्ध शाहूचें मन कलुषित करीत. ' हा प्रसंगीं आपणांसही बाजूस सारण्यास चुकणार नाहीं, ह्यास मोकळा सोडणें घातक आहे ' असें ते शाहूच्या मनांत भरवीत. प्रतिनिधीचा तर हा डाव नेहमींच चालू होता, आणि पुढें फत्तेसिंग व रघूजी भोसले ह्या बाबतींत त्यास सामील झाले. ह्या त्रिकुटाशीं बाजीरावास सारखें झगडावें लागलें आणि ह्या झगड्यांतच त्याच्या कारकीर्दीचीं वीस वर्षें खर्च झालीं.

बाजीरावाची दुसरी अडचण अशी होती, कीं राज्यकारभाराची, वसुलाची व फौजेची जी व्यवस्था बापानें बांधून दिली होती, तीच त्यास पुढें चालवावयाची होती. मोहीम ठरवावयाची व हुकूम द्यावयाचे शाहूनें, ते अमलांत आणण्यास लागणारी फौज निरनिराळ्या सरदारांच्या हातांत आणि त्या फौजेचा खर्च परभारें बाहेरच्या वसुलींतून भागवावयाचा, अशी ही बहुमुखी व्यवस्था बाजीरावासारख्या कर्तृत्ववान पुरुषाला फारच जाचक झाली. प्रत्येक पराक्रमी पुरुषाचे हात नेहमीं मोकळे असावे लागतात. क्लाइव्ह, वेल्स्ली इत्यादि पुरुषांना मोकळा हात सांपडला अगर वरिष्ठांच्या अवज्ञेनेंही त्यांनीं स्वैर कारभार केला, ह्मणूनच इंग्रजी राज्याची हिंदुस्थानांत वृद्धि झाली. मोहिमेवर असतांना ज्या अडचणी किंवा जे विशिष्ट प्रश्न उद्भवत, त्यांचा निकाल स्वतःच्या हुकमतीनें बाजीरावास करतां येत नसे. कित्येक प्रसंगीं हातांतील महत्त्वाचें काम अपुरें सोडून, वेळीं बिघडवूनही, कामगिरीचा झाडा देण्याकरितां बाजीरावास ताबडतोब सातान्यास यावें लागे. तेथें प्रतिपक्ष्यांनीं

जाग्यावर बसून रचिलेल्या व्यूहांचें निरसन करून शाहूची समजूत घालणें हें नेहमींच मोठें महत्त्वाचें काम होतें. स्वतः शाहू समजूतदार असून, तसाच प्रसंग आल्याशिवाय तो बाजीरावास अडवीत नसे. परंतु पूर्वींची अष्टप्रधानमंडळाची रचनाच प्रस्तुतच्या उद्योगास नडणारी होती. कारण कामाची जबाबदारी अंगावर न घेतां नुसती आडकाठी घालण्याची शक्ति मात्र आतां प्रधानमंडळांत राहिली होती. त्यांतील पूर्वींचा जोम आतां राहिला नव्हता. वास्तविक शिवाजीच्या मृत्यूनंतर अष्टप्रधानांची ही संस्था कर्तृत्वाच्या संबंधानें बहुतेक बंद पडल्या सारखीच होती. ज्याच्या अंगीं पराक्रम तोच वरचढ होऊन सर्व सूत्रें चालवी. मात्र त्या सूत्र-चालकास आडकाठी घालण्याइतकी तिची ताकद अद्यापि कायम होती. अशा प्रकारच्या अडचणींशीं बाजीरावास तोंड द्यावें लागलें.

४. बाजीराव प्रतिनिधींचा वाद, चढावाची युद्धपद्धति.— औरंगजेबाच्या अखेरीपर्यंत मराठ्यांचें युद्धधोरण सर्वस्वी बचावाचें होतें. बचावासाठीं चढावाचीच जरूर आहे असें बाळाजी विश्वनाथानें ठरविलें, आणि तेंच धोरण बाजीरावानें नेटानें पुढें चालविलें. किंबहुना बाजीराव अशा युद्धनीतीचा पहिला पुरस्कर्ता असून त्यांतच हिंदुपदपातशाहीचें बीज आहे. स. १७२२–२८ पावेतोंच्या तीन वर्षांत बाजीरावानें निजामाचे दक्षिणेंतील उद्योग बरेच हाणून पाडिले, असें शकावलीं-तील उडत्या उल्लेखांवरूनही ह्मणतां येतें. दक्षिणेंत मोगलांचा येण्याचा मार्ग माळव्यांतून होता. तेव्हां निजामास दक्षिणेंत येऊं देऊन आपल्याच प्रदेशांत त्याजबरोबर झगडण्यापेक्षां आपण होऊन नर्मदेपलीकडे माळव्यांत जाऊन त्यास अटकाव केल्याशिवाय, दक्षिणचा बंदोबस्त सुरक्षित होणार नाहीं; सर्व हिंदुस्थानावर शह ठेवण्यास व हिंदुपदपातशाहीचा शिवाजीचा उपक्रम सिद्धीस नेण्यास, माळवा प्रांत हाच आपल्या उद्योगाचा मुख्य पाया केला पाहिजे, अशी बाजीरावाची बालंबाल खात्री झाली. तो

व चिमाजीआपा यांनीं राज्याचा मुख्य उद्योग माळव्यांत राहून केलेला आहे. माळव्यांतूनच त्यांनीं व त्यांच्या हस्तकांनीं दिल्लीदरबारांतील व रजपुतांच्या कारस्थानांवर आपला शह बसविला. ही चढावाची युद्धकला [1]स्वीकारल्यामुळेंच बाजीरावास इतिहासांत मोठें स्थान मिळालें आहे.

शत्रूच्या मुलखांत युद्ध चालवून त्यास हैराण करावयाचें, आपल्या प्रदेशांत येण्यास त्यास अवकाश द्यावयाचा नाहीं, असा बाजीरावानें निश्चय केला. परंतु या त्याच्या पद्धतीस जुन्या भ्याड मंडळींनीं शाहूच्या दरबारांत जबरदस्त विरोध आणिला. प्रतिनिधीशीं झालेला बाजीरावाचा वाद तत्त्वासंबंधीं होता. स. १७२२ अगर २३ या सालच्या जुलै ते सेप्टेंबर महिन्यांच्या दरम्यान शाहूच्या दरबारांत असा कांहीं तरी कडाक्याचा वाद कित्येक दिवसपर्यंत झाला असावा. या वादांत एका बाजूस बाजीराव व दुसऱ्या बाजूस प्रतिनिधि होता. संभाजी, चंद्रसेन जाधव वगैरे घरच्या शत्रूंचा बंदोबस्त प्रथम करून सातारा राजधानींत राज्याची स्थिरस्थावर झाल्यावर मग माळवा दिल्ली वगैरे उत्तरेकडील भागांत यथाशक्ति उद्योग करावा, असें प्रतिनिधि-पक्षाचें ह्मणणें होतें. त्याचे उलट बाजीरावानें वर सांगितलेल्या उठावाच्या पद्धतीचें प्रतिपादन केलें, तें राजकीय व्यवहार जाणणाऱ्या राष्ट्रोद्योगी योद्ध्यास शोभेल असें होतें, ( १ ) मूळ शिवाजीचा संकल्प हिंदुपदपातशाही स्थापण्याचा होता, ( २ ) औरंगजेबाशीं लढून मराठ्यांनीं जय मिळविला, ( ३ ) मोगल बादशाही मोडकळीस आली आहे ( ४ ) अशा संधीस एकदम चढाईचा उद्योग केला असतां तो यशस्वी झाल्याशिवाय रहाणार नाहीं, ( ५ ) बाहेरचा उद्योग यशस्वी झाल्यानेंच घरचे शत्रु आपोआप निर्वीर्य होतील, ( ६ ) आणि आपली शक्ति व पराक्रम जोंपर्यंत महाराष्ट्राबाहेर वाढलीं नाहींत, तोंपर्यंत घरच्या शत्रूचा पाडाव होणें शक्य नाहीं. सबब

---

१ टीप—Vigorous offensive

प्रथम माळव्यांत व पुढें इतर प्रदेशांत चढाई करून हिंदुपदपातशाही स्थापन करणें हेंच मराठमंडळाचें कर्तव्य होय, असा बाजीरावाचा युक्तिवाद होता. हा वाद केवळ तात्विक स्वरूपाचा नसून प्रत्यक्ष कृतीचा होता, त्यामुळें मराठमंडळांत त्या वेळीं जोराची चळवळ उडाली. विचार करणारें डोकें व कृति करणारे हात बाजीरावाला होते[1], असें डफ ह्मणतो, तोच अर्थ रा. राजवाडे पर्यायानें सांगतात कीं, बाजीराव ही व्यक्ति स्वतंत्र विचाराची व स्वतंत्र आचाराची होती, ( खंड ३–प्रस्तावना. पृ. ६२ ). हीं दोनही विधानें अत्यंत अर्थपूर्ण आहेत. त्यांचें सार वरील वादांत दिसून आलें. बाजीराव व चिमाजीआपा हे दोघेही पराक्रमी होते. त्यांच्या अंगीं राष्ट्रप्रेम उचंबळत होतें. त्यांच्या उद्योगास महाराष्ट्राची भूमि तोकडी होती. तेव्हां त्यांनीं आपल्या जोरदार वाणीनें आपल्या ह्मणण्याची सत्यता शाहूचे मनास पटवून दिली. प्रतिनिधीला राज्यांच्या घडामोडी समजत होत्या, असें त्याच्या एकंदर आयुष्यक्रमावरून दिसत नाहीं. बाळाजी विश्वनाथास कारभारांत प्राधान्य मिळाल्यापासून प्रतिनिधीचें महत्त्व कमकुवतपणामुळें कमी होत गेलें. ज्यास समोर भांडण्याचें सामर्थ्य नाहीं, तो आडमार्गाचा अवलंब करितो. सबब कोणत्याना कोणत्या उपायानें पेशव्याचें पारडें कमी करण्याचा प्रतिनिधीचा यत्न होता. स्वतःच्या ह्मणण्याची तड पोंचविण्याची कांहीं विशिष्ट योजना त्यानें काढिली होती असें दिसत नाहीं. स्वतः मोहिमांवर जाऊन लढाया जिंकण्याचें सामर्थ्य त्याच्यांत विशेष नव्हतें. कर्नाटक व कोंकण इत्यादि स्वाऱ्यांत तो गेला, त्या ठिकाणीं त्याच्या हातून महत्कृत्य कांहीं न घडतां उलट थोडाबहुत बिघाडच झाला. प्रतिनिधीनें निजामाला महाराष्ट्रांत बळजोर होऊं दिलें. जेव्हां जेव्हां

---

[1] Bajrao had the head to plan & the hand to execute.

बाजीरावानें निजामास पेंचांत आणून त्याचा नाश करण्याचा योग आणावा, तेव्हां आयत्या वेळीं प्रतिनिधीनें मध्यें पडून तो योग फुकट घालविलेला आहे. या जुन्या मंडळीची करामत तीन चार वर्षें पाहून त्यांचे हातून कांहींच कार्यसिद्धि होत नाहीं याचा अनुभव येऊन, अगदीं कंठाशीं आल्यावर मग शाहूनें बाजीरावावर सर्व भिस्त टाकिली. महाराष्ट्राची व्यवस्था सुरळित करणें हा जर विरोधक मंडळीच्या मनांतला खरोखर हेतु असता, तर निजामास पायबंद लावणें हें त्यांचें पहिलें काम होतें. या कामांत या विरोधकांनीं नेहमींच व्यत्यय आणिलेला आहे. कोणतेंही राजकारण सिद्धीस जाण्यास पाठीमागें मनगटाच्या जोराची अपेक्षा असते. हा प्रकार सीदीसातावरील मोहिमेंत प्रत्यक्ष प्रतिनिधीच्याही पुढें अनुभवास आला. वारणेच्या तहापूर्वीं प्रतिनिधीनें संभाजीवर स्वारी केली एवढी त्याची तीस वर्षांच्या कारभारांतली एकच कामगिरी इतिहासांत नमूद आहे. तो शाहूला सोडून दूर जात नसे. आणि जवळ राहून बाहेरच्यांची बरी वाईट चिकित्सा तो शाहूजवळ करी. बाहेरच्या पराक्रमापेक्षां राजधानींतील शाहूचा खासगी कारभार, देणग्या बक्षिसें, लग्नकार्यें, दानधर्म इत्यादि प्रकारचा घरगुती उद्योग त्यास ज्यास्त आवडे. ( भोसले महा० ची बखर,–ठाणें रुमाल १-पृ. १२९-१३० ). खासगी वर्तनांत तो सज्जन व मनमिळाऊ असून शाहूचा त्याजवर लोभ होता. बाजीरावाची त्यास भीति वाटे, तेवढ्या पुरताच तो त्यास विरोध करी.

शाहू मात्र राज्यांतलीं तमाम कारस्थानें व निरनिराळ्या व्यक्तींची करामत ओळखून होता. त्यास स्वपराक्रमाची जोड असती तर त्याचें नांव शिवाजीसारखें सर्वत्र गाजलें असतें. प्रतिनिधीचा नेभळेपणा प्रत्ययास आल्यावर शाहूनें बाजीरावास हाताशीं धरिलें आणि पुढें त्यास संतोष-

पूर्वक पाठबळ दिलें. तदनुसार बाजीरावानें जोरानें बाहेर उद्योग सुरू केला त्याचें वर्णन पुढें येईल.

बाजीरावाच्या वेळेस मराठशाहीचा उद्योग एकाच वेळीं पुष्कळ इसमांकडून पुष्कळ ठिकाणीं चालू होता. अर्थात् अमुक एक क्रम ध्यानांत घेऊन सर्व प्रकरणें जुळविणें शक्य नाहीं. रा. राजवाडे ह्मणतात, शाहूनें बाळाजी विश्वनाथास दिलेल्या यादींतील सर्व कलमें स. १७३१ च्या सुमाराला साधिलीं. त्या पुढचीं बाजीरावाचीं वर्षे हिंदुपदपातशाहीच्या स्थापनेंत गेलीं, ( खं. १ प्रस्तावना पृ. ३८ ). या धोरणांस अनुसरून गुजराथ, महाराष्ट्र,कोंकण, कर्नाटक वगैरे ठिकाणचे व्यवहार प्रथम सांगून, उत्तरेकडचे व्यवहार सर्व एकदम पुढें निराळे घेतले आहेत. अभ्यास करणारांसही हाच क्रम सोयीचा होईल.

५. कर्नाटकची स्वारी, ( सेप्टेंबर १७२५–जून १७२६ ). शिवाजीच्या वेळेपासून मराठ्यांनीं कर्नाटकांत काय काय उद्योग केले त्यांचें वर्णन पूर्वीं आलेंच आहे. तंजावरास व्यंकोजीच्या वंशांतील सरफोजी भोसले स. १७२१ पासून १७२७ पावेतों राज्यावर होता. स. १७२३ च्या पावसाळ्यांत त्रिचनापल्लीकडे निजामाचा शह आल्याचें शाहूस कळल्यावरून, सरफोजीच्या बचावाकरितां शाहूनें आपली फौज कर्नाटकांत पाठविण्याची सिद्धता केली. कर्नाटकची व्यवस्था फत्तेसिंग भोसल्याकडे असून, त्यानें मुरारजी घोरपडे, हिंदुराव, वजारतमाब, ह्यास तिकडील बंदोबस्तासाठीं त्रिचनापल्लीस ठेविलें होतें. ' निजाम अर्काटपावेतों जाणार ह्मणून वर्तमान आलें आहे. ह्मणजे त्रिचनापल्ली महास्थळ तेथें खवडळी करतील. ह्मणून मुरारजीची कुमक करणें स्वामीस अत्यावश्यक. ऐशियास निजामाचें आगमन झालेंच तरी टक्कर देणें,' अशी आपल्या कित्येक सरदारांस शाहूनें आज्ञा केली. ( सेप्टेंबर स. १७२३, शा. म. रो. ३ ] परंतु निजाम सन. १७२३ च्या

ऑक्टोबर पर्यंत दिल्लीसच होता, आणि त्या नंतर एक वर्षपावेतों त्याचा काळ महाराष्ट्रांतच आपली घडी बसविण्यांत गेला. बाजीरावानें त्यास इकडील उद्योगांतून मोकळा होण्यास वाव दिला नाहीं, म्हणून स. १७४३ पावेतों निजामास कर्नाटकांत उतरण्यास फावलेंच नाहीं. तथापि स. १७२४ तील साखरखेडर्याच्या लढाईनंतर निजामाचें व मराठ्यांचें सडकून वांकडें आलें असतां, कर्नाटकांत उतरण्यास त्यास अवकाश मिळूं नये म्हणून फत्तेसिंग भोसले व प्रतिनिधि यांच्या सल्ल्यानें शाहूनें कर्नाटकांत फौज पाठविली. कर्नाटक प्रांत निजामाच्या सुभेदारींत गणला जात होता, आणि फत्तेसिंग भोसले व प्रतिनिधि यांचे तिकडे हितसंबंध असल्यामुळें त्यांच्याच आग्रहानें ही स्वारी उपस्थित झाली. 'तुम्हांस कित्येक मनसुब्याचे आज्ञा कर्तव्य ते करून, प्रतिनिधीचा व तुमचा एक बेत करून दिल्हा आहे. प्रस्तुत विजयादशमीचे मुहूर्तें स्वामी प्रतिनिधीस रवाना करतील. तर तुम्हीही आपले फौजेचा गाहा करून विजयादशमीस स्वार होऊन पंढरपुरचे रोखें येणें व प्रतिनिधीस सामील होऊन त्यांचे विचारें वर्तोन स्वामिकार्य करणें' अशी आज्ञा शाहूनें खंडेराव दाभाडे सेनापति व सुलतानजी निंबाळकर सरलष्कर यांस केली. (सेप्टेंबर १७२५, शा. म. रो. १४). बाजीरावास तर शाहूनें स्वतःच हुकूम करून फत्तेसिंग व प्रतिनिधि यांजबरोबर कर्नाटकांत रवाना केलें. सोंधें, बिदनूर सुरापुर, गदग, लखमेश्वर, श्रीरंगपट्टण वगैरे ठिकाणच्या संस्थानिकांकडून मराठ्यांस खंडण्या येत असत, त्या अलीकडे कांहीं वर्षें आल्या नव्हत्या, त्या वसुल कराव्या, किल्लेकोट सोडवावे, हाही या स्वारीचा उद्देश होता. फत्तेसिंग भोसले याची जहागीर अक्कलकोटावरून कर्नाटकचे बाजूस असल्यामुळें, त्याजकडे कर्नाटक सुभा सांगावा व सरदार वाढवावे, ऐसें सिद्ध करून त्यास शाहूनें या स्वारीचें आधिपत्य दिलें. केवळ शाहूच्या आग्रहास्तव बाजीरावास या वेळीं फत्तेसिंहाचे

हाताखालीं काम पत्करावें लागलें. ' प्रतिनिधि ' दाभाडे सेनापति, रघूजी भोसले व सरलष्कर वगैरे मराठे सरदारांस ' फत्तेसिंगबावाबरोबर जावें. त्यांचे विचारांत चालावें, ऐसें सांगितलें, पंनास हजार फौज स्वारींत गेली. ' बाबूजी नाईक बारामतीकरही या स्वारींत होता. मुरारराव घोरपडे हिंदुराव यास आगाऊ शाहूनें पत्रें पाठवून ' तुम्ही सामानसुद्धां सरकारचे फौजेंत येऊन सेवा करून दाखवावी ' असें लिहिलें. त्याप्रमाणें मुरारराव येऊन सामील झाला. मराठ्यांना या स्वारींत एकंदरींत पुष्कळ यश आलें. त्यांनीं तुंबलेल्या खंडण्या पुनः वसूल घेतल्या, साल्याबाद पुढें घेण्याचा ठराव केला. पूर्वींचीं हुजूरचीं ठाणीं गेलीं होतीं तीं सोडविलीं; ज्यांनीं मगरुरी केली त्यांचे प्रांतास व त्यांस जरब दिली. पुढें जातां त्रिचनापल्लीस दादखान ह्मणून होता, त्याशीं लढाई करून संस्थान घेतलें; आणि फत्तेसिंगानें तें संस्थान मुरारराव घोरपडे याचे स्वाधीन केलें. बहुत द्रव्य व खजिना घेऊन फत्तेसिंगबावा परत आले.' परंतु या स्वारींत मराठ्यांचे अतोनात हाल झाले. आपसांतल्या चुरशीमुळें कोणी कोणाचें ऐकेना. सबब स्वारीचा हेतु व्हावा तितका यशस्वी झाला नाहीं. याचें अपयश फत्तेसिंग, प्रतिनिधि वगैरेंवर येऊन, त्यांच्या करामतीविषयीं शाहूचा मरंवसा उडत जाऊन, तो बाजीरावासंबंधानें दृढ होत चालला. ह्या स्वारींत मराठी फौजेचे अतोनात हाल होऊन, अंतर्वैमनस्यांमुळें फलसिद्धि फारशी झाली नाहीं, ही गोष्ट खं. ३ ले० ५. ७. १०९ ( शा. न. ब. पृ ४८ वरून उघड होते. खंड ३ ले १०९ हा पोवाडा असून तो या स्वारीच्या अव्यवस्थेचें जिवंत स्मारक गणतां येईल.

प्रतिनिधि व फत्तेसिंग भोसले बाजीरावाचे विरुद्ध असून पुढें रघूजी भोसले त्यांत सामील होऊन त्रिकूट बनलें. ह्या योगानें राज्याचीं कामें कशीं बिघडत गेलीं आणि त्यांमुळें शाहूची कशी त्रेधा उडत असे, हें रोजनिशींतील कित्येक उल्लेखांवरून व्यक्त होतें. मा[illegible] [illegible]र्षी

राहिलेलें काम पुरें करावें ह्मणून शाहूनें बाजीराव व सेनापति यांस स. १७२६ च्या विजयादशमीचे मुहूर्तानें पुनः कर्नाटकांत रवाना केलें, ते तिकडे स. १७२७ च्या मार्च पर्यंत होते. ह्या वेळीं बाजीरावाचें साह्य करण्याविषयीं शाहूनें सरदारांस हुकूम सोडिले ( शा. म. रो. १९, २२ ). परंतु फौजा कर्नाटकांत गेल्याबरोबर मागें निजामानें महाराष्ट्रांत अशी घाबरपट्टी उडवून दिली कीं, शाहूनें बाजीराव व सेनापति यांस लगोलग परत बोलाविलें; आणि उदाजी पवार, कंठाजी कदम व पिलाजी गायकवाड इत्यादि दूरच्या प्रांतांत वावरणाऱ्या सरदारांसही त्यानें महाराष्ट्रांत येण्याविषयीं १७२७ चे मार्चांत निकडीचे हुकूम पाठविले. ( सदर २२५ ). मिळून ह्या दुसऱ्या वर्षींही बाजीरावास कर्नाटकांतील कामगिरी यशस्वी करून दाखवितां आली नाहीं. एप्रिलांत तो परत येऊन पुढील उद्योगास लागला. रोजनिशींतील उल्लेखांवरून पाहतां कर्नाटकच्या ह्या दोन स्वाऱ्यांत कान्होजी भोसल्याचें नांव येतें, रघूजीचें येत नाहीं. स. १७२८ च्या सुमारास कान्होजीस कमी करून शाहूनें रघूजीस पुढे आणिलें, म्हणून त्या वर्षापूर्वीं बखरकारांनीं रघूजीचा केलेला उल्लेख अवास्तव दिसतो. ह्यानंतर फत्तेसिंग व रघूजी यांनीं स. १७४०त कर्नाटकावर स्वारी केली तोंपर्यंत मराठ्यांना तिकडे लक्ष घालण्यास फावलेंच नाहीं. स्वतः बाजीराव तर दक्षिणच्या कारभारांतून आपलें अंग सर्वस्वी काढून इतःपर माळवा दिल्लीच्या कारभारांतच आपलें लक्ष घालूं लागला; आणि तिकडेच त्यानें आपल्या कर्तबगारीचें साफल्य मानिलें. बाजीरावानें कर्नाटकच्या बाजूस असें दुर्लक्ष केल्यामुळें मराठशाहीचें नुकसान कसें झालें, याचें विवेचन रा. राजवाड्यांनीं मार्मिकपणें केलें आहे. ( खं. २ प्रस्ता. पृ. २९ ). निजामाला कर्नाटकाकडे शह बसविण्यास हळू हळू संधि मिळाली; अर्काटचे नबाब व श्रीरंगपट्टणचे राजे यांस जोर आला; आणि मराठ्यांचे विरूद्ध त्यांस

फ्रेंच इंग्रज वगैरेशीं कारस्थानें करतां आलीं; तेणेंकरून या परस्थ व्यापाऱ्यांनीं कर्नाटकच्या कारभारांत प्रवेश केला. याचे ऐवजीं शाहूची छाप अगोदरच कर्नाटकावर चांगली बसती तर, तंजावरचे राजांस जोर येऊन त्यामुळें क्लाइव्ह, डुप्ले, हैदरअली यांच्या कारस्थानांस अवकाशच राहिला नसता. ह्या दृष्टीनें कर्नाटकच्या कारभाराचें महत्त्व मराठशाहीस अतोनात होतें. पुढें नानासाहेब पेशव्यानें स. १७५३ पासून लागोपाठ अनेक स्वाऱ्या करून कर्नाटक प्रांत पादाक्रांत केला, परंतु त्या पूर्वींच युरोपियनांचा पाय तिकडे चांगला मजबूत होऊन गेला होता.

६. **निजामाची चढाई व शाहूची तारांबळ—( १७२४-२७ ).**— बाजीरावाच्या कारभाराचीं पहिलीं सात आठ वर्षें बहुतेक निजामाचीं कारस्थानें हाणून पाडण्यांत खर्च झालीं. ह्या काळांत माळवा, कर्नाटक वगैरे ठिकाणीं मराठे सरदारांचे संचार झाले ते सुद्धां निजामानें उपस्थित केलेले होते. शाहूच्या रोजनिशींतील पहिल्या चाळीस अंकांतील उल्लेख अगदींच तुटपुंजे असले, तरी त्यांवरून निजामानें सर्व ठिकाणीं मराठ्यांवर कसा कहर उसळून दिला होता, आणि त्याचा प्रतिकार करण्यांत शाहूची धडपड कशी चालली होती, ह्याची कल्पना होते. रोजनिशींतील उतारे संपूर्ण कागद एकत्र जुळवून सुसंगतीनें लावलेले नाहींत व कालानुक्रमापलीकडे ऐतिहासिक संगतीचा विचार ते उल्लेख जुळविणाराच्या मनांत आलेला दिसत नाहीं. अशी संगति न जुळली तरी या उल्लेखांवरून कित्येक मुद्दे स्पष्ट दिसतात. निजाम दक्षिणेंत आल्यावर त्याजला मुबारीजखान हा मोठा शत्रु उत्पन्न झाला, तेव्हां निजामानें त्याचा पाडाव करण्याकरितां मराठ्यांची मदत मागितली. शाहूनें ही मदत कबूल करून, त्यानें आपल्या सरदारांस मुबारीजखानावर चालून जाण्याचे हुकूम काढिले. 'विचारें मनसबा करणें, उतावीळ न करणें, भागानगरकर मोगल फौज तोलदार सामान पुरा आहे.

कान्होजी भोसले यासही सामील करून घेणें. बाजीराव प्रधानासही स्वामी तुम्हांकडे रवाना करीत आहेत,' अशीं पत्रें शाहूनें स. १७२४ च्या जानेवारींत सेनापति, चिमणाजी दामोदर व फत्तेसिंग व कान्होजी भोसले यांस पाठविलीं ( शा. म. रो. ४ व. ६७ ). निजामाशीं वाटाघाटी करण्यासाठीं त्याचा हस्तक ऐवजखान याजला भेटण्यास आनंदराव सुमंत औरंगाबादेस गेलेला होता, त्याचा पाठपुरावा फौजेनें करावा अशी शाहूनें दाभाडयास आज्ञा केली. त्यानेंही शपथपूर्वक कबुली दिली, परंतु त्याप्रमाणें त्यानें कांहींच केलें नाहीं, याबद्दल शाहूनें दाभाडयास ठपका दिला आहे ( शा. म. रो ५ ). यावरून कोणत्याही कारस्थानांत मराठे सरदार कुचराई करून आपापला भलताच पंथ पाहत होते हें उघड होतें. कान्होजी जाधव ही असाच कुचर होता. ' आनंदराव सुमंत यास ऐवजखानाकडे नाजूक कामास पाठविलें, त्यांबरोबर तुम्हीं जाणें म्हणून आज्ञा केली असतां तुम्ही गेलेच नाहीं. याउपर जमावानिशीं जाणें. ' ( सदर ८ ). सारांश, शाहू जाग्यावर बसून कागदी आज्ञा सोडणार, सुमंतासारखे लोक कारस्थान जुळवीत असतां, त्याचा पाठपुरावा सरदारांकडून होऊं नये, मग त्यानें हा कुचराईचा प्रकार शाहूस कळवावा आणि शाहूनें पुनरपि कागदी आज्ञा सोडाव्या, त्यांत यत्किंचित् कोणीं कांहीं कामगिरी केली कीं लगेच त्यांनीं बक्षिसें व इनामाचीं सनदापत्रें शाहूकडे मागावीं, असा हा प्रकार सारखा चालू होता, म्हणून मराठयांच्या कारस्थानांस जोर न येतां तीं बिघडत गेलीं.

इकडे निजामास चंद्रसेन जाधवाचें साह्य उत्कृष्ट असून शाहूचा कारभार उलथून पाडण्याचें ब्रीदच चंद्रसेनाचें असल्यामुळें, निजामाशीं सख्य जोडण्याचा शाहूचा प्रयत्न सिद्धीस गेला नाहीं. साखरखेडल्याच्या लढाईंत मुबारीजखान पडल्याबरोबर निजामास जोर चढला आणि चंद्रसेनाचे मदतीनें निजामानें शाहूवर चढाई केली. चंद्रसेनानें

शाहूचा सरदार संताजी पांढरे याजबरोबर लढून त्यास गारद केलें, तेव्हां शाहूनेंही आपल्या सरदारांची जमवाजमव जोरानें चालविली ( सदर ९ व २८ ). 'निजाम व शहामतखान यांनीं युद्ध आरंभिलें आहे, तरी तुह्मीं कोणाकडेही न जाणें' ( स. १२ ). थोरातानें मिरजेच्या मोगलाचा इसलामपुरास समाचार घेतला, त्याजबद्दल शाहूस संतोष झाला, आणि निजामास थोडासा आळा बसतांच, कर्नाटकाकडील त्याचा संचार बंद पाडण्याकरितां शाहूनें स. १७२५-२६ त मोठी फौज त्या प्रांतांत रवाना केली. इतक्यांत पिलाजी जाधवाचा आप्त निळकंठराव जाधवास निजामानें पकडून कैद केलें, आणि जंजिऱ्याच्या सीदीचीही उठावणी केली, त्यांचा बंदोबस्त करण्याविषयीं शाहूनें बाजीराव व कान्होजी आंगरे यांस आज्ञा केली. ( सदर १७-१८ ) तसेंच कर्नाटकांत गेलेल्या फौजांनीं काय उद्योग केला त्याची खबर शाहूस पुष्कळ वेळ कांहींच न कळल्यामुळें, त्यानें चिंताग्रस्त होऊन सर्व सरदारांस खबर विचारिली आहे. खंडेराव सेनापतीबरोबर त्याचा मुलगा त्रिंबकरावही कर्नाटक स्वारींत होता. ( १५ ) कर्नाटकांतील कामगिरी स. १७२५-२६ सालीं पुरी झाली नाहीं ह्मणून पुनः पुढील सालीं शाहूनें बाजीरावास व दाभाड्यास कर्नाटकांत रवाना केलें, त्याबरोबर निजामाचा हस्तक ऐवजखान ह्यानें कान्होजी भोसल्यावर चाल करून, त्याचा पराभव केला, परंतु चिमणाजी दामोदर, फत्तेसिंग भोसले व नारो राम वगैरे मंडळींनीं त्वरित मागें येऊन कान्होजीचा बचाव केला आणि चंद्रसेनाचा फितुर मोडला याबद्दल शाहूनें या सर्व मंडळींचें अभिनंदन केलें आहे. ( फेब्रुवारी १७२७, शा. म. रो. २३, २४ ). परंतु बाजीराव व सेनापति दूर असल्यामुळें वरील सरदारांच्या हातून चंद्रसेनाचा पाडाव झाला नाहीं आणि निजामाचा उपसर्ग वाढतच गेला ( सदर २६ ). कान्होजी व फत्तेसिंग भोंसले यांच्या हातून निजामास तंबी पोंचेना, तेव्हां शाहूनें बाजीराव

व दाभाडे यांस कर्नाटकची मोहीम सोडून तसेंच परत बोलाविलें, ( सदर २७ ) आणि चिमणाजी दामोदरासही ठपका दिला. इकडे खंडेराव दाभाड्याविषयीं शाहू साशंक झाला. 'गनिमानें जलदी काढिली आहे, तुह्मी प्रस्तुत काय विचार करितां, फौज किती आहे, तें लिहिणें. अविलंबें निजामाचे पिच्छावर येऊन पायबंद देणें' ( सदर २९ व ३० ). ह्या वेळीं शाहू पुष्कळ पेंचांत सांपडला असून निजामाचा बंदोबस्त करण्याची धडपड करीत होता ( सदर ३२, ३३ ), ह्या पेंचांतून त्याची सुटका बाजीरावानेंच केली.

बाजीराव व फौजा कर्नाटकांत गेल्याबरोबर निजामास इकडे जोर चढला. प्रतिनिधि फत्तेसिंग भोंसले, कान्होजी भोसले, चिमणाजी दामोदर वगैरे घमेंडखोर मंडळींच्या हातून त्याचा प्रतीकार बिलकूल होईना; वर्ष दीड वर्ष सर्व खेळखंडोबा झाला; एक लढाईची तयारी करी, तर दुसरा निजामाशीं सख्य जोडण्याची गुळचट सिद्धता घडवून आणि. अशा धरसोडीनें निजामाचें चांगलेंच फावलें. त्यानें शाहूवर अनेक बाजूंनीं एकदम लगट केली. भिमेच्या कांठापर्यंत येऊन इंदापुर, पेडगांव हीं ठाणीं निजामानें घेतलीं व पाटसही हातचें जाणार, असा योग आला. पाटस गेलें कीं पुणेंही आटपलेंच. या वेळीं भिमेवर राणोजी शिंदे थोडे लोक घेऊन कसेंबसें निभावीत होता; त्यास पाटस हातचें जाऊं देऊं नये असें बाजीरावानें लिहिलें. परंतु फौजेचा व पैशाचा पुरवठा झाला नाहीं तर लढावें कसें ? याजबद्दल राणोजीस राग येऊन त्यानें एक वैतागाचें पत्र बाजीरावास लिहिलें तें वाचण्यालायक आहे. ( इ. सं. ऐ. टि. भा. २ ले. ३५ ). सारांश अशा बिकट परिस्थितींतून बाजीरावानेंच निजामास तंत्री पोंचवून शाहूस निर्धास्त केलें. कुचर सरदारांची मनधरणी करण्याचा खेळ त्यानें सोडून दिला. निजामाशीं सख्य जोडण्याचा नादही सोडिला, आणि लष्करी धोरणें

संभाळून एकदम चहूं बाजूंनीं निजामावर लगट केली, त्याचाच परिणाम पुढील पालखेडची मोहीम होय. यापूर्वीं शाहूचे सरदार फुटकळ प्रयत्न करीत होते, त्यांत बाजीरावानें एकसूत्री आवेशाची भर घालतांच शाहूचे पक्षास जोर चढला. या जोराच्या तयारीचे निदर्शक शा. म. रो. ले. ३६–४० चे कागद आहेत. सारांश चार वर्षांच्या कारभारांत शाहूस जुन्या सरदारांची करामत कळून चुकली व त्याचा विश्वास बाजीरावाच्या कर्तृत्वावर दृढ झाला.

**७ पलखेडची लढाई,–निजामाचा पाडाव, मुंगी शेवगांवचा तह** ( सेप्टेंबर १७२७–फेब्रुवारी १७२८ ).—आतां शाहूला हीनबल करण्याकरितां निजाम काय उलाढाली करीत होता तें पाहूं. स. १७२४ च्या ऑक्टोबरांत साखरखेडयाची लढाई होऊन मुबारीजखान मारला गेला आणि निजामानें स्वतंत्र राज्य स्थापन केलें. हा प्रकार पाहून बादशहाचें चित्त अत्यंत उद्विग्न झालें. माळवा व गुजराथ हे दोनही प्रांत पूर्वीं निजामाचे कारभारांत दिलेले होते, ते बादशहानें निजामाचा बंडखोरपणा पाहून त्याजकडून काढून घेतले. अफगाणिस्तानच्या कारभारावर सरबुलंदखान होता, त्यास बादशहानें गुजराथेवर नेमिलें, ( स.१७२३ ), आणि राजा गिरिधर यास माळव्याचा कारभार सांगितला. तेव्हां तूर्त दक्षिणेंतच आपली स्थिरस्थावर चांगली करण्यांत निजामानें पुढील एक दोन वर्षे घालविलीं. साखरखेडयाचे लढाईपूर्वींच निजामानें मराठयांशीं सलुखाचें धोरण ठेविलें होतें. त्यानें पेशव्यास आपल्या साह्यासाठीं बोलाविल्यावरून बाजीराव साखरखेडयाचे लढाईंत त्याचे मदतीस गेला होता. ( खं. २ पृ. ४९ ) या लढाईनंतर निजामाची व बाजीरावाची भेट झाली तिचें वर्णन खं. ३ ले. ९७ च्या अखेरीस आहे. बाजीराव स. १७२४ च्या अखेरीस मोगलाईंत गेला तो पुढील सालच्या मार्चपर्यंत निजामाशीं बोलणें करण्यांत गुंतला होता. स. १७२५ च्या

फेब्रुवारींत निजाम व शाहू यांची भेट पुण्यास झाली. ( ख. ३-१५ ) पुढें साताऱ्यास आल्यावर पावसाळ्यांत कर्नाटकच्या स्वारीची वाटाघाट चालली, आणि तो बेत कायम होऊन स. १७२५ सेप्टेंबर पासून २६ च्या जूनपर्यंत कर्नाटकची स्वारी झाली. बाजीराव कर्नाटकांत गेला असें पाहून निजामानें नवीन डाव आरंभिला. माळवा व गुजराथ प्रांत हातचे जाऊन मराठ्यांचे सरदार दक्षिणच्या सहा सुभ्यांतून आपले हक्क उघड वसूल करूं लागले, या योगानें निजामाच्या स्वतंत्रतेस मोठीच अडचण आली. बाजीराव एवढा पराक्रमी निघेल अशी त्यास कल्पना नव्हती. बाळाजी विश्वनाथाच्या व्यवस्थेनें व बाजीरावाच्या कर्तबगारीनें मराठ-मंडळांत जूट उत्पन्न होऊन त्यांस नवीन कार्यक्षेत्र मिळालें, आणि दुहीचें निरसन परभारें होऊं लागलें. महाराष्ट्र व कर्नाटक या दोनही प्रांतांत मराठ्यांनीं आपला अंमल चांगला बसविल्यामुळें निजामाची पैदास सर्वस्वी बंद झाली. त्यामुळें बाजीरावाचा बंदोस्त करणें त्यास प्राप्त झालें, आणि हैदराबाद येथें आपली राजधानी करून प्रतिनिधीच्या मार्फत त्यानें शाहूकडे आपला डाव सुरू केला.

मराठ्यांच्या वाढत्या शक्तीवर कायमचें दडपण बसविण्याकरितां निजामानें औरंगाबाद सोडून हैदराबादेस आपलें वास्तव्य केलें. तेथून कर्नाटकांत शिरून तिकडचा मराठ्यांचा उद्योगही हाणून पाडण्याचा त्याचा बेत होता. चौथाई सरदेशमुखीच्या निमित्तानें मराठे वाटेल तिकडे संचार करितात, तो त्रास मिटविण्याकरितां त्यांच्या हक्कांबद्दल त्यांस रोख रक्कम देऊन आणि प्रतिनिधीस हाताशीं घेऊन बाजीरावास निस्तेज करण्याचा आणि अशा रीतीनें फूट पाडून मराठ्यांची शक्ति नाहींशी करण्याचा निजामाचा ह्या जंगी कारस्थानांत अंतस्थ व दूरदृष्टीचा घाट होता. परंतु हा घाट बाजीरावानें पूर्णपणें ओळखिला. आपल्या राज्याच्या मध्यभागीं हैदराबादेस निजामानें ठाणें

दिलेलें बाजीरावास रुचलें नाहीं. डफ ह्मणतो, या वेळीं तहाची चांगली संधि बाजीरावानें फुकट घालविली. हें डफचें ह्मणणें चुकीचें आहे. बाजीरावानें निजामाचा डाव ओळखून त्याचा त्यानें लगेच कसा योग्य प्रतीकार केला, हें पुढें लवकरच दिसून आलें.

हैदराबाद राजधानींत मराठे चौथाई घेतात, त्या ऐवजीं दुसरें उत्पन्न कांहीं देऊन मराठयांचें येणें जाणें त्या मुलखीं बंद करावें असें मनांत आणून, प्रतिनिधीचे विद्यमानें निजामानें शाहूमहाराजांशीं बोलणें करून कांहीं द्रव्य व इंदापुराजवळ कांहीं मुलुख मराठयांस द्यावा ' ( रा. खं. २ शकावलि ) असें बोलणें करण्याकरिता आनंदराव सुमंताचे मार्फत निजामानें आपले वकील प्रतिनिधीकडे पाठविले; आणि प्रतिनिधीस वऱ्हाडांत एक नवीन जहागीर करून दिली. शाहूनें मुत्सद्दी मंडळीचा विचार घेतला. बाजीरावास या मसलतीचा राग आला. ती आपल्या राज्यास व मराठयांचे उद्योगास विघातक आहे, असें त्यानें साफ कळविलें. परंतु हें त्याचें प्रतिपादन शाहूला मान्य झालें नाहीं. 'निजाम दूर भागानगर प्रांतीं जाऊन राहतात तें एका अर्थी चांगलें आहे' असें शाहूनें बाजीरावास सांगितलें. त्यावरून राग येऊन बाजीराव रुसून पुण्यास गेला. ' शाहूनें दादो भीमसेन ह्मणून हैदराबादकडील हक्कवसुलाच्या कामावर होता, त्यास आणवून, आकार व मोबदला महाल कोणते द्यावे हें पाहून, तसा मोबदला करून तहनामा ठरविला आणि प्रतिनिधीचें मनोगत सिद्धीस नेलें ( शा. म. च पृ. ५२-५३ ) अशा प्रकारें स्वराज्याच्या हद्दीवर निजामाची सुव्यवस्था आपल्या हातानें प्रतिनिधीनें करून दिली; आणि हिंदुपदपातशाहीच्या उद्योगास व्यत्यय आणिला. प्रतिनिधीच्या कमकुवत राजकारणाचा हा परिणाम होय. हें कारस्थान स. १७२७ जून पावेतों चाललें असावें.

या प्रकरणानें मराठ्यांचा आपमतलबी स्वभाव व बाजीरावाची कर्तब-

गारी या दोहोंचेंही उत्कृष्ट प्रदर्शन झालें. प्रतिनिधि देशस्थ व बाजीराव कोंकणस्थ. बाळाजी विश्वनाथाच्या वेळे पासून पुष्कळसे कोंकणस्थ लोक राज्यकारभारांत पुढें आले, तेणेंकरून प्रतिनिधीसारख्या जुन्या पुरुषांचें माहात्म्य अर्थात् कमी झालें. याचबद्दल प्रतिनिधीस अत्यंत वैषम्य वाटे. आणि तो हर तऱ्हेनें बाजीरावाचे उद्योग हाणून पाडी. शाहूला हे कावे समजत नव्हते असें नाहीं. तो प्रत्येकाची करामतही ओळखून होता. परंतु आपलें वजन कायम राखण्यासाठीं तो एकाचे विरुद्ध दुसऱ्यास चढवीत असे. असें करण्यांत शाहूची तात्पुरती निभावणूक झाली, परंतु राज्याचें नुकसान झालें. दरबारांतच दोन पक्ष व फूट असल्यामुळें कोणत्याही कारस्थानास जोर असा आलाच नाहीं, आणि शत्रूंस मात्र उचल घेण्यास अवकाश मिळाला. प्रतिनिधीनें निजामाकडून आपणास वऱ्हाडांत जहागीर घेतली, हा एक प्रकारचा लांचच होय; आणि त्या वरून बाजीरावाशीं त्याचा विरोध केवळ मतलबाचा होता, तत्त्वाचा नव्हता, असें ह्मणतां येतें. राज्यकारस्थानाची वाटाघाट चालू असतां मराठे वकिलांनीं शत्रुपक्षाकडून अशा जहागिरी मिळविल्याचीं उदाहरणें अनेक आहेत. आनंदराव सुमंतानें व पुढें नानाफडणिसानें, निजामाकडून जहागीरी मिळविल्या. असेंच प्रतिनिधीच्या नादानें आपण फसलों हें अल्पावकाशांतच शाहूच्या प्रत्ययास आलें. शाहूच्या दरबारांतील दुफळीचा फायदा घेऊन निजामानें लगेच भयंकर कारस्थान रचिलें. चंद्रसेन जाधव व रावरंभा निंबाळकर, दाभाडे व पिलाजी गायकवाड हे सरदार त्यास वश होतेच. प्रस्तुत कोल्हापुरच्या संभाजीसही त्यानें वश करून घेतलें. ' संभाजीस चिथवून त्याजकडून शाहूपाशीं राज्याचा निम्मा हिस्सा त्यानें मागविला. दोघां बंधूंचा हा कज्जा आपण मध्यस्थ होऊन तोडूं, असा बहाणा करून निजामानें चौथाई व सरदेशमुखी हकाचा पैसा जप्तींत ठेविला. या उपक्रमानें शाहूसंभाजींचा भाऊबंदकीचा तंटा पुनः उप

स्थित झालेला लक्षांत येतांच, शाहूस राग आला, आणि त्याला या कारस्थानाची उमज पडली. इतक्या दिवसांचा उद्योग फुकट जाऊन पुनः आपल्या घरगुती तंट्याचा निकाल निजामानें आपणाकडे घेतला ही गोष्ट शाहूचे मनास अतिशय झोंबली. बाजीराव तर प्रथमपासूनच निजामाचा हा कावा शाहूस कळवीत होता. कर्नाटकांतील मोहीम फसल्याबद्दल प्रतिनिधि शाहूच्या मनांतून पुष्कळ उतरलाच होता. त्यास वरील निजामानें केलेला बखेडा प्रत्ययास आल्याबरोबर प्रतिनिधीच्या कर्तृत्वासंबंधानें शाहूच्या मनांतील आदर पूर्णपणें लयास गेला, आणि आलेल्या अरिष्टाचें निरसन करण्यासाठीं शाहूनें बाजीरावास लगेच तयारी करण्यास सांगितलें. ता. २७ ऑगस्ट स. १७२७ रोजीं बाजीरावानें निजामावर मोहीम सुरू केली.

पेशव्याची मुख्य फौज व सरदार या वेळीं माळव्यांत गुंतलेले होते. निजामानें आपली तयारी साखरखेड्याच्या लढाईपासून अत्यंत काळजीनें केली होती. संभाजी आपल्या फौजेसह त्यास येऊन मिळाला. अशा बिकट प्रसंगीं बाजीरावानें निजामाचा पाडाव करण्याचा ताबतोब उद्योग केला. त्यामुळें त्याच्या कर्तृत्वाची छाप एकदम सर्व मराठमंडळावर बसली, आणि सर्व शत्रुसुद्धां त्यास वचकूं लागले. शाहूच्या मनांत आपण होऊनच निजामावर चालून जावें असें होतें, परंतु संभाजीवर चालून गेल्यास त्याची आपली बरोबरी होते; प्रत्यक्ष बादशहावर चालून जाणें आपणास योग्य होईल, अशी सरदारांनीं शाहूची समजूत घातली. 'शाहू बादशहाचा व बादशाही अंमलदारांचा मिंधा असल्यामुळें मोगलावर स्वतः चाल करून जाण्यापेक्षां सरदारांनाच पाठविणें त्याला योग्य दिसलें' (राजवाडे). बाजीरावाचे हाताखालीं काम करण्याविषयीं शाहूनें सर्व सरदारांस निकडीचे हुकूम सोडिले. प्रतिनिधि मात्र या तयारींत सामील झालेला दिसत नाहीं. उलट निजामानें त्यास आपला हस्तक

करून शाहूस असें कळविलें, कीं 'आमचा उपक्रम सर्वस्वी तुमच्या हिताचा होता. कोंकणी ब्राह्मणांनीं तुह्मास ग्रासून टाकिलें आहे, त्यांच्या ताब्यांतून तुह्मास मुक्त करावें एवढाच आमचा हेतु होता. तुमचे मोकासदार दूर करून त्यांचे जागी संभाजीचे कामगार नेमिले यांत गैर कांहीं नाहीं. तुमच्याच तर्फेनें काम करण्यास तूर्त आह्मी संभाजी यांस नेमिलें आहे. एकदां कोंकणी ब्राह्मणांचा निकाल लागला ह्मणजे आपण आपले पसंतीचे कामगार वाटेल ते नेमावे.' निजामानें दाखविलेली शाहूच्या हिताची ही कळकळ काय किमतीची होती हें, सांगण्याची जरूर नाहीं. शाहूचे दरबारांत उघड वाद करून बाजीरावाचा पाडाव झाला नाहीं, तेव्हां त्यास आडविण्याकरितां ही नवीन युक्ति शत्रूच्या मार्फत प्रतिनिधीनें सुमंताच्या मदतीनें रचिली असावी. आपसांतील दुहीमुळें राज्याचें नुकसान झाल्याचें हें आणखी एक उदाहरण आहे.

संभाजी या राजकारणांत कां सामील झाला याची मीमांसा शाहूचे बखरींत मार्मिकपणें दिलेली आहे, ( पृ. ५३-५५ ). संभाजी नाराज होता. शाहू त्यास राज्याचा वांटा देईना. उत्तरोत्तर शाहूची भरभराट होऊन त्याचे सरदार गुजराथ माळवा वगैरे प्रांतांत कारभार करूं लागले, त्याजबद्दल वैषम्य वाटून संभाजीनें आपला प्रधान निलकंठ प्रभु महाडकर याचा भाऊ केशवराव यास चंद्रसेनाकडे पाठवून त्याचे मार्फत निजामाशीं मसलत केली. तदनुसार संभाजी आपली फौज व सरदार यांजसह निजामास जाऊन मिळाला. शाहूनें संभाजीस बोधपर पत्र लिहून त्याची पुष्कळ कानउघाडणी केली. त्याचा उपयोग न होतां निजाम व तो आपल्या साथीदारांसह शाहूच्या प्रदेशावर चालून आले.

शाहूनें या प्रसंगीं सेनापति, सरलष्कर, सेनासाहेब सुभा, वगैरे सरदारांस बाजीराव प्रधान याचे मसलतीनें चालण्याविषयीं जोराचे हुकूम सोडिले. एकदम समोरासमोर युद्ध न करितां निरानिराळ्या ठिकाणीं

हुलकावण्या दाखवून शेवटीं कोठें तरी शत्रूस पेंचांत पकडावयाचें असा बेत बाजीरावानें आरंभापासूनच करून त्या धोरणानें मोहीम चालविली. सेनानायकाचें उत्कृष्ट धोरण व युद्धाचे निरानिराळे डावपेंच बाजीरावाचे अंगीं कसे होते हें या मोहिमेंत व्यक्त झालें. स. १७२७ च्या ऑगस्टांत बाजीराव बाहेर पडला. प्रथम औरंगाबाद जिल्ह्यांत शिरून जालना प्रांत त्यानें उद्ध्वस्त केला. नोव्हेंबरच्या आरंभीं निजामाचा सरदार ऐवजखान यानें बाजीरावावर चाल केली. त्याजबरोबर थोडीशी चकमक झाडून बाजीराव आग्नेयीस माहूरकडे वसला. तेथून ताबडतोब पुनः औरंगाबादेकडे येऊन 'बऱ्हाणपुरावर जाऊन तें शहर जाळून टाकतों' असा पुकार करून तो लूट करीत खानदेशांत शिरला. तेव्हां बऱ्हाणपुरचा बचाव करण्यासाठीं निजाम व ऐवजखान ताबडतोब बऱ्हाणपुराकडे गेले. बाजीरावानें नुसती हूल दाखविण्याकरितां एक टोळी बऱ्हाणपुराकडे रवाना केली, आणि आपण मुख्य फौजेनिशीं पश्चिमेकडे वळून लूट करीत गुजराथेंत उतरला. गुजराथचा सुभा सरबुलंदखान व निजाम यांचें वाकडें होतें. सरबुलंदखानास बाजीरावानें असें कळविलें, कीं 'आमचा व निजामाचा स्नेह होऊन त्याच्याच सांगण्यानें आम्ही गुजराथेवर आलों आहों.' इकडे निजाम बऱ्हाणपुरास येतांच बाजीरावानें आपणास फसविलें असें पाहून रागारागानें तो एकदम पुण्यावर चालून येण्यासाठीं परत फिरला. ही बातमी बाजीरावास गुजराथेंत कळतांच, करवंद बारीनें घाट चढून, त्यानें गोदावरीच्या पूर्व तीरावरचे बैजापूर व गांडापूर हे निजामाचें परगणे लुटून फस्त केले. ही बातमी निजामास अहंमदनगरास कळली. तेव्हां लगेच पुण्याचा रोख सोडून तो गोदावरी उतरून पूर्वेकडून बाजीरावास आडवा झाला. तेव्हां बाजीरावानें पैठणच्या बाजूस पालखेड नजीक एका अत्यंत अडचणीच्या जागीं निजामास गांठून सभोंवारच्या प्रदेशांतील दाणावैरण सर्व जाळून शत्रूस पाणी सुद्धां मिळण्याची बंदी केली. २५ (फेब्रु. १७२८).

संभाजी व चंद्रसेन यांजकडील मराठी फौज ' जशास तसें ' या न्यायानें बाजीरावाशीं लढून आपल्या उपयोगी पडेल अशी निजामास आशा होती, ती सफळ झाली नाहीं. त्यांची व निजामाची पुष्कळ बाचाबाच झाली. ' पुढे चालणें घडेना; तेथेंच मुक्काम करून राहवें तर पाणी सुद्धां नाहीं; असे बहुत घाबरे झाले. ' तेव्हां ऐवजखानामार्फत निजामानें तहाचें बोलणें लाविलें. तें ऐकिल्यावर प्रधान व सरदार यांनीं एकविचारें करून सांगून पाठविलें कीं, ' दोन मातबर कारभारी ओलिस पाठवून द्यावे, म्हणजे पाण्याची वाट देऊन मुकाम करवितों. ' त्याप्रमाणें मुंगीशेवगांवच्या बाजूस पाण्याचे जागीं निजामास जाण्यास बाजीरावानें मोकळीक दिली; आणि तेथें तहाच्या अटी कळविल्या त्या अशाः--

१ संभाजी निजामाजवळ होता त्यास आपल्या हवालीं करावें; २ मोगलांचे सहा सुभ्यांवर मराठ्यांचे हक्क सुरळित चालवावे; आणि ३ पुनः या हक्कांस हरकत न व्हावी म्हणून ठिकठिकाणीं तटबंदीच्या जागा आहेत त्या मराठयांचे हवालीं कराव्या. निजामानें पुढच्या दोन अटी कबूल केल्या, मात्र पहिली संभाजीची मान्य केली नाहीं. त्या संबंधीं वाटाघाट होऊन संभाजीला निजामानें पन्हाळ्यास पोंचवावें आणि पुढें त्याजबद्दल पाहिजे ती व्यवस्था शाहूनें करावी असें ठरावांत आलें. या प्रमाणें तह पुरा होऊन दोनही पक्षाचे लोक आपापल्या ठिकाणीं गेले. मुंगीशेवगांवचा हा तह पालखेडच्या लढाईनंतर ता. ६ मार्च १७२८ रोजीं झाला. संभाजीस कृतकर्माचा चांगलाच पश्चात्ताप झाला. तह झाल्यावर निजामानें सर्व सरदारांस वस्त्रें जवाहीर मेजवानी वगैरे दिली. भेटी झाल्या. महाराजांस पोषाख, जवाहीर, हत्ती घोडे नजर दिले. निजामासही उलट पोषाख बाजीरावानें दिले. बाजीरावादि मंडळी परत येतांच महाराजांनीं सामोरे जाऊन सन्मान करून स्वतः सर्वांचा गौरव केला. युद्धकलेच्या संबंधानें निजाम हा तत्कालीन योद्धयांत चतुर

गणला जात असे. त्यास बाजीरावानें नरम केलें या मुळें त्याचा लौकिक पुष्कळ वाढला.

मात्र या प्रकरणानें निजामाचा कायमचा बंदोबस्त झाला नाहीं. या दीर्घद्वेषी कारस्थानी व्यक्तीचा खरा अंदाज मराठ्यांस लागला नव्हता. मोगलांवर उघड शस्त्र उचलण्यास शाहू कचरत होता, आणि प्रतिनिधि वगैरे मंडळींचा विरोध पाहून आपण कमावलें हेंच पुष्कळ, असें बाजीरावास वाटलें असावें. पुढें एक दोन वर्षांतच निजामानें दाभाड्याचें कारस्थान उभारलें. तथापि शाहूनें आपला तह पूर्णपणें पाळिला. शाहूच्या रोजनिशींत ले० १८५–८९ पावेतोंच्या स. १७२७ ते ३५ दरम्यानच्या शाहूच्या आज्ञा छापलेल्या आहेत. त्यांत निजामाचा व आपला सल्ला आहे, त्याचे प्रांतास उपसर्ग करूं नये, असें शाहूनें आपल्या सरदारांस वारंवार लिहिलेलें आहे.

बाजीरावाच्या पराक्रमानें त्याचा वचक मात्र आतां सर्व ठिकाणीं व सर्व मराठमंडळावर चांगला बसला. शाहूची तर खात्रीच झाली कीं, अडचणीच्या प्रसंगीं पेशव्याशिवाय आपलें कांहीं चालावयाचें नाहीं. या वेळेपासून बाजीरावाच्या पराक्रमास व मराठशाहीच्या धोरणास निराळा अवकाश प्राप्त होऊन, हिंदुपदपातशाहीचा बाजीरावाचा उद्योग जोरानें चालू झाला. प्रतिनिधि, दाभाडे, चिमणाजी दामोदर, सुलतानजी सरलष्कर वगैरे जुनी मंडळी बाजीरावाच्या पराक्रमानें व त्याच्या उत्तरेकडील नवीन उठावानें आपोआप मागें पडली. त्यांजशीं समोर विरोध केल्यानें शाहूचें मन द्विधा होऊन, त्यास त्यांची भीड तुटत नाहीं, तेणेंकरून आपलेंच कारस्थान बिघडतें, ही खुणेची गोष्ट बाजीरावानें मनांत ठसवून इतःपर त्यानें या मंडळीचा व दक्षिणेकडील कारभाराचा नाद साफ सोडून दिला. पुढील उद्योगांत त्यानें शिंदे, होळकर, पवार इत्यादि आपल्या भरंवशाची नवीन मंडळी हातांशीं घेतली. तेणेंकरून जुने निः-

सत्व मुत्सद्दी आपोआप मागें पडले. निजामावरील ही मोहीम व स. १७२८ हें वर्ष मराठशाहीच्या इतिहासांत मोठेंच क्रान्तिकारक झालें असें दिसून येतें.

मराठशाहीच्या अमदानींत निरनिराळ्या इसमांचे उद्योग निरनिराळ्या स्थळीं अनेक प्रकारें चालू होते. उत्तर हिंदुस्थानांत शिंदे, होळकर वगैरे, गुजराथेंत दाभाडे, दक्षिणेस कोल्हापुरकर संभाजी, कोंकणांत आंगरे, सीदी, ब्रह्मेंद्रस्वामी, तसेंच पूर्वोत्तर दिशेनें निजाम वगैरे परस्थ लोकांचीं अनेक महत्त्वाचीं प्रकरणें व कारस्थानें केव्हां एका काळीं, तर केव्हां पृथक्पणें चालू होतीं. त्या सर्वांत बाजीरावाचें अंग होतेंच असें नाहीं. सबब बाजीरावाच्या हकीकती केवळ कालक्रमानें दाखल करणें शक्य नाहीं. योग्य समजुतीकरितां एक एक प्रकरण स्वतंत्रपणें दिलें आहे. निजामाच्याच झगड्याचें एक अंग संभाजीचा पाडाव होय, त्याचें वर्णन आतां पुढें देण्यांत येत आहे.

---

## प्रकरण आठवें.

### दोघां राजबंधूंचा समेट.

### स. १७३०–३१

१. संभाजीचा पाडाव ( मार्च, स. १७३० ).
२. शाहूसंभाजीची भेट ( २७ फेब्रुवारी, १७३१ ).
३. वारणेचा तह ( २१ एप्रिल, १७३१ ).
४. संभाजीचा पुढील आयुःक्रम.

**१. संभाजीचा पाडाव ( स. १७३० ).**—बाजीरावाच्या पूर्व कारभाराचे दोन भाग मागें सांगितले, त्यांतील पहिल्यांत निजामाचा पाडाव, संभाजीशीं समेट, व राज्योद्योगास अडथळा आणणाऱ्या सेनापतीस ताळ्यावर आणणें हीं तीन प्रकरणें मुख्य होत. ह्या तीनही प्रकरणांत

शाहू व पेशवा यांचें पूर्ण तादात्म्य असून पहिल्या पेशव्यानें अंगीकारिलेला कार्यभाग सिद्धीस नेण्यास शाहू किती झटत होता हें त्यावरून दिसून येतें.

शाहू दक्षिणेंत आल्यावर त्याचें सं. १७०७ त स्वकीयांशीं युद्ध सुरू झालें तें तेवीस वर्षांनीं कऱ्हाडानजीक कृष्णेच्या काठीं उभय बंधूंची भेट होऊन संपलें. या अवधींत त्या युद्धाचीं कसकशीं स्थित्यंतरें होत गेलीं, त्यांचें वर्णन वर वेळोवेळीं आलेंच आहे. या युद्धांतूनच मराठशाहीचा विस्तार झाला. बाळाजी विश्वनाथानें मराठे सरदारांस महाराष्ट्राबाहेर युद्धाची नवीन कामगिरी देऊन अंतःकलहापासून थोडें बहुत निवृत्त केलें, परंतु तेवढ्यानें अखेरचा निर्णय निश्चित झाला नव्हता. बाळाजीच्या अकालीं मृत्यूनें तर शाहूच्या शत्रूंस पुनः जोर आला असता, परंतु बाजीरावाचा पराक्रम चमकूं लागून चार पांच वर्षांच्या अवधींत शाहूचे शत्रु सर्व नरम झाले. स. १७२८ तील मुंगीशेवगांवच्या तहानें संभाजीची बाजू अगदींच बसली. त्यानंतर दाभाड्यानें नवीन कारस्थान निजामाच्या साह्यानें उपस्थित केलें, त्यांत सामील होण्यास संभाजीस अवकाशच मिळाला नाहीं. स. १७३० त चिमाजीआपा गुजराथेंत चौथाईचा अंमल बसवीत असतां, इकडे संभाजी उदाजी चव्हाणाची मदत घेऊन शाहूवर चढाई करून येत होता, त्याचा समाचार प्रतिनिधीनें घेतला. हा प्रकार प्रथम स्पष्ट करून सांगितला पाहिजे.

अथणीकर उदाजी चव्हाण याची हकीकत मागें थोडी येऊन गेली आहे. ( पृ. ५३ ). शाहूला तो बंडखोर वाटे, परंतु संभाजीचा तो केवळ मुख्य साह्यकर्ता होता. त्यास प्रथम रामचंद्रपंत अमात्यानें वाढविलें. तो बलाढ्य व पुंड असून त्याच्याच आधारावर संभाजीनें शाहूशीं थोडीबहुत धडपड चालविली होती. बाजीरावानें त्यास चांगलें धाकांत ठेविलें होतें. सन १७२९ ता. ६ जानेवारीस शाहूनें त्यास लिहिलेल्या पत्रांत खालील मजकूर आहे. ' बोलीप्रमाणें वर्तावयास अंतर न पडे म्हणून लिहिलें त्या-

वरून स्वामी संतोष पावले. तुम्ही एकवचनी आहां, तुम्हां पासोन बोलिले वचनास वर्तावयास अंतर न पडे हा निशा आहे. इमान श्रींचा बेलभंडार पाठविला तो पावला. ( शा. म रो. २१३ ) स. १७२९ त बाजीराव व चिमाजी आपा दोघेही बाहेर गेलेले पाहून उदाजी चव्हाणानें वारणेच्या तीरीं येऊन मुलूख लुटण्यास आरंभ केला. शिरवळचे ठाण्यांत राहून बाहेरच्या मुलखास तो उपद्रव देऊं लागला. एके दिवशीं शाहू त्या बाजूस शिकारीस गेला असतां, चव्हाण जवळच आसपास आहे असें कळलें. त्यावरून अभय देऊन शाहूनें त्यास भेटीस बोलाविलें. भेट होऊन तो परत गेला. पुढें एके दिवशीं शाहूला मारण्यासाठीं आलेले चार मारेकरी जंगलांत भेटले. चव्हाणाकडून किंवा संभाजीकडून ते आले होते असें कळलें. तेव्हां संभाजीचें व चव्हाणाचें पारिपत्य करण्याचा विचार करून शाहूनें त्यासाठीं मोठी तयारी केली. 'स्वामी पन्हाळे प्रांतीं मोहिमेस जातात ' असें लिहून, शंभूसिंगे जाधव, दावल सोमवंशी, सिधोजीराव निंबाळकर, सेखोजी आंगरे, बाजीराव प्रधान, पिलाजी जाधव या सर्वांस पत्रें लिहून मोहिमेस बोलाविलें. हीं पत्रें ऑक्टोबर १७२९ पासून १६ फेब्रुवारी १७३० पावेतोंचीं आहेत. ( शा. म. रो. ४२–४६ ). त्यावरून पुढील मार्च एप्रिलांत प्रतिनिधीची ही लढाई झाली असली पाहिजे. त्रिंबकराव दाभाडे यासही शाहूनें ले. ४६ चें पत्र लिहिलेलें आहे. ' हेरलें येथील वाडा घेऊन कोल्हापुराभोंवते राहून चव्हाणास तंबी पोंचविणें, लांब न जाणें, ' अशी शाहूची आज्ञा सेनापतीस आहे. सिधोजी थोरात, दावलजी सोमवंशी, राणोजी घोरपडे इत्यादि अनेक लहान मोठया सरदारांस उदाजी चव्हाणावर चालून जाण्याची शाहूनें आज्ञा केली. ( रोजनिशी ले. २१५, २१६ ) सारांश, शाहूचा विचार असा दिसतो कीं, संभाजीनें पुनः निजामाशीं कारस्थान करूं नये, त्याचा बंदोबस्त कायमचा करावा, आणि त्याचे सर्व साथीदार नाहींसे

करावे. अशा उद्देशानें प्रधान, प्रतिनिधि, सेनापति व इतर झाडून सारे सरदार जमवून आपण स्वतः वारणेच्या बाजूस तळ देऊन पलीकडे कोल्हापुरच्या राज्यांत त्यानें मोहीम सुरू केली. निजामास सामील झाल्या वेळेपासून प्रतिनिधि शाहूच्या मनांतुन पुष्कळ उतरला होता, आणि कांहीं तरी पराक्रम दाखवून पुनः शाहूची मर्जी संपादावी अशी त्यास उत्कंठा झाली होती. तेव्हां शाहूनें तरी त्याची परीक्षाच पाहण्याकरितां बाजीराव वगैरे जवळ असतांही मुद्दाम प्रतिनिधीस चव्हाणावर रवाना केलें. त्याजबरोबर शंभुसिंग जाधव यास जाण्याचा शाहूनें हुकूम केला. (शा.म.रो.ले. ४२ तारीख १४ ऑक्टोबर १७२९,व ले.४४ ता ५ जानेवारी १७३०). हा शंभुसिंग जाधव धनाजीचा मुलगा कांहीं वर्षें भाऊ चंद्रसेन याजबरोबर निजामाकडे होता. परंतु तेथें भावाशीं बिघाड होऊन तो शाहूकडे आला. त्याजला बहुधा हीच पहिली कामगिरी सांगितलेली असावी. रोजनिशींतील लेखांक ४२–४५ यांवरून कळतें, कीं ही स्वारी संभाजीच्या पन्हाळे प्रांतावर शाहूनें चालविली असून, खुद्द शाहू उंब्रजेपर्यंत गेला होता. १७२९ ऑगस्ट पासून १७३० ऑगस्ट पर्यंत बाजीरावाचा मुक्कामही सबंद वर्ष पुणें साताऱ्याचे बाजूस शाहूचे समीप होता, असें त्याच्या मुक्कामांचे यादीवरून दिसतें ( ना. रो. २ ).

उदाजी चव्हाणानें संभाजीस हिंमत देऊन शाहूमहाराजाशीं लढण्यास प्रवृत्त केलें. संभाजीनें आपल्या अष्ट प्रधानांस व सरदारांस पत्रें पाठवून आपआपल्या फौजांसह हजर होण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणें सर्व फौज येऊन वारणातीरीं जमा झाली. व्यंकटराव घोरपडे व भगवंतराव अमात्य हेही या फौजेंत होते. पण त्यांची भक्ति अंतर्यामी संभाजीकडे नव्हती. शाहूची तयारी होतांच त्यानें श्रीनिवासराव प्रतिनिधि यास संभाजीवर चालून जाण्याचा हुकूम केला. प्रतिनिधीनें अकस्मात् येऊन छापा घालतांच संभाजीच्या फौजेची दाणादाण होऊन, संभाजी व उदाजी चव्हाण

सडेच पळून गेले. प्रतिनिधीनें सर्व लष्कर लुटून फस्त केलें आणि हजारों लोक पाडाव केले. पाडाव झालेल्यांत ताराबाई, राजसबाई, संभाजीच्या बायका, भगवंतराव अमात्य व व्यंकटराव घोरपडे हे प्रमुख होते. यांपैकीं राजसबाई व संभाजीच्या बायका यांस पन्हाळ्यावर पोंचवून बाकीच्या तिघांस घेऊन प्रतिनिधि साताऱ्यास आला. ताराबाईस परत पाठविण्याचा शाहूचा विचार होता, परंतु ' मला कोठें झालें तरी कैदेंतच राहवयाचें, त्या अर्थी तुह्मांजवळच राहूं, ' असें तिचें ह्मणणें पडल्यावरून, साताऱ्च्या किल्ल्यावर राजवाडा होता तो दुरुस्त करून तेथें ताराबाईस ठेविलें; आणि यादो गोपाळ यास तिचा कारभार सांगितला. ताराबाई कोल्हापुरास जाती तर पुढें साताऱ्यास रामराजाची स्थापना बहुधा झाली नसती, आणि कांहीं अंशीं मराठशाहीचा इतिहास बदलला असता. भगवंतराव अमात्याचा दंड स्वतःच्या इज्जतीखातर संभाजीनें भरून त्यास सोडवून आणिलें. व्यंकटरावाचा तपासच त्यानें केला नाहीं. प्रतिनिधि त्यास बंडखोर समजून मुक्त करीना. तेव्हां बाजीरावानें दहा हजार रुपये दंड भरून प्रतिनिधीपासून त्याची सुटका केली. प्रतिनिधि व बाजीराव एकाच धन्याचे सेवक; आणि लढाईत पाडाव झालेल्या शत्रूचा दंड एक सेवक दुसऱ्या सेवकापासून घेतो हा राजनीतीचा मासला तत्कालीन राज्यव्यवस्थेचा निदर्शक आहे. ( का. सं. प. या. ले ४२२, शा. म. ब., इचलकरंजी इ० खरेकृत पृ ३९ ). पुढें संभाजीनें शाहूस शरण जाऊन आपली व्यवस्था लावून घेण्याचा निश्चय केला. संभाजी कोणाचे सल्ल्यानें वागत होता तें समजत नाहीं. त्याची बायको जिजाबाई हीच बहुतेक कारभारीण होती. तिचीं भगवंतराव अमात्यास आलेलीं कांहीं पत्रें खंड ८ मध्यें आहेत ( ले. ९९, ११७, ११८ ). जिजाबाईच्या स्वभावाचें वर्णन रा. खरे यांनीं मार्मिकपणें केलें आहे, त्यावरून संभाजीचें राजकारण समजण्यास मदत होईल. जिजाबाई अग्नीप्रमाणें प्रखर असून

तिची शासनें कडक असत. स्वकार्य साधण्याच्या नादांत एखादा पसंत पडलेला मार्ग योग्य आहे कीं अयोग्य आहे याचा विचार ती करीत नसे. तिचा स्वभाव अत्यंत संशयी होता. आपला नाश करण्याविषयीं सर्व टपले आहेत असें तिला वाटे. कोल्हापुरच्या राज्याची स्थापना करण्याचें श्रेय जिजाबाईस आहे असें सामान्यतः म्हणण्यास हरकत नाहीं. या वेळेस व पुढें माधवराव पेशव्याचे वेळेस कोल्हापुरच्या राज्याचा बचाव झाला, याचें कारण जिजाबाईचें शहाणपण होय. जिजाबाईप्रमाणेंच ताराबाई दंगेखोर, खटपटी व अधिकार गाजविण्याविषयीं आतुर होती, परंतु अशा प्रयत्नांनीं आपला हेतु सिद्धीस जाईल कीं नाहीं हें ताराबाईला कळत नव्हतें. जिजाबाई तशा स्वभावाची असूनही मोठी धोरणी होती. आपलें व प्रतिपक्षाचें बलाबल ओळखून आणि प्रसंग पडेल त्याप्रमाणें वागून, केवळ आपलाच हेका न चालवितां, प्रसंगीं पडतें घेऊन ती आपलें कार्य साधीत असे. हें तडजोडीचें चातुर्य ताराबाईस मुळींच नव्हतें. तथापि स. १७३० च्या सुमारास कोल्हापुरचा कारभार सर्व अव्यवस्थित होता. जिजाबाईचें व दुसऱ्या कोणाचें पटत नसे. सरदारांवर व प्रधानांवर तिजकडून जुलूम होत असल्यामुळें करवीर राजमंडळांत घोटाळे व जुलूम चालू होते. शिवाय जिजाबाईचें राज्यांत वजनही आरंभीं तिच्या अपक्व वयांत विशेष नव्हतें.

जिजाबाईशिवाय कोल्हापुरचे प्रधान संभाजीचे सल्लागार होते असें म्हणतां येईल. असे प्रधान या वेळीं कोण होते व ते कशा योग्यतेचे होते हें समजेल तर या वेळच्या घडामोडींवर जास्त प्रकाश पडेल. स. १७२३ त तिमाजी रघुनाथ हा कोल्हापुरचा प्रधान होता ( खंड ३ ले. २३६, खं. ८ ले. ८३ ). स. १७२९ त चिमणाजी दामोदर प्रधान होता ( खं. २० ले. १८३.१८४ ); आणि त्याच्या नंतर स.१७३१ त व पुढें केशव त्र्यंबक नांवाचा प्रधान होता. ( खं. ८ ले. १२५, १३३ ).

राजाकर्णाचा कारभारी सुंदर तुकदेव व त्याचा मुलगा त्रिंबक सुंदर यांच्या उत्पन्नांतील बाहे गांवासंबधानें कोल्हापुरच्या राज्यांत भानगडी चाललेल्या होत्या, ( खं. ३ ले. २३८, २३९, २४०, २४१, २३६ या क्रमानें ). राज्याचें विभाग झाले नव्हतें तोंपावेतों संभाजी शाहूच्या राज्यांत व शाहू संभाजीच्या राज्यांत इनामें वगैरे देऊन मुद्दाम आपला अधिकार चालवून पाहत असत. केशव त्र्यंबक प्रधान हा सुंदर तुकदेवाचा नातू तर नसेलना ?

वर सांगितलेल्या लढाईंत प्रतिनिधीकडून संभाजीचा पराभव झाला नाहीं. १२ जुलै व १७ ऑक्टोबर स. १७३० चीं पत्रें शाहूनें संभाजी आंगरे व सिधोजी निंबाळकर यांस विशाळगड काबीज करण्याविषयीं लिहिलेलीं आहेत, ( रोजनिशी ले. ४७, ४८ ), त्यांवरून दिसतें कीं शाहूनें प्रतिनिधी करवीं पन्हाळ्यास वेढा देऊन विशाळगडास तंबी पोंचविली, म्हणजे पर्यायानें संभाजीचा अगदीं धुव्वा उडवून दिला, आणि आतां आपली धडगत नाहीं अशी संभाजीची खात्री झाली, तेव्हांच तो शरण येऊन तह करण्यास तयार झाला.

संभाजीचा साह्यकर्ता उदाजी चव्हाण याची पुढील हकीकत येथेंच संपविली पाहिजे. संभाजीचा व शाहूचा तह झाला तरी शाहूच्या राज्यांत दंगा करण्याचें काम त्यानें चालूच ठेविलें होतें. त्याचा व संभाजीचा प्रधान केशव त्र्यंबक यांचा पत्रव्यवहार होता ( खं. ८ ले. १३३ ). सन १७३१-३२ त यशवंतराव महादेव पोतनीस यास शाहूनें त्याजवर पाठविलें. यशवंतरावानें त्याचा मोड करून मोठा दंड घेऊन सोडून दिलें, ( शा. म च. पृ. ६९ व रा. खं. २ पृ. ६० ), आणि शाहूनें त्यास कामगिरीही सांगितली, ( रोजनिशी ले. २२० ). त्यानंतर पुनः मिरजेवर स्वारी करण्याकरितां म्हणून स. १७३७ त शाहू निघाला असतां उदाजी चव्हाण गनिमाची कुमक करूं लागला म्हणून त्याजवर शाहूनें

प्रतिनिधीस रवाना केलें. ( शा. म. च. ६१, ७० व खं २ पृ. ७७ ). चव्हाण पळून मोगलाईंत गेला. ता. ८ नोव्हेंबर रोजीं प्रतिनिधीनें आथणीचें ठाणें काबीज करून मध्यरात्रीं निशाण चढविलें. ( इ. सं. पे. द. मा. ले. ३९ ). चव्हाण मोगलाईंतून परत आला नाहीं, मधून मधून त्रास देतच होता. त्याचा निःपात होय ते गोष्ट करणें, ह्मणून त्रिंबकराव सोमवंशी यास स. १७४८ सालची शाहूची आज्ञा आहे, ( खं. ६-१८७). नानासाहेब पेशव्यानें सन १७५१ त युक्तीनें उदाजीस मोगलाईंतून आणून डिग्रज येथें सरंजाम देऊन ठेविलें. तेथें अद्याप त्याचा वंश सांगली संस्थानचे ताब्यांत आहे (का. सं. प या. १४४ व ४२२ ). तथापि उदाजीची खोड गेली नाहीं. डिसेंबर १७५२ त व फेब्रुवारी १७५३ त त्याजवर नानासाहेबानें स्वाऱ्या केल्याचे उल्लेख आहेत (शा. म. रो. २२६, २२७, २३०, २३२ ). त्यांत पेशव्यानें उदाजीचा उपद्रव न लागेल असा बंदोबस्त केला. उदाजीचा शेवटही लढाईंतच झाला. मिरज प्रांतीं एका खेड्यावर रोखा केला तो गांवकऱ्यांनीं मानला नाहीं, त्यावरून उदाजीनें गांवावर स्वारी केली, त्यांत घोडीस गोळी लागली, ती उधळली. रिकिबींत पाय अडकून डोकें फुटून मेले. पुत्र विठोजी डिग्रजेस व प्रीतिराव करवीरीं शिवाजी महाराजांपाशीं राहिले.

**२. शाहूसंभाजीची अपूर्व भेट** ( २७-२-१७३१ ).—साह्यकर्त्यांचा पाडाव झाल्यामुळें संभाजीचा उपाय हरला. लवकर शरण जाऊन आपली व्यवस्था लावून घेतली नाहीं तर कठीण प्रसंग गुदरणार. शाहूनें आतां सर्व बाजूंनीं उत्कृष्ट तयारी केली होती. संभाजीकडचे बहुतेक सरदार शाहूस अनुकूल झाले. शाहूनें त्यांची व्यवस्था लावून त्यांस आपल्या नोकरींत घेतलें. बाजीराव पेशवे, प्रतिनिधि, भोसले, आंगरे वगैरे अनेक पराक्रमी सरदार शाहूस अनुकूल झाले. प्रत्यक्ष ताराबाई पूर्वीचा ताठा सोडून त्याच्याच सन्निध जाऊन राहिली. स्वतः संभाजी स्वप्रवृत्तीनें एखादी

मसलत उभारून तडीस नेण्यास असमर्थ होता. दुसऱ्याच्या जिवावर त्याचे प्रयत्न चालत. परंतु त्याचे सर्व साथीदार नाहींसे होण्याचें मुख्य कारण शाहुची चलती होय. शाहूचा मनमिळाऊ स्वभाव, शत्रूस सुद्धां क्षमा करून आपलेसे करून घेण्याची त्याची हातोटी, लोकांचा परामर्ष घेण्याची त्याची कळकळ, आणि त्याच्या सरदारांचे चहुंकडे चाललेले पराक्रम, इत्यादि कारणांनीं संभाजीचें तेज अगदींच मंद झालें. 'या करवीर राज्यांत विवेक, विचार, शहाणे लोक, सभ्य चतुर विद्यावंत कोणी नाहींत. रा. शाहूराजे यांचे राज्यांत सरकारकून लक्षांचे लक्ष जिल्हे मामले खाऊन सुखरूप आहेत,' असे भगवंतराव अमात्याचे उद्गार आहेत,[ खं ८–९९]. लोकांसही या आपसांतील युद्धांचा कंटाळा आला होता. दुहीचे अनर्थ पुष्कळ लोकांस कळत होते. दोनही बाजूंस समंजस व राष्ट्रहित जाणणारी मंडळी बरीच होती. दोहोंकडील मुत्सद्यांच्या व हितचिंतकांच्या वारंवार भेटी होत. लग्नकार्यादि प्रसंगानें चालू राजकारणांची पुष्कळच वाटाघाट होई. सारांश, शाहू व संभाजी यांच्या प्रत्यक्ष भेटी होत नव्हत्या, तरी बाह्य जगाच्या दृष्टीनें दोघांचेही व्यवहार एका कुटुंबाप्रमाणेंच चाललेले होते. ताराबाई पन्हाळयास कैदेंत असतांनाही शाहूचा व तिचा पत्रव्यवहार चाले. इनाम, उत्पन्नें, लग्नकार्य इत्यादि व्यवहार त्यांस पत्रानेंच उलगडावे लागत. [ शा. म. रो. ले. १७२, १७३ ]. हीं पत्रें सन १७२३ ते २६ च्या दरम्यानचीं असून त्या पुढील ले. १७४ चें पत्र शाहूनें संभाजी व ताराबाई या दोघांस ता. १३ ऑगस्ट स. १७२८ रोजीं लिहिलेलें आहे. सारांश, अशा रीतीनें हें दोघां बंधूंचें भांडण मिटविण्यास अनुकूल वातावरण दोनही बाजूंस तयार होत चाललें होतें.

वास्तविक उभयतांचा कांहीं तरी तह ठरवावा असा प्रयत्न अगदीं अव्वलपासूनच चाललेला होता. अशा तहाचा एक प्रयत्न, [ खंड २० ले. २८२ ची तारीख बिनचूक असेल तर ] स. १७०८ तच झालेला

दिसतो. अशाच मासल्याचा दुसरा एक तह जानेवारी स. १७२६ चा का. सं. प. या. ले ४१९ व मोडककृत कोल्हापुरचा इ. परिशिष्ट नं. ३ यांत दिलेला आहे. हे कायम न झालेले मसुदे असावे. यावरून राज्याचा हिस्सा संभाजीस देऊन त्याची समजूत करण्याचा विचार शाहूच्या मनांत आरंभापासूनच होता असें दिसतें. या पहिल्या तहांत उत्तरेकडील प्रदेशांत संभाजीचा हिस्सा शाहूनें ठेविला होता. संभाजीचा बंडखोरपणा वाढत गेला, तसतशा तहाच्या अटी जास्त संकुचित होत गेल्या, हें ह्या पहिल्या तहाची व शेवटच्यांची तुलना केल्यानें दिसून येईल.

स. १७३० च्या उन्हाळ्यांत ताराबाई शाहूकडे येऊन राहिल्यावर दोघां भावांचा तह ठरविण्याचा उपक्रम सुरू झाला. प्रत्यक्ष उपक्रम कोणीं व कसा सुरू केला तें समजत नाहीं. भारतवर्ष पत्रें यादी लेखांक २, ५३ हीं दोन पत्रें संभाजीनें शाहूस लिहिलेलीं आहेत, तीं बहुतेक या वेळचीं आहेत.

श्रीमत्[1] सकल तीर्थस्वरूप राजाश्रिया विराजमान राजश्री. शाहूराजे दाजी वडिलांचे सेवेसीं. अपत्यें संभाजी राजे कृतानेक दंडवत विनंति उपरि येथिल कुशल श्रीकृपें व वडिलांचे आशीर्वादें जाणोन वडिलीं आशीर्वाद-पत्रीं कुशल वर्तमान सदैव लेखन करून समाधान पावविलें पाहिजे. विशेष. आशीर्वाद पत्र पाठविलें तें उत्तम समयीं प्रविष्ट झालें, कुशलवृत्त अवगत होऊन संतोषप्राप्ति जाली. निरंतर याच रीतीं परामर्ष करणें वडिलांस उचितच आहे. तीर्थस्वरूप मातुश्री साहेबीं वडिलांचे ममतेचा अर्थ व उभयपक्षीं स्नेहाची दृढता होऊन विवेक व्हावा म्हणून वडिलांचा चित्ता-भिप्राय लिहिला, तरी हे गोष्टी वडिलांस उचितच आहे. परस्पर विवेक होऊन लोकोत्तर उभय पक्षीं निर्दोष कीर्ति व्हावी हेंच आम्हांस अगत्य आहे. या अगोदरच मातुश्री साहेबीं राजश्री बावाजी प्रभु यांसी पाठ-

---

१ भा. व. प. या. ले. ५२. पुढचें अं. ५३ चें पत्र असेंच प्रेमळ आहे.

बावयाविषयीं लिहिलें होतें, तेव्हांच पाठवावे तरी त्यांचे शरीरीं सावकाश नव्हतें. प्रस्तुत मशारनिल्हेस पाठविलें आहे. सेवेसीं आलिया नंतर सविस्तर अर्थ विदित करतील. बहुत लिहिणें तरी वडील सुज्ञ असेती. मर्यादेयं विराजते. ( पत्राची प्रतिकृति पहा नवयुग १९१८ ).

या पत्रांत उल्लेखिलेला बावाजी प्रभु हाच बुवाजी अ० बोवाजी नीलकंठ प्रभु पारसनीस हा होय. हा चतुर व दुसऱ्यावर छाप बसविणारा असून उभय बंधूंचा स्नेह घडवून आणण्यांत यानें फार श्रम केले. हा आजारी असल्यामुळेंच तहाचें काम थोडें लांबणीवर पडलें.

याप्रमाणें राज्याची अर्धी वांटणी घेण्याचा हेका सोडून मराठी राज्यांत दुय्यम प्रतीचा धनीपणा पत्करून, शाहूमहाराजांशीं कशाही प्रकारें समेट करून घेण्यास संभाजी कबूल झाला. स. १७३१ च्या माघमासीं साताऱ्याहून संभाजीस आणण्याकरितां श्रीपतराव प्रतिनिधि, नारोराम मंत्री, अंबाजीपंत पुरंदरे, कृष्णाजी दाभाडे, निंबाळकर व पांढरे वगैरे कित्येक नामी नामी सरदार फौजसुद्धां पन्हाळयाच्या मुक्कामीं आले. सर्वांनीं नजरा करून जडजवाहीर हत्ती घोडे नजर केले. उपरांत पद्धतीप्रमाणें पोशाख घेऊन किल्याखालीं उतरले. नंतर संभाजीची स्वारी किल्याखालीं येऊन देवाळें नावली येथें मुक्काम जाहला. तेथून कूच दरकूच जाऊन वाठारावर मुक्काम केला.[1]

जखीणवाडीच्या मैदानांत भेटीची जागा मुकर केलेली होती. श्रीपतराव व नारोराम मंत्री वाठाराहून पुढें उंब्रजेस गेले. सफाईची बोलणीं समजाविलीं. शाहूनें कऱ्हाडावर श्रीकृष्णेतीरीं डेरे देऊन मुक्काम कराविला. जखीणवाडीपासून वाठारापावेतों उभयतां कडील संपूर्ण सरदार वगैरे मिळून दोन लक्ष पावेतों जथ जाहला. उभय महाराजांच्या स्वाऱ्या

---

१ पन्हाळयाहून कऱ्हाडास थेट दक्षिणोत्तर रस्ता येतो त्यावर पन्हाळा, नावली वडगांव, वारणातीर, इसलामपुर, वाठार, जखीणवाडी, कऱ्हाड हीं आहेत.

हत्तीवर अंबारींत बसून बिछायतीवरून मोठ्या मिरवणुकीनें लोकांचे मुजरे घेत घेत भेटीच्या जागे पावेतों आले. थोडें अंतर राहिल्यावर उभयतां महाराज हत्तीवरून उतरून स्वार झाले. नजीक आल्यावर उभयतां घोड्यांवरून उतरले. संभाजीनें शाहूच्या पायांवर मस्तक ठेविला. शाहूनीं त्यास उठवून आलिंगन दिलें. उभयतांच्या प्रथम भेटी श्रीकृष्णेसानिध्यें होऊन बहुत आनंद जाहला. त्या वेळीं परस्पर सुवर्ण रौप्य सत्के व पुष्पांची वृष्टि झाली. वाद्यें वाजलीं. तोफांची सरबत्ती झाली. फाल्गुन शुद्ध द्वितीया मंदवार शके १६५२, फेब्रुवारी ता. २७ स. १७३१, रोजीं राजश्री स्वामी कऱ्हाडास जाऊन राजश्री संभाजी राजे यांची भेट चवदावे घटकेस मध्यान्हीं झाली आणि सायंकाळीं माघारे कऱ्हाडास गेले. मुदपाक कऱ्हाडास केले. कऱ्हाड व जखीणवाडीमध्यें माळावर दुसरी भेट होऊन कसबे मजकुरीं श्रीकृष्णातीरावर मुक्काम केले. ( शा. म. रो. ले. १७५ ). नंतर शाहूनें संभाजीचा हात धरून उभयतां बंधू एका हत्तीवर स्वार झाले. खवासखान्यांत शंभुसिंग जाधव दोन मोर्चेलें घेऊन बसले. नंतर संपूर्ण लोकांचे मुजरे घेत स्वाऱ्या मुक्कामाच्या डेऱ्यावर आल्या. तेथें बहुत प्रकारें बोलणीं झालीं, आणि हत्ती घोडे, सुवर्णाचें सामान, जवाहीर, कोठार ऐसें शाहूनें संभाजीस दिलें. पुढें कऱ्हाडाहून उंबरजेस उभयतां महाराजांच्या खड्या स्वाऱ्या आल्या. तेथें मेजवान्या भोजनें झालीं. साताऱ्यास शिमगी पौर्णिमा व्हावी, ह्मणून ममतायुक्त आग्रहानें बोलावून साताऱ्यास घेऊन आले.[१]

त्या समयीं संपूर्ण शहरचे लोक बाहेर येऊन उभयतां बंधूंचा समारंभ पाहून सत्के व खैरात बहुत जाहली. संभाजीचा मुक्काम साताऱ्यास पेशव्याच्या वाड्यांत ह्मणजे अदालतीच्या वाड्यांत होता. दोन महिने

१ टीप.–चैत्र शु ॥ ४ स साताऱ्यास आले असें खंड ६ ले. ५१ वरून दिसतें. या लेखांत कांहीं तरी कारस्थान चाललें असल्याचा उल्लेख आहे.

मुक्काम झाला. चैत्र वा। १२ शके १६५३ ( २१ एप्रिल १७३१ ) रोजीं तह ठरला. त्यास वारणेचा तह असें ह्मणतात. तो खालीं दिला आहे. दोन महिने संभाजीचा मुक्काम सातार्‍यास होता. मोठमोठ्या सरदारांनीं संभाजीस मेजवान्या केल्या. शाहूनें हत्ती, घोडे, जडावाचा खंजीर, पोषाख व रोख दोन लक्ष रुपये असें देऊन रवानगी केली. बरोबर फत्तेसिंग भोसले फौजेनिशीं पन्हाळ्या पर्यंत दिले. स्वतः शाहू चार कोस पावेतों पोंचाविण्यास गेला होता. त्या भेटीचे कागदपत्र का. सं प. या. ले. ४१७, ४१८, ४२९ व ४५६ यांत आहेत, पैकीं ले. ४२९ हा तत्कालीन स्थिति डोळ्यांपुढें आणून वाचला असतां, भाषेच्या दृष्टीनेंही बहारीचा असून, त्यावरून Field of the cloth of gold नांवाच्या ठिकाणीं इंग्लंडचा आठवा हेन्री व फ्रान्सचा राजा यांची भेट झाली त्याची आठवण झाल्यावांचून रहात नाहीं.

**३. वारणेचा तह,** (२१ एप्रिल १७३१).–या तहाची एकंदर हकीकत रा. खरे यांनीं इचलकरंजीच्या इतिहासांत मोठ्या मार्मिकपणानें दिली आहे. तिचाच बहुतेक अनुवाद येथें केला आहे. तह चैत्र महिन्यांत झाला, परंतु त्याची नक्की तारीख निरनिराळ्या लेखांत आठ पंधरा दिवसांच्या फरकाची आढळते. दोन महिने वाटाघाट चालली होती, आणि सामान्य कलमें भेटीच्या पूर्वींच उभय पक्षांत ठरून गेलीं होतीं. हा तह शाहूनें संभाजीस लिहून दिलेला आहे, त्याजवर शाहूची मखलासी झाली, तो दिवस तहाचा धरला पाहिजे.

‘कलम १–इलाखा वारूण महाल तहत संगम दक्षिण तीर कुल दुतर्फा मुलूख दरोबस्त देखील ठाणीं व किल्ले तुह्मांस दिले असत.

२–तुंगभद्रेपासून तहत रामेश्वर संस्थानें निम्मे आह्मांकडे ठेवून निम्मे तुह्मांकडे करार करून दिलीं असत. ३–किल्ले कोपळ तुह्मांकडे दिला त्याचा मोबदला तुह्मीं रत्नागिरी आह्मांकडे दिला. ४–वडगांवचें ठाणें

पाडून टाकावें. ५–तुह्मांशीं जे वैर करतील त्यांचें पारिपत्य आह्मीं करावें. तुह्मीं आह्मीं एक विचारें राज्याभिवृद्धी करावी. ६–वारणेच्या व कृष्णेच्या संगमापासून दक्षिणतीर तहत निवृत्तिसंगम तुंगभद्रेपावेतों दरोबस्त देखील गड ठाणीं तुह्मांकडे दिलीं असत. ७–कोंकण प्रांत साळशीपलीकडे तहत पंचमहाल अकोलें पावेतों दरोबस्त तुह्मांकडे दिले असत. ८–इकडील चाकर तुह्मीं ठेवूं नये, तुम्हांकडील चाकर आह्मीं ठेवूं नये. ९–मिरज प्रांत विजापुर प्रांतींचीं ठाणीं देखील आथणी तासगांव वगैरे तुह्मीं आमचे स्वाधीन करावीं. एकूण कलमें ९ करार करून तहनामा दिला असे. सदरहुप्रमाणें आम्ही चालूं, यास अंतराय होणार नाहीं.' कलम ५ व ८ हीं दोन सामान्य व्यवस्थेचीं कलमें अमलांत आलीं, तसेंच कलम ३ हीं अमलांत आलें. वारुण महाल उदाजी चव्हाणाचे ताब्यांत होता, त्याजपासून घेऊन शाहूनें तो प्रतिनिधीस दिला. प्रतिनिधी-पासून पुढें तो पेशव्यांनीं घेतला, परंतु करवीरकरांस मिळाला नाहीं. कलम २ प्रमाणें तुंगभद्रेच्या पलीकडे अनेक स्वाऱ्या झाल्या, त्यांत कोल्हापूरकरांनीं भाग घेतला नाहीं, आणि खंडणीही त्यांस मिळाली नाहीं. वडगांवचें ठाणें करवीरकरांनीं पाडिलें नाहीं. कलम ६ प्रमाणें वारणेपासून तुंगभद्रेपावेतोंच्या मुलुखापैकीं जो प्रत्यक्ष संभाजीच्या ताब्यांत नव्हता तो पुढें शाहूनें व पेशव्यानें जिंकून घेतला, संभाजीस मिळाला नाहीं. कलम ७ ची हीच व्यवस्था आहे. कलम ९ तील मिरज आथणी वगैरे ठाणीं उदाजी चव्हाणाच्या ताब्यांत होतीं तीं संभाजीनें शाहूस दिलीं नाहींत, शाहू व पेशवे यांनीं पुढें जिंकून घेतलीं. कृष्णा व तुंगभद्रा यांचे दरम्यानचे प्रदेशांतील किल्ले वगैरे संभाजीचे हवालीं करण्याबद्दल शाहूनें आपल्या किल्लेदारांस पत्रें लिहिलीं. [ शा. म. रो. १७६ ]. तथापि या तहानें संभाजीच्या राज्याची वाढ झाली नाहीं. पूर्वीं जेवढें होतें तेवढेंच अद्यापपर्यंत राहिलें आहे. वास्तविक शाहूनें संभाजीस स्वतंत्र राज्य

तोडून दिलें नाही. राज्याचा हिस्सा असा संभाजीस मिळाला नाहीं. मुख्य राज्याचे ताब्यांत एक प्रकारची मोठीशी स्वतंत्र जहागीर राजघराण्यांतील पुरुष समजून, संभाजीस तोडून देण्यांत आली. २३ वर्षांच्या युद्धांत संभाजीची स्थिति सर्वथा इतकी खालावली, कीं संभाजी आपण होऊन भेटीस आला नसता तर इतकेंही त्यास मिळालें नसतें. हल्लीं ब्रिटिश राज्यांत जशीं संस्थानें आहेत, तसें मराठी राज्यांत हें एक संस्थान निर्माण झालें. याच वेळीं शिंदे, आंगरे, होळकर इत्यादिकांची संस्थानें निर्माण होत होतीं; परंतु तीं स्वपराक्रमावर वाढत असल्यामुळें त्यांची सर कोल्हापुरास कधींच आली नाहीं. मात्र संभाजीला व त्याच्या वंशजांला शाहूच्या पश्चात् आलेले अधिकारी धनीपणाचा औपचारिक मान देत गेले.

४. संभाजीचा पुढील आयुःक्रम ( स. १७३१–१७६० ).— सन १७३१ त उभय महाराजांच्या भेटी होऊन वारणेचा तह ठरला. त्यानंतर एकदां स. १७३४--३५त व पुनः १७४१ त संभाजीची स्वारी कुटुंबसह शाहूचे भेटीस साताऱ्यास आली होती. स. १७३४–३५ त संभाजी व जिजाबाई यांच्या स्वाऱ्या जेजुरीस आल्या; तेथून प्रतापगडास व महाबळेश्वरास जाऊन साताऱ्यास आल्या; समस्त सरदारांसह शाहू त्यांस सामोरा गेला. दोन महिने मुक्काम साताऱ्यास झाला; शाहूसुद्धां सर्व मंडळी शंभुमहादेवास गेली, तेथून बोरगांवपर्यंत सर्व बरोबर येऊन संभाजी कोल्हापुरास व शाहू साताऱ्यास आले. [ का. सं. प. या. ले. ४२९. खंड ८ ले.१४३ त ज्या भेटीचा उल्लेख आहे ती हीच असावी.] त्यानंतर पुनः स. १७४१ च्या माघफाल्गुनांत त्यांच्या स्वाऱ्या साताऱ्यास आल्या. ही भेट कांहीं कारणानें विशेष महत्त्वाची आहे. या भेटींत नानासाहेब पेशव्यानें संभाजीशीं एक गुप्त ठराव करून शाहूच्या पश्चात् संभाजीनें साताऱ्च्या गादीवर बसावें असें ठरविलें. हा प्रकार पुढें सांगण्यांत

येईल. वारणेच्या तहाप्रमाणें अम्मल होत नाहीं, आपणांस नाना तऱ्हेच्या अडचणी येतात, अशी संभाजीची नेहमीं तक्रार असून तदनुसार स. १७४१ च्या भेटींत व त्यापुढें स. १७४४–४५ त शाहूनें स्थानिक अम्मलदारांस पत्रें लिहून संभाजीचे हक्क बिनकसूर पोंचविण्याविषयीं ताकिदी लिहिलेल्या आहेत. ( शा. म. रो. १७७, १७९, १८० ). वरील भेटींत भगवंतराव अमात्याचें व संभाजीचें शाहूनें सख्य करून दिलें. कर्नाटकांतील कांहीं तालुक्यांसंबंधानें लढा होता तो मिटविण्याकरितां स. १७४६त संभाजी सहा महिने साताऱ्यास येऊन बसला होता. पेशव्यानें जामीन राहून तंटा मिटविला. [ रा. ब. पारसनीस संग्रह ].

स. १७५४ त नानासाहेब पेशवे व सदाशिवराव यांनीं कर्नाटकांत जातांना कोल्हापुरास संभाजीची भेट घेतली. या भेटींत संभाजीकडून नानासाहेबानें सदाशिवरावास प्रधानकीचीं वस्त्रें देवविलीं. पुन: परत येतांनाही ते कोल्हापुरास गेले आणि त्यांनीं जिजाबाईस आपल्याबरोबर पुण्यास आणून तिचा सन्मान केला. ( मोडककृत कोल्हापुरचा इतिहास, परिशिष्ट ६, ७, ८, ९ ). एकंदरींत पेशव्यांनीं संभाजीशीं प्रेमभाव राखिला होता.

संभाजीचा स्वभाव आळसी व रंगेल होता. लुटीच्या वगैरे आशेनें स्वारींत जाण्यास तो सर्वकाल तत्पर असे. त्यानें बराच पैसा व्यसनांत घालविला असें ह्मणतात. तो ता. २० माहे डिसेंबर सन १७६० रोजीं ठाणें वडगांव येथें मरण पावला. त्यास बायका सात होत्या, त्यांत तोरगलकर शिंदे घराण्यांतील जिजाबाई हीच कर्तृत्ववान होती.

निजामाच्या बगलेंतील दुसरा मदतनीस दाभाडे. चंद्रसेन जाधवाचा कित्ता दाभाड्यानें स्वीकारूं नये, ह्मणून त्यास ताळ्यावर आणण्याच्या प्रयत्नांत प्रकरण विकोपास गेलें तो भाग आतां सांगावयाचा आहे.

# प्रकरण नववें.

## सेनापति दाभाड्याचें पारिपत्य.

( स. १७३१. )

१ खंडेराव दाभाडे [ मृ. १७२९ ]
२ गुजराथच्या चौथाईची प्राप्ति [ स. १७२९ ]
३ डभईची लढाई दाभाड्याचा पाडाव ( १-४-१७३१ )
४ दाभाडे प्रकरणाचा राज्यकारभारावर परिणाम.
५ सर बुलंद्खानाचा शेवट.
६ अभयसिंग व पिलाजीचा खून. ( स. १७३२. )

**१. खंडेराव दाभाडे ( मृ. १७२९ ).**—दाभाड्यांचे पूर्वज तळेगांवास पाटिलकी करून होते. त्यांचा एक पुरुष येसपाटील बिन बाजपाटील दाभाडे हा शिवाजीजवळ हुजऱ्याचे कामावर होता. शिवाजीचे मृत्यूनंतर संभाजीनें येसाजी दाभाडे यास रायगडावर राजारामाचे तैनातीस ठेविलें होतें. संभाजीचा वध होऊन राजाराम जिंजीस गेला, तेव्हां त्याजबरोबर येसाजी व त्याचे दोन मुलगे खंडोजी व शिवाजी हेही जिंजीस गेले. तेथें राजसबाईचे पोटीं संभाजी जन्मास आला, त्या वेळीं राजारामानें तळेगांव येसाजीस इनाम करून दिलें. पुढें राजाराम जिंजीहून महाराष्ट्रांत आला, तेव्हां जनानखान्याच्या बंदोबस्तास येसाजी व त्याचे दोघे मुलगे बरोबर होते. रस्त्यांत संकटें आलीं असतां, या तिघांनीं आपल्या जिवाकडे न पाहतां धन्याची सेवा शिकस्तीनें केली. प्रवासांत शिवाजी दाभाडे मरण पावला; आणि राजा-

---

आधार-१ डफ्, डा. बर्गेस्‌ची इंडियन क्रॉनॉलाजी; टॉड; बखरी पत्रें.

दाभाडयांची वंशावळ [ का. सं.; खं ३-१६७. ]

बजाजी पाटील दाभाडे, रा. तळेगांव.

|

येस पाटील मोकदम तळेगांव. — सोमाजी दाभाडे

(येस पाटील मोकदम तळेगांव यांचे पुत्र:)

खंडेराव मृ. १७२९१ स्त्री उमाबाई- मृ. पुण्यास २८-११-१७५३ — शिवाजी मृ. लढाईत वऱ्हाडांत

(खंडेराव यांचे पुत्र:)

त्र्यंबकराव सेनापति मृ. १-४-१७३१. — यशवंतराव मृ. १८ मे १७५४ प्रथम सेनाखासखेल, नंतर सेनापति ज्येष्ठस्त्री अंबिकाबाई — बाबूराव सेनाखासखेल.

|

त्रिंबकराव दुसरा, सेनापति व सेनाखासखेल. स. १७५४-६६; नानासा. पेशव्याबरोबर असे. मृ. वेरूळ घुसृणेश्वर, स्त्री लक्ष्मीबाई.

(त्रिंबकराव दुसरा यांचे पुत्र:)

यशवंतराव दुसरा, दत्तक. दुसऱ्या बाजीरावाचे वेळेस. — शिवराव दाभाडे बापाचे पश्चात् जन्म, मृ. आठवे वर्षी.

रामाचा जनानखाना पन्हाळयास येऊन पोंचल्यावर तेथेंच येसाजीही मरण पावला. नंतर राजारामानें खंडेरावास सेनाखासखेल हें पद व आणखी कांहीं इनामें करून दिलीं. अशा प्रकारें खंडेराव दाभाडे यानें राजाराम व ताराबाई यांची नोकरी केली. पुढें शाहू दक्षिणेंत आल्यावर खंडेराव त्यास जाऊन मिळाला. तेव्हांपासून त्यानें जी कामगिरी केली त्याचा

उल्लेख मागें ठिकाठिकाणीं आलाच आहे. स. १७१६ त शाहूनें खंडेरावास सेनापतिपद दिलें, [ पहा पृ. ७६ ], आणि चाकण व पारनेर या परगण्यांत मोठमोठ्या जहागिरी देऊन, त्यांतून नवीन फौज ठेवून गुजराथेंत मोहीम करून तो प्रांत सर करण्याचा हुकूम दिला. बाळाजी विश्वनाथ व खंडेराव दाभाडे यांचें एक मत असून, बाळाजीनें राज्याची व्यवस्था ठरविली ती अंमलांत आणण्यास खंडेरावानें त्यास चांगलें पाठबळ दिलें. बाळाजी विश्वनाथाबरोबर तो दिल्लीस गेला होता. महाराष्ट्राच्या उत्तर सरहद्दीवर राहून तो खानदेश, वऱ्हाड व गुजराथ या तीनही प्रांतांवर नजर ठेवीत असे. बाळापुरच्या लढाईत तो हजर होता. पुढें वयोवृद्ध झाल्यामुळें त्याचा मुलगा त्रिंबकराव व पिलाजी गायकवाड असे गुजराथेंत अंमल बसवूं लागले. भारतवर्षांत शाहूमहाराजांची बखर छापलेली आहे, त्यांत खालील मजकूर आहे. ' खंडेराव दाभाडे सेनापति यांनीं फौजेचा भरणा मोठा करून मुलखाचा बंदोबस्त केला. खानदेश, बागलाण, कोंकणप्रांत वसईपासून सुरतपर्यंत घेतले. बडे सरदार, मातबर कामकरी, हुशार होते !' शाहू आपल्या सरदारांचें अगत्य किती बाळगीत होता हें खंडेराव सेनापतीस लिहिलेल्या खालील पत्रावरून दिसून येतें. ' तुम्हीं विनंतिपत्र पाठाविलें, प्रविष्ट झालें. आपले पोटांत सांप्रत शूळवेथ जाहली तेणेंकरून बहुत श्रमी झालों. स्वामीचे पुण्येंकरून कांहीं आरोग्य झालें म्हणून लिहिलें विदित झालें. वेथ उताराखालीं पडली येणेंकरूनें चित्त संतोषातें पावलें. यावपर औषध उपाय करून वेथा निशैल्य झालियाचें वर्तमान लिहिणें ? ( शा. म. रो. १५८, स. १७१६-१७.)

बाजीरावाच्या कारकीर्दींत खंडेराव दाभाड्याचा उल्लेख फारसा येत नाहीं. सेना नायकाचें काम स्वतः बाजीराव करूं लागला, आणि त्याचें तेज सर्वत्र चमकूं लागलें याबद्दल, सेनापतीस वैषम्य वाटलें असावें. बाजीरावानें योजलेल्या कामातून दाभाडे उत्तरोत्तर अलिप्त राहूं लागला.

या संबंधानें शाहूनें त्याची अनेकवार कानउघाडणी केल्याचे उल्लेख आहेत. खंडेराव वृद्ध होता, आणि बाजीराव कारभार करूं लागल्यावर सेनापतीचे तर्फेनें त्याचा मुलगा त्रिंबकराव व पिलाजी गायकवाड हेच मुखत्यारीनें सेनापतीचें काम करीत असल्यामुळें, त्यांचें व बाजीरावाचें जुळलें नाहीं. पेशवे व सेनापति यांचीं मनें एकमेकांविषयीं हळू हळू कलुषित होत गेलीं. शाहूमहाराजांच्या रोजनिशींत सन १७२५-२६ चा खंडेराव दाभाड्याचा एक उल्लेख क्रमांक १५७ वर आहे; आणि त्याच सालचा व ले. १५७ नंतर सुमारें आठ महिन्यांचा दुसरा एक उल्लेख, ले. १०५ वर आहे. त्यांवरून गुजराथच्या भानगडी बरेच वर्षांपासून हळू हळू विकोपास जात होत्या, असें दिसतें. खंडेराव दाभाडे सन १७२९ च्या सुमारास मूतखड्याचे विकारानें मरण पावला. त्यास मुलगे तीन, त्रिंबकराव, यशवंतराव, व सवाई बाबूराव. हे सर्व सातान्यास गेले. तेथें शाहूनें ता. ८ जानेवारी १७३० [ माघ शु० १ शके १६५१ ] रोजीं त्रिंबकरावास सेनापतीचीं व यशवंतरावास सेनाखासखेलीचीं वस्त्रें दिलीं. सेनापति धनाजी जाधव व त्याचा मुलगा चंद्रसेन यांच्या संबंधानें जो प्रकार बाळाजी विश्वनाथाकडून झाला, तसाच कांहींसा प्रकार सेनापति खंडेराव दाभाडे, व त्याचा मुलगा त्रिंबकराव, यांच्या संबंधानें बाजीरावा कडून झाला. पण चंद्रसेनाप्रमाणें मराठशाहींतून फुटून जाण्याची संधि बाजीरावानें त्रिंबकरावास दिली नाहीं. त्रिंबकराव दाभाडे निजामास मिळणार असें पाहून बाजीरावानें ताबडतोब त्रिंबकरावाशीं लढाई केली, तींत त्रिंबकराव मारला गेला आणि बाजीरावानें मराठी राज्यांतून सेनापतीचें महत्त्व नाहींसें केलें. हा प्रकार कां व कसा बनला हें सांगण्यापूर्वी गुजराथेंतील मराठे सरदारांच्या हालचालींचें प्रथम अवलोकन केलें पाहिजे.

**२ गुजराथच्या चौथाईची प्राप्ति (सं. १७२९).**—अकबरानें गुजराथ प्रांत जिंकल्यावर त्या प्रांताचा कारभार करण्यास तोडरमल्ल याची पहिला

सुभेदार ह्मणून नेमणूक केली. तेव्हांपासून मोगल सुभेदारांची मालिका मोगल बादशाहीच्या अखेरीपर्यंत व्यवस्थित सांपडते बर्गेसच्या पुस्तकांत ही नांवें आहेत. निजामउल्मुल्कचा बाप गाजीउद्दीन हा ४४ वा सुभेदार १७०८त नेमला गेला. तो सन १७११ त मरण पावल्यावर, त्याचे जागीं अमानतखान याची नेमणूक सन १७११ त झाली. त्याचसालीं मराठ्यांनीं गुजराथेवर स्वारी केली असतां, त्यांचा मोगलांनीं अंकलेश्वर येथें पराभव केला. सन १७१३ त दाऊदखान पन्नीची नेमणूक गुजराथेवर झाली, तो ४७ वा सुभेदार होय. दाऊदखान सय्यदांच्या हस्तें मारला गेल्यावर, बादशहानें गुजराथचा कारभार आपला सासरा अजितसिंग यास दिला. बाळाजी विश्वनाथ दिल्लीहून परत आल्यावर नवीन मिळविलेल्या हक्कांच्या जोरावर मराठ्यांच्या फौजा निरनिराळ्या प्रांतांत संचार करूं लागल्या, त्यांत खंडेराव दाभाड्याचा हस्तक पिलाजी गायकवाड यानें सन १७१९ त सुरतेवर स्वारी करून त्या ठिकाणीं मोगल फौजेचा पराभव केला, आणि सोनगड येथें कायमचें ठाणें दिलें. तेथून हळू हळू उद्योग चालवून सन १७२३ त दाभाडे व गायकवाड यांनीं गुजराथ प्रांतावर आपली खंडणी लागू केली. तेव्हां त्यांचा बंदोबस्त करण्यासाठीं बादशहानें सरबुलंदखान यास काबुलाहून बदलून मुद्दाम गुजराथेंत आणिलें. सरबुलंदखान हा गुजराथचा ५३ वा सुभेदार होय. त्याचें संपूर्ण नांव मुबारीझुन्मुल्क सरबुलंदखान बहादुर दिलावरजंग असें होतें. हा हुशार व थोर घराण्यांतला असून, तो फर्रुख सेयर बादशहाचा मामा होता. या बादशहानें त्यास प्रथम १७१३ त अयोध्येच्या सुभ्यावर नेमून सन १७१६ त त्याची बदली बहारच्या सुभ्यावर केली. पुढें सन १७१८ त सय्यद बंडखोरपणा करूं लागले, तेव्हां बादशहानें सरबुलंदखानास आपल्या मदतीस दिल्ली येथें आणिलें. पण बादशहाचे धरसोडीमुळें त्याच्या हातून सय्यदांना विरोध झाला नाहीं. उलट रिकामा बसून याची दौलत मात्र सर्व खलास झाली. सन

१७१९ त बादशहानें त्यास काबुलच्या सुभ्यावर पाठविलें. तेथून पुढें सन १७२३ त महंमदशहानें गुजराथचा कारभार निजामाकडून काढून सरबुलंदखानास सांगितला. हा कारभार त्यानें पुष्कळ वर्षें ह्मणजे स. १७३० पर्यंत केला; आणि त्यानेंच मराठयांना गुजराथेवर चौथाई कबूल करून दिली.

सरबुलंदखानास काबुलाहून येण्यास अवकाश होता, तोंपर्यंत सुजायतखान याजकडे दुय्यम ह्मणून कांहीं दिवस कारभार होता. निजामाची गुजराथें-तून बदली झाली, तरी तो प्रांत सोडण्याचें त्याच्या मनांत नसल्यामुळें, त्यानें आपला भाचा हमीदखान यास तेथेंच ठेवून दिलें होतें. त्यावेळीं कंठाजी कदम बांडे हा शाहूच्या हुकमानें गुजराथेंत आपल्या हक्कांची वसुली ऊर्फ मुलुखगिरी करीत होता. या कंठाजीस चौथाई देण्याची कबुलात करून त्यास कुमकेस घेऊन हमीदखानानें अहंमदाबादनजीक सुजायतखानावर हल्ला करून त्यास ठार मारिलें. सुजायतखानाचा भाऊ रुस्तुमलीखान सुरतेस फौजदार होता. त्यानें पिलाजीची मदत घेऊन हमीदखानावर चाल केली. दोघां फौजांची गांठ पेटलाद जवळ आरास येथें पडली. पण आपले जातभाई विरुद्ध पक्षाकडे असलेले पाहून पिलाजी आयत्या वेळीं हमीदखानास जाऊन मिळाला. त्यामुळें रुस्तुमलीचा पराभव होऊन तो मारला गेला. ( सन १७२३ ). तेव्हांपासून हमीदखानाच्या मदतीनें कंठाजी कदम व पिलाजी गायकवाड हे दोघे गुजराथेंत चौथाईचा वसूल घेऊं लागले. हा वसूल ते तिघे वांटून घेत ( सन १७२४ ). गुजराथेंतील हे उद्योग शाहूच्या समतीनें होत होते इतकेंच नाहीं, तर त्यांस तो आज्ञापत्रें लिहून प्रोत्साहन देत होता. कंठाजी कदम, कृष्णाजी दाभाडे, रघूजी कदम व पिलाजी गायकवाड यांस खालील आज्ञापत्र आहे. ' तुमचे विषयीं राजश्री सेनापति यांनीं सांगितलें तें कळलें, सर्व प्रकारें तुमचें अगत्य

आहे. स्वामी तुमचें ऊर्जित करणें तें करतील ह्मणोन पत्रें व खेचरें पाठवून देणें ह्मणोन, ' ( शा. म. रो १६० स. १७२६-२७ ).

हमीदखान व मराठे यांस गुजराथेंतून हांकून द्यावें असे सक्त हुकूम बादशहाकडून सरबुलंदखानास आले. तेव्हां त्यानें मोठी तयारी करून हमीदखान व मराठे यांच्या फौजांचा प्रथम सोजित्रा येथें व पुनः कपडवंज येथें पराभव केला. तेव्हां हमीदखान गुजराथेंतून कायमचा निघून गेला, [ स.१७२५ ]. याच वेळीं अंताजी भास्कर नांवाचा आणखी एक मराठा सरदार गुजराथच्या उत्तर भागांत वावरत होता. त्यानें वडनगरास वेढा घालून तेथून चार लाख दंड उपटला, [ स. १७२५ ]. त्याच सालीं पिलाजीनें खंबायत व सुरत हीं शहरें लुटलीं, आणि हमीदखान निघून गेला तरी सरबुलंदखानास त्यानें चैन पडूं दिलें नाहीं. त्याजकडूनही स्यांनीं आपले हक्क कबूल करून घेतले. शाहूच्या एका आज्ञापत्रांत या कबुलातीचा उल्लेख दिसतो. ' प्रांत गुजराथ व माळवा येथील तह रा. अंबाजी त्रिंबक, मुतालिक दिम्मत पंतप्रधान, यांनीं सरबुलंदखानापाशीं चौथाई व सरदेशमुखीचा तह केला आहे, तरी तुह्मीं प्रांत मजकूरचा चौथाईचा आकार होईल त्यापैकीं बाबती वजा करून राहिला ऐवज मोकासबाब निम्मे चिमणाजी बल्लाळ यांजकडे व निम्मे त्रिंबकराव दाभाडे याजकडे पावेल. तरी तुह्मीं त्याप्रमाणें उपसर्ग न करणें.' असें पत्र कंठाजी कदम बांडे व पिलाजी गायकवाड यांस लिहिलेलें आहे. [ सुमारें मे १७२६, रमजान १ सीत अशरीन मया व आलफ, शा. म. रो. ]

गुजराथेंतील चौथाईचा हा उद्योग सेनापतीच्या बरोबर पेशवाही शाहूच्या आज्ञेनें करीत होता; आणि उभयतांमध्यें चांगलीच चुरस अवलपासून होती. बांडे हा पेशव्यांच्या तर्फेचा असून पिलाजी सेनापतीचा दुय्यम होता. या दोघांचा तंटा विकोपास जाऊन खंबायत येथें त्यांची निकराची लढाई झाली [ डिसेंबर १७२६ ], तींत पिलाजी पराभव पावून खेडयाकडे

गेला, आणि कंठाजीनें खंबायतेंतून हजार रुपये वसूल केले. तेथें इंग्रजांची वखार होती तींतून कंठाजीनें पांच हजार रुपये मागितले, असा डफनें उल्लेख केला आहे. दोघां मराठे सरदारांमधील हा विकोप शाहूस बिलकूल पसंत पडला नाहीं. पेशवेसेनापतींचें हें भांडण कदम व गायकवाड या त्यांच्या हस्तकांनीं उचललेलें होतें, आणि शाहू आपणाकडून उभयतांची तडजोड काढीत होता. याच प्रकरणास अनुलक्षून सन १७२७ सालचीं दोन पत्रें उपलब्ध आहेत. ( का सं. प. या. १६७ व १६९ ). शाहूच्या हुकमाप्रमाणें बाजीराव वर्तत नव्हता आणि त्यांत बाजीरावास कित्येक अडचणीही होत्या, असें अस्पष्ट अनुमान या पत्रांवरून होतें. सन १७२७ त कंठाजी व पिलाजी यांनीं बडोदें हस्तगत केलें, आणि कंठाजीचा लेकवळा कृष्णाजी यानें चांपानेर घेऊन तेथें आपलें मुख्य ठिकाण केलें. चिमाजीआप्पा सुद्धां या दोन तीन वर्षांत मधून मधून गुजराथेंत येऊन त्या प्रांतावर चौथाईचा हक्क स्थापन करीत होता. ‘ प्रांत गुजराथ निंमे राजश्री चिमणाजी बल्लाळ यांजकडे मुकासा होता तो दूर करून हल्लीं राजश्री खंडेराव दाभाडे सेनापति यांजकडे जमावा बेगमीस मुकासा दिला. प्रांत मजकूर निंमे. ’ ( ३१-७-१७२७; शा. म रो. ले. १५९, समान अशरीन मया व आलफ जिल्हेज २३ ), असें शाहूचें आज्ञापत्र आहे.

इकडे या दोन तीन वर्षांत बाजीरावाचें व निजामाचें हळू हळू वितुष्ट पडून स. १७२८ च्या आरंभीं निजामाला बाजीरावानें नरम आणिलें. निजामानें दक्षिणेंत स्वतंत्र पंथ काढिला ही गोष्ट बादशहासही पसंत नव्हतीच, आणि त्याचा पाडाव करण्यास जो उद्योग मराठे करीत होते त्यास बादशहाचेंही अनुमत होतें. दक्षिण, गुजराथ व माळवा या तीनही प्रांतांत चौथाईचा उद्योग बाजीरावानें झपाट्यानें चालविला होता. गुजराथेंत पेशव्यानें हात घातला याजबद्दल खंडेराव दाभाडे यास वैमनस्य वाटून, त्यानें, निजामबाजीरावाचें युद्ध चालू असतांच, बहुधा निजामास

मदत करण्याच्या बुद्धीनें माळव्यावर स्वारी करून मोठ्या धामधुमीनें तेथून खंडण्या वसूल केल्या. या आगळिकीबद्दल शाहूनें ता. ३१ मे १७२८ चें जरबेचें पत्र दाभाड्यास लिहिलेलें आहे. ( शा. म. रो. २१४ ). ' तुह्मांस माळवे प्रांतीं धामधूम करून पैका घ्यावयास, मुलुख खराब करावयास गरज काय ? या उप्पर तुह्मीं पैका घेतला आहे तो बाजीराव पंडित यांजकडे फिसऊन देणे, नाहीं तर तुमच्या महालीं मोबदला करतील. या उप्पर माळवे प्रांतीं उपसर्ग न देणें, फिरून बोभाट येऊं न देणें. ' या खटपटींत कोल्हापुरकर संभाजी व दाभाडे सेनापति यांस शाहूच्या पक्षांतून फोडून निजामानें आपणांस अनुकूल करून घेतलें. तेव्हां अर्थात् उभयतांचेंही पारिपत्य करणें शाहूस व बाजीरावास प्राप्त होऊन दोघांनींही दोन प्रकरणें जवळ जवळ एकदमच हातीं घेतलीं. तिकडे शाहूनें प्रतिनिधीस हातीं घेऊन संभाजीवर चाल केली, आणि इकडे बाजीरावानें सेनापतीचा बंदोबस्त आरंभिला. स्वतः बाजीरावाची नजर दोनही प्रकरणांवर होती.

मराठ्यांशीं सामना करण्यास आपणांस पैशाची व फौजेची मदत पुरेशी नाहीं अशी सरबुलंदखानाची तक्रार बादशहाकडे सारखी चालू होती. मराठ्यांची सरशी पाहून स्वतः बादशहानेंच गुजराथेंत येण्याचा विचार केला, परंतु तो सिद्धीस गेला नाहीं. तरी त्यानें मोठी मदत सरबुलंदखानास पाठविली. हा प्रकार बाजीरावास कळल्यावर त्यानें आपला वकील शामराव यास सरबुलंदखानाकडे पाठवून, दक्षिणच्या प्रमाणेंच गुजराथची चौथाई आह्मांस द्या, ह्मणजे आह्मी सर्व शत्रूंचा बंदोबस्त करून बादशहाचा कारभार सुरळीत चालवूं, असें बोलणें सुरू केलें, ( १७२८ ). या वेळीं निजामाशीं मुंगीशेवगांवचा तह ठरत होता; आणि कंठाजी व पिलाजी हे अहंमदाबादेजवळ सरबुलंदखानापासून पराभव पावून मुलखांत लुटालूट करीत होते. पुढें दिल्लीहून मदत येणार

होती ती आली नाहीं आणि बाजीरावाच्या मागणीप्रमाणें चौथाईचे हक्क कबूल केल्याशिवाय मराठ्यांचा उपद्रव बंद होईना. सरबुलंदखानास आणखी अडचणींत पकडून गुजराथ प्रांताची चौथाई कायम करून घेण्याकरितां सन १७२९ च्या पावसाळ्यानंतर बाजीरावानें चिमाजी आपास मोठी फौज देऊन गुजराथेंत रवाना केलें. यापूर्वी कंठाजी व पिलाजी असे दोनच मराठे सरदार गुजराथेंत होते, त्यांत आतां चिमाजी आणखी तिसरा झाला. चिमाजीनें ही स्वारी मोठ्या जोरानें चालविली. एकामागून एक प्रदेश लुटीत व खंडण्या घेत, चिमाजीनें सन १७२९ च्या मार्च महिन्यांत पेटलादेंतून खंडणी घेऊन, धोलका शहर लुटलें; आणि सरबुलंदखानापासून चौथाईची मागणी केली. बाजीरावानेंही खानास कळविलें कीं, चौथाई सरदेशमुखीचे हक्क करार करून द्याल तरच आमच्या फौजा परत येतील. त्याजवरून सरबुलंदखानानें नाइलाजास्तव पेशव्यांचा वकील शामराव याचे मार्फत, सुरत शहर खेरीज करून तमाम गुजराथ प्रांताच्या चौथाई सरदेशमुखीचे हक्क शाहूमहाराजांस करार करून लिहून दिले. अहंमदाबाद शहरच्या उत्पन्नावर पांच टक्केच घ्यावे असा या करा-रांत उल्लेख होता. हे करार दक्षिणच्या करारासारखेच असून ग्रँट डफ यास पाहण्यास मिळाले होते. दक्षिणप्रांतांत हे हक्क दिल्यापासून सुव्यवस्था होऊन रयतेची अबादानी झाली, तसाच परिणाम गुजराथेंतही व्हावा, ह्मणून हे हक्क मराठ्यांस लिहून दिले आहेत, असा उल्लेख आरंभीं सर-बुलंदखानानें त्या लेखांत केलेला आहे. मराठ्यांनीं पंचवीसशें फौज गुजराथेंत कायमची ठेवून बादशहाच्या शत्रूंचा बंदोबस्त करावा. आणि त्याजबद्दल वरील हक्क बादशहाकडून त्यांस मिळावे, असा हा करार होता. पिलाजी गायकवाड भिल्ल व कोळी लोकांस सामील करून घेऊन प्रांतास उपद्रव देईल तर त्याचा बंदोबस्त करण्याची हमी बाजीरावानें घेऊन ती या करारांत लिहून दिली होती. डफ ह्मणतो, हा करार १७२९ त

सीदीशीं वाटाघाट केली तर बाजीरावास राग येईल, सबब आपण होऊन चौल बाजीरावास द्यावें, म्हणजे आपल्याबद्दल त्याच्या मनांतला वहीम दूर होऊन, मुंबईचें संरक्षण होईल, असा ठराव ता. २९-११-१७३९ रोजीं मुंबई काउन्सिलनें केला. या वेळीं इंग्रजांनीं पोर्तुगीझांस कळविलें, कीं शाहू व बाजीराव यांजमध्यें फूट पडण्याचा संभवही नाहीं; आणि बाजीराव आतां सगळा किनारा काबीज केल्याशिवाय राहणार नाहीं. चौल व मरोळ हे दोन मोठे किल्ले आम्हांस पचणार नाहींत. म्हणून दमण व त्याचे जवळचा थोडा प्रदेश पोर्तुगीझांनीं आपल्याकडे ठेवून बाकीचा सर्व किनारा मराठ्यांचे स्वाधीन करावा, असें इंग्रजांनीं ठरविलें.

८. **कॅ० जेम्स् इंचबर्डची वकिलात** ( जून १७३९ ).—साष्टी व वसई येथें युद्ध चालू असतां मुंबईकर इंग्रजांस मोठी दहशत पडली होती. वसई पडल्यानें तर ती द्विगुणित झाली. या वेळचें इंग्रजांचें दुटप्पी वर्तन चिमाजीआपाचे चांगलेंच निदर्शनास आलें होतें; आणि मागें पुढें हे आपली खोड मोडतील अशी भीति वाटून, आपण होऊनच बाजीराव व चिमाजीशीं गोडी करून त्यांचा लोभ संपादन करावा, आणि आपल्याबद्दलचा त्यांच्या मनांतील किंतु काढून टाकावा, अशी इंग्रजांस इच्छा होऊन त्यांनीं कॅ. इंचबर्ड यास १७३९ च्या जून महिन्यांत वसई येथें चिमाजीकडे पाठविलें. सर्व गोष्टी गोडीनें बोलून त्याच्या मनांतील संशय दूर करावा आणि व्यापारवृद्धीची योजना करावी, अशी या वकिलास ताकीद होती. मराठे कर्ज मागतील तर आम्हांस धन्याचा हुकूम नाहीं, खंडणी मागतील तर आमचा व्यापार अगदीं बसला आहे, अशीं उत्तरें वकिलानें देण्याविषयीं त्यास पढवणूक मिळाली होती. त्याप्रमाणें इंचबर्ड चिमाजीस वसई येथें भेटला. तेथें तह करण्याची बरीच वाटाघाट झाली. ' इंग्रजांनीं पो० स दारूगोळा पुरविला, मग आम्हांस कां पुरवीत नाहींत ? ' यासंबंधानें पुष्कळ चर्चा झाली. दारूगोळा देण्याजोगा नाहीं असें वकिलानें चिमाजीस सांगितलें.

तुम्ही परभारें शाहूस जाऊन भेटतां, आह्मी व शाहू यांजमध्यें फूट पाडतां, अजबद्दल चिमाजीनें इंग्रजांचा पुष्कळ निषेध केला. याप्रमाणें बरीच बोलाचाली होऊन तहाच्या १५ शर्ती ठरवून इंचबर्डनें मुंबईस कळविल्या; परंतु त्यांचें पुढें काय झालें तें लिहिलेलें नाहीं. ग्रँट् डफ् म्हणतो जुलई १७३९ त असा तह उभयतांत घडून आला.

९. कॅ. गोर्डनची साताऱ्यास वकिलात (१२मे-१४.७.१७३९).– मुंबईच्या शेजारीं मराठयांचें ठाणें बसलेलें पाहून इंग्रजांस मोठी चिंता उत्पन्न झाली. कुलाब्यास आंगरे व ठाण्यास बाजीरावासारखा पराक्रमी पेशवा, या दोघांच्यामध्यें आपला चुराडा सहज उडणार, याचा कांहीं तरी प्रतीकार करावा, या उद्देशानें मुंबईच्या कौन्सिलनें गोर्डन नांवाचा आपला एक वकील साताऱ्यास शाहू महाराजांकडे पाठविला; आणि त्याच दिवशीं त्यांचा दुसरा वकील इंचबर्ड चिमाजीकडे वसईस गेला. गोर्डनबरोबर छत्रपतीस व दरबारी मंडळीस देण्याकरितां पत्रें व नजराणे दिलेले होते. बरोबर भिकाजीपंत नांवचा एक दुभाष्या होता. गोर्डन यास खालील बाबतींचा तपास करण्याचा हुकूम होता.

( १ ) शाहूचा राज्यकारभार कसा चालला आहे ? कोणाच्या तंत्रानें कारभार चालतो ? दरबारांत लोक व पक्ष कोण कसे आहेत ?

( २ ) बाजीरावाचे शत्रु साताऱ्यास कोण आहेत ? ते शत्रु वजनदार आहेत असें दिसल्यास त्यांस थोडेंसें बाजीरावाविरुद्ध चिथवून द्यावें. कारण पोर्तुगीझांचा उच्छेद झाला, तसा आमचाही होण्याचा संभव आहे. म्हणून बाजीरावाचें प्रस्थ वाढूं देणें राज्यास आपायकारक आहे, अशी समजुत तेथें पसरून द्यावी. मात्र बाजीरावाचें वजन एवढें मोठें आहे कीं विशेष अंगावर येईल अशा थरास खटपट नेऊं नये. उलट आम्ही इकडून बाजीरावास सलुखाचें व वसई काबीज केल्याबद्दल अभिनंदनाचें पत्र पाठवीत आहोंच.

( ३ ) इंग्रजांसंबंधानें सातारा दरबारानें निर्धास्त असावें, अशी त्यांची खात्री करून, व्यापारी मतलबाचा तह त्यांच्याशीं घडून येईल तर आण-ण्याची खटपट करावी.

अशा सर्व व्यवस्थेनें कॅप्टिन गोर्डन ता. १२ मे १७३९ रोजीं मुंबई सोडून निघाला. ता. ८ जून रोजीं त्याची व शाहूची भेट झाली. ता.३० जून रोजीं तो परत निघाला आणि १४ जुलैस परत मुंबईस दाखल झाला. नंतर त्यानें आपल्या प्रवासाची व कामगिरीची हकीकत ता. २१ जुलई रोजीं कौन्सिलास लेखी सादर केली, तिच्यांत खालील तात्पर्यार्थ आहे. गोर्डन लिहितो. ' १२ मे रोजीं आम्ही मुंबई बंदर सोडिलें. ता. १३ रोजीं दंडाराजपुरीस पोचलों. तेथें सीदीकडून आमचा सत्कार झाला. ता. १४ रोजीं गलबतांत बसून सीदीचे वकिलाबरोबर श्रीपत-रावाकडे निघालों. ता. १५ रोजीं मराठ्यांनीं आम्हांस कैद केलें; आणि बाजीरावाचा किंवा चिमाजीचा परवाना ते मागूं लागले. आमच्या जवळचीं पत्रें पाहून त्यांनीं आम्हांस सोडलें; आणि त्यांचाच जाबता घेऊन आम्ही पुढें निघालों. रस्त्यांत ठिकठिकाणीं आंगऱ्यांच्या चौक्या लागल्या. ता. १९ रोजीं संभाजी आंगऱ्याचे लोक पकडणार होते, परंतु थोडक्यांत निभावलें. ता.२० रोजीं डोंगरें[1] चढलों. चढण्यास फार कठिण. ता. २२ रोजीं चांगला सपाट देश लागला. ता. २३ रोजीं साताऱ्याचे जवळ आलों. बाहेर धर्मशाळेंत मुक्काम केला. ता.२५ रोजीं श्रीपतरावाचा कारभारी अंताजीपंत याची भेट घेतली. त्यानें आम्हांस पोषाख दिला, मीं त्यांस आंगठी दिली. शाहू महाराज साताऱ्याहून पांच मुक्कामावर आहेत असें कळलें. तेथें जाण्यास निघालों. ता. २९ रोजीं मुक्काम रहिमतपुर.

---

१ कोणत्या घाटानें चढले तें लिहिलेलें नाहीं. बहुधा चिपळुणावरून कुंभार्ली घाटानें गेले असावे. २ यावेळीं शाहू मिरजेकडे होता.

ता. ३१ रोजीं अमरापुरास आलों. ता. १ जून १७३९ रोजीं शाहूच्या मुक्कामावर ( Adjure Bunall आरळें वडुत ? येथें ) आलों. ता. २ रोजीं श्रीपतरावाची भेट व्हावयाची पण झाली नाहीं, ती ता. ३ रोजीं झाली. श्रीपतरावानें मुंबईच्या तटबंदीची व बंदोबस्ताची कच्ची हकीकत विचारून घेतली. 'आम्हीं कां आलों, बाजीरावाच्या भीतीनें आलों कीं काय', असें श्रीपतरावानें विचारलें. 'नवीन गव्हर्नर आल्यानें स्नेह जोडण्याकरितां आलों' असें मीं सांगितलें. ता. ७ रोजीं महादाजी पंतानें ( पुरंदरे ) बाजीरावाकडून आलेलीं पत्रें शाहूस दाखवून त्याची भेट घेतली, त्या वेळीं विचार झाला कीं इंग्रजांशीं स्नेह करावा कीं नाहीं, त्याजबद्दल बाजीरावास वैषम्य वाटेल कीं काय ?

ता. ८ रोजीं आमची व शाहूची भेट झाली. शाहू त्या वेळीं तंबूत राहत असून लढाईवर होता. भेटीची जागा अगदीं घाणेरडी होती, भेट चांगली झाली. परंतु श्रीपतराव व अंताजी ( शिवदेव ? ) पंत यांचे मार्फत भेटीस आलों ही चूक झाली असें वाटलें. विरूबाई आम्हांस भेटली नाही. तिची पत्रें व नजराणे तिला पाठवून दिले. नंतर नारोरामची भेट घेतली. त्यानें आम्हांस बाजीरावाचा मुलगा नानासाहेब याची भेट घेण्बास सांगितलें. इतक्यांत बाजीरावाकडची पत्रें आलीं. नादीरशहा मराठ्यांवर चालून येतो अशी बातमी आली. तेव्हां शाहू राजा डोक्यावरचें पागोटें काढून म्हणाला, 'वसई काबीज करण्यांत माझे बावीस हजार शूर लोक पडले, त्यांचा मोबदला वसई भरून देईल काय ?' नंतर आह्मीं नानासाहेबाची गांठ घेतली. 'भेटीस येण्याचें कारण काय' असें नानानें विचारिलें. आमचें उत्तर त्यास समर्पक वाटलें नाही. आह्मी शाहूचे भेटीस आलों हें त्यास आवडलें नाहीं. ता. १० जून रोजीं यशवंतराव ( महादेव पोतनीस ), जिवाजी खंडेराव चिटणीस व फत्तेसिंग भोसले यांच्या भेटी घेतल्या. ता. १४ जून रोजीं नादीरशहा

परत गेल्याची खबर आली. मराठ्यांस भिऊन तो पळून गेला याबद्दल शाहूनें दरबार भरवून बक्षिसें वाटलीं. ता. १९ रोजीं व्यंकटराव घोरपडे गोव्याचे स्वारीहून परत आला, शाहूची व त्याची भेट झाली. पोर्तुगीझांनीं दंड भरून तह करून घेतला असें कळतें. मराठे दिल्लीवर चाल करून जाणार अशी खबर आली.

आह्मांस परत जाण्यास रजा द्या, ह्मणून वारंवार विनंती केल्यावर ता. २५ जून रोजीं शाहूनें पुनः आमची भेट घेऊन आह्मांस निरोप दिला. आपले दोस्त मुंबईचे गव्हर्नर यांना सांगा, 'मोठ्या बदकांच्या आठ माद्या, दोन टर्की, दोन बसऱ्याचीं खबुतरें, आणि दुसरे कांहीं चमत्कारिक पक्षी असें आह्मांस पाठवून द्या.' माझ्याजवळ तरवार होती ती शाहू महाराजांस फार आवडली ह्मणून मीं ती त्यांस दिली. याप्रमाणें शाहूची रजा घेऊन ता. २६ रोजीं सर्व मोठमोठ्या अंमलदारांच्या व बाळाजी बाजीरावाच्या निरोपाच्या भेटी घेतल्या. ता. २७ रोजीं आमच्या बरोबरच्या एका गृहस्थास शाहू महाराजांनीं बोलावून, आणखी कांहीं वस्तु आमच्याजवळ नजर देण्याजोग्या आहेत किंवा काय याचा तपास केला. त्याजवळ महाराज ह्मणाले, 'तुह्मी भले सालस लोक आहां. व्यापाराशिवाय तुमचा दुसरा हेतु नाहीं. धर्मसंबंधांत तुह्मी कोणास जाच करीत नाहीं. सबब बसईकडील नवीन जिंकिलेल्या प्रदेशांत आह्मांस इंग्रजांचा उपयोग चांगला होईल. परंतु हा सर्व व्यवहार आह्मीं बाजीरावावर सोंपिला आहे; आह्मीं त्यांत पडत नाहीं. पण तुह्मांस जर असे शांत भावानें दिवस काढावयाचे ह्मणतां, तर आमचे नोकर जे आंगरे त्यांच्याशीं कलह करण्याचें तुम्हांस प्रयोजन काय ?' हें बोलणें, गोर्डन ह्मणतो, मला कळल्यावर मी पुनः त्या इसमास महाराजांकडे पाठवून सांगितलें कीं 'आंगऱ्यांशीं भांडण उपस्थित करण्याची बिलकूल इच्छा नाहीं. केवळ आमच्या व्यापाराच्या संरक्षणासाठीं आम्हांस एवढी मोठी फौज बाळ-

गावी लागत आहे. पोर्तुगीझ तरी आमचे स्नेही व शेजारी ह्मणून त्यांस मदत करणें आह्मांस भाग पडलें. आतां आपणांस जय मिळालाच आहे, तेव्हां आपल्याशींही आह्मी स्नेहभावानेंच वागणार !'

माझ्या पत्रांचे जबाब महाराजांकडून ता. ३० जून रोजीं माझ्या हातीं आले, आणि आह्मी परत निघालों, ते प्रथम पुण्यास आलों. पुण्याकडील प्रदेश मला फारच सुपीक दिसला. पुण्यास तोफा गोळे करण्याचा कारखाना आहे तो पाहिला. हें सामान ते चांगलें करितात असें कळलें. तेरा इंची गोळ्यांचा सांचा होता. लोखंड सुद्धां येथें तयार करितात. बाजीरावाकडून कोष्टी लोकांना चांगलें उत्तेजन मिळतें; आणि नानाप्रकारचें उंची कापड येथून मुंबई वगैरे ठिकाणीं बाहेर जाऊन विकतें. प्रदेश चांगला लोकवस्तीनें गजबजलेला असून इतर प्रांतांच्या मानानें येथें रयतेवरील सारा फार माफक आहे.

ता. १३ जुलई रोजीं आह्मी ठाण्यास पोंचलों. तेथील अधिकाऱ्यानें आमची बरदास्त चांगली ठेविली. ता. १४ रोजीं आह्मी मुंबईस पोंचलों. गोर्डन ह्मणतो, एकंदर माहितीवरून मला असें कळलें कीं ठाणें, साष्टी, वसई हीं ठिकाणें काबीज केल्याबद्दल शाहू महाराजांना मोठा आनंद झाला. वसई सर करण्यास महाराजांची परवानगी घेतलेली नव्हती. पोर्तुगीझ लोकांस समूळ काढून लावणें महाराजांस पसंत नव्हतें. परंतु बाजीराव कोणासच जुमानीत नसल्यामुळें बाहेरून त्याच्याशीं गोडी दाखविणें महाराजांस भाग पडतें. बाजीरावाचे अंतस्थ हेतु काय आहेत ते मला कळले. पण लोकांचा सामान्य समज असा आहे, कीं मुंबईवर बाजीरावाचा डोळा नाहीं. नवीन जिंकलेल्या प्रदेशाच्या सुधारणेसाठीं इंग्रजांची त्यास जरूर आहे. एकंदरींत मराठ्यांच्या दरबारांत इंग्रजांसंबंधानें कोणाची द्वेषबुद्धि असलेली आढळून आली नाहीं. पुष्कळांचा समज असा आहे, कीं

छत्रपतीपासून आपण स्वतंत्र व्हावें असा बाजीरावाचा रोंख दिसतो. मोगलांच्या राज्यांतून पुष्कळसा पैसा मिळवून मोठी फौज तयार करावी अशी बाजीरावाची निकड चालू आहे. अंतोबा नाईक वीर ( Bira ) नांवाचा एक पुण्याचा प्रसिद्ध व्यापारी बाजीरावाच्या मर्जीतला असून त्याची इच्छा आपला एक मुनीम मुंबईस ठेवावा आशी आहे.

मला असें आढळून आलें कीं लोक लढाईस गेल्यामुळें पुष्कळ शहरें ओस पडलीं आहेत; आणि कित्येक ठिकाणीं मोठमोठ्या फौजा तयार आहेत. शाहू महाराजांजवळच स्वतःची अशी वीस हजार फौज असून शिवाय कारागीर दुकानदार वगैरे पुष्कळच आहेत. बाजीरावाची फौज चाळीस हजार आहे; पण त्यापैकीं गोव्याचे बाजूस किती व या बाजूस किती याचा अंदाज मला लागला नाहीं. मराठे सरदार मोठमोठ्या फौजा तेव्हांच तयार करूं शकतात. बाजीरावाचे बेत बाहेर कोणासही कळत नाहींत. हुकूम होईल त्याप्रमाणें लोक निमूटपणें वागतात. सारांश सर्व सत्ता बाजीरावाच्या हातीं आहे. परभारें शाहूमहाराजांकडे आपण खटपट केली तर ती त्यास आवडणार नाहीं. नुसत्या सलामालकीचा व्यवहार परभारें करण्यास हरकत नाहीं. शाहूमहाराजींची दरम्यानगिरी नसेल तर, सातही प्रधानांस बाजूस ठेवून आपला हुकूम अंमलांत आणण्याचें सामर्थ्य बाजिरावास आहे. येथून नेलेल्या सर्व जिनसा मीं वांटून दिल्या. तेथून मला नजर मिळालेल्या जिनसांची किंमत सुमारें दोनशेंचाळीस रुपये आहे.,, उघड आहे, इंग्रजांचे वकिलास पाहुणा म्हणून बोलावलेलें नव्हतें; आणि त्या वेळीं इंग्रज कांहीं सत्ताधीश नव्हते, सामान्य व्यापारी होते. इंग्रजांशीं स्नेह ठेवण्याविषयीं शाहूनें गोर्डनजवळ बाजिरावास पत्रें दिलीं होतीं.

वरील त्या वेळची परस्थांनीं लिहिलेली हकीकत अनेक दृष्टींनीं बोधप्रद आहे. बाजीरावाचा पराक्रम व दरारा तींत व्यक्त होतो. जास्त टीकेची

जरूर नाहीं. गोर्डनच्या वकिलातीनंतर दहा महिन्यांचे आंत बाजीराव मरण पावला. वसईची मोहिम चालू असतांच शाहूची मोठी स्वारी मिरजेवर झाली तिची हकीकत पुढें दिली आहे.

१०. **शाहूछत्रपतीची मिरजेची स्वारी ( १७३७–१७३९अखेर)** शाहूची खरी कारकीर्द जरी स. १७०८ त सुरू झाली, तरी संभाजीचा वध होऊन शाहू व त्याची आई मोगल बादशहाच्या कबजांत गेल्यापासूनच शाहूविषयीं महाराष्ट्रास अभिमान वाटूं लागला होता. तेणेंकरून सुमारें साठ वर्षेपर्यंत एकंदर महाराष्ट्राचा शाहू हा राष्ट्रीय आत्मा बनला होता. एवढें मोठें आयुष्य राष्ट्रकार्यार्थ खर्च झाल्यामुळें त्यास पुढें पुढें अवतारी पुरुष असें लोक समजूं लागले. स. १७०८–१०च्या पुढें प्रत्यक्ष रणभूमीवर शाहूनें पाय ठेविला नाहीं. महाराज स्वतः कधीं स्वारी वगैरे करीत नाहींत, याजबद्दल चर्चाही त्यावेळीं होत असावी आणि ती शाहूच्या कानींही गेली असावी. लहान लहान बंडखोरांवर अगर निजामासारख्यांवर स्वतः स्वारी काय करावी, बादशहासारखा बरोबरीचा शत्रु असेल तरच त्याजवर स्वतः स्वारी करणें योग्य; अशी जवळची मंडळी शाहूची समजूत घालीत. शेवटीं स्वतः स्वारी करण्याची शाहूस मोठी इच्छा होऊन, सन. १७३७ पासून दोन तीन वर्षें शाहूनें सातारा सोडून सर्व समारंभानिशीं स्वारी काढून प्रथम उंबरजेवर तळ दिला; आणि तेथून कांहीं दिवस मिरजेवर जाऊन तें ठाणें काबीज केलें. सामान्य उल्लेखांवरून सन. १७३७ किंवा १७३८ च्या विजयादशमीपासून स. १७३९ च्या अखेरीपावेतों ह्मणजे सुमारें तीन वर्षें ही मिरजेची स्वारी झाली असावी.

'शाके १६५८ सब्बांसल्लासीन मया व आलफ् या वर्षी जाऊन दोन वर्षें छावणी उंब्रजेवर झाली [ शा. म. च. पृ.७१ ]. नंतर चार सहा महिने मिरजेस गेले असें दिसतें. रा. खं. ६ पुरंदरे रोजनिशींत या संबंधाचे

कित्येक उल्लेख आहेत. ' स्वारींत बाळाजी बाजीराव शाहूबरोबर मिरजेस होता. ज्येष्ठ मास ( जून १७३९ ) बाळाजी बाजीरावाचें पत्र मिरजेहून आलें, ( पृ. ९ ). मिरजेच्या मुक्कामीं वैशाख व ज्येष्ठ मासीं जाऊन ( पृ. ११ ), ' राजश्री स्वामी मिरजेचे मुक्कामींहून श्रीपंढरीचे यात्रेस गेले. राणोजी शिंदेही गेले. तेथून तुळजापुरास गेले.' [पृ. १४]. ही बहुधा स. १७३९ ची आषाढी एकादशी असावी [ ५ जुलई ]. श्रावण मासांत गोरोजी गुरव राजश्री स्वामीपाशीं मिरजेचे मुक्कामीं फिर्यादीस गेला ' [ पृ. १८ ] ' मिरजेचा मोगल कौलास आला. आश्विन शु० १२ स निशाणें चढलीं [ ता. ३ आक्टोबर पृ. २६, ]. ' कार्तिक शु० १५ रविवारीं सायंकाळीं रा. बाळाजीपंतनाना मिरजेहून राजश्रीपासून पुण्यास आले [ ४ नोव्हेंबर ]. राजश्री बाळाजी बाजीराव शिरवळचे मुक्कामाहून राजश्रींचा निरोप घेऊन फाल्गुन शु. ९ रविवारीं [ २४ फेब्रुवारी ] पुण्यास आले. ' यावरून स. १७४० चे आरंभीं शाहू महाराजांची स्वारी मिरजेहून साताऱ्यास परत आली असें दिसतें.

शाहूच्या या स्वारीची हकीकत त्या वेळच्या त्याच्या ऐश्वर्याची व मानसिक भावनेची निदर्शक आहे. अलीकडच्या व्हिक्टोरिया राणीच्या कार्कीर्दीप्रमाणें, शाहूच्या सरदारांस सर्व हिंदुस्थानभर विजय मिळत गेले आणि त्याच्या भाग्यशालित्वाची छाप सर्व मंडळावर बसली. हें भाग्याशालित्व शाहूच्या या स्वारीवरून दृग्गोचर होतें. वास्तविक विजयादशमीच्या सीमोल्लंघनांतलाच हा प्रकार होता असें म्हटलें तरी चालेल.

' कूच करणें तें दोन तीन कोसांचें करावें ऐसें केलें, आणि सुमुहूर्तें डेरे दाखल झाले. पागा हुजरात सर्व तयारी करून उतरले. तोफखाना तयारी होऊन काढिला; व सर्व सरदारांस आपले तालुके व मसलतीचे बंदोबस्त राखून पांच, चार, दोन, हजार फौजेनिशीं ज्याचे त्याप्रमाणें बरोबर यावें असें नेमून दिल्याप्रमाणें येऊन उतरले. त्यांस मिसलीस

राहण्याचे व स्वारी चालण्याचे निबंध नेमून दिले. सेनाधुरंधर व सेनासाहेब सुभा भोसले यांस आघाडीस नेमिलें. प्रतिनिधि व मुख्यप्रधान व अमात्य, सचिव, मंत्री यांची उजवेबाजूस मिसल नेमिली, पंडितराव, सुमंत व न्यायाधीश, यांस डावे बाजूस नेमून दिले. चिटणीस, पोतनीस वगैरे कारकून मंडळी जामदारखान्यालगत उजवेबाजूस नेमिले. फडणीस व दप्तरकोठी वगैरे डावेबाजूस नेमिले. सोयरे लोक, मानकरी व फत्तेसिंग भोसले उजवेबाजूस नेमिले. पिछाडीस सरलष्कर व त्यांचे निसबतीचे सरंजामी हे नेमिले. हुजूरपागा डेऱ्यापुढें व शागीर्दपेशा लोक वगैरे जिकडील तिकडे मिसली नेमून दिल्या. सर्वांनीं स्वारींत आपापले मिसलींत चालावें, गलबला कांहीं एक होऊं नये. पादशाही स्वारींत महाराज होते त्याअन्वयें सर्व मातबर मुत्सद्दी प्रधान व सरदार यांनीं अंबाऱ्यांत बसोन, सरकारचे पाठीमागें जनानखाना, त्यामागें चाळीसपंनास अंबाऱ्या, चालाव्या. पुढें तोफखाना, त्यापुढें ढाला व निशाणें, व त्यापाशीं गारद व करोळ ( Cavalry ) व पागा चालावी. सर्वांपुढें बिनीवाले सेनाधुरंधर यांणीं चालावें. निशाणामागें आघाडीचे सरदार यांचे लोक चालावे. त्यामागें जिलीब, नानाप्रकारचीं रणवाद्यें. त्या मागें जिलबीचे हत्ती, घोडे, रथ, सांडणी यांणीं चालावें. त्यामागें नगारखाना, शहाजानें, त्यामागें वाजंत्री व धाडी व त्यामागें चोपदार भालदार चालावे. वाटेनें सक्के (पाणी शिंपणारे) व परवाला यांणीं पुढें शिडकाव करीत असावा. याप्रमाणें दोनतीन कोस चालून डेरेपर्यंत कोटबंदीचे लोक [ सलामीचे स्वार ) यांचे मुजरे घेत जावें. याप्रमाणें मजला करून उंबरज मुक्कामीं आले. पुढें कर्नाटक प्रांतीं जावयाचें, त्यास तिकडे सरदार रवाना केले आणि उंब्रजेवर छावणी केली. प्रधान व सरदारसहवर्तमान शिकारीस जावें. श्रीपतराव प्रतिनिधींनीं आज्ञेप्रमाणें उदाजी चव्हाणावर जाऊन त्यास जरब दिली व चव्हाणास घेऊन महाराजांपाशीं आले. दुसरे वर्षी प्रतिनिधि यांजबरोबर

तोफखाना व सामान देऊन, मिरजेचें ठाणें मोगलांकडे होतें तें घ्यावें ह्मणोन त्यांस रवाना केलें. बहिरोपंत पिंगळयांचे चिरंजीव आपाजीराव पेशवाई काढली ह्मणोन उद्विग्नता वागवीत होते, त्यांची परीक्षा पाहणें जाणून संताजी डुबल यास बरोबर देऊन तीस हजार फौजेसहित रवाना केले. त्यांनीं जाऊन किल्ल्यास शह दिला. परंतु किल्ला लांबणींत आणि बांधणींत मजबूद, इलाज न चाले. यामुळें प्रतिनिधीस आज्ञा केली कीं उद्यां हल्ला चढवून किल्ला घ्यावा. दुसरे दिवशीं हल्ला केला. ईशान्येकडील बुरूज तोफा लावून ढळला. निशाण लावून किल्ला घेतला. शेंपन्नास मेले, पांच पन्नास जखमी झाले.' ( भा. व. शा. म. बखर पृ. ५९ ) ते जाऊन मोर्चेबंदी करून तोफा लावून मारगिरी केली. यावरून किल्ला तहास येऊन दिला, ( ता. ३ ऑक्टोबर स. १७३९ ). यावरी महाराजांची स्वारी किल्ला पहाण्यास गेली. पाहून डुबेल यांस किल्ल्याचा सुभा सांगून, किल्ल्याचा व प्रांताचा बंदोबस्त करवून, स्वारी परत आली.[1]

शाहूनें समारंभानें स्वारी बाहेर काढून उंब्रजेवर तळ दिला आणि तेथून अनेक सरदार ठिकठिकाणीं वेळोवेळीं रवाना केले, त्यांतील कांहींच्या हकीकती प्रसंगोपात्त उपलब्ध आहेत. 'चंद्रसेन जाधव उदाजी चव्हाणास बरोबर घेऊन बीडाकडे आले आहेत. विराया वगैरे टाळेटोळे जमा होऊन मुलखांत धूम मांडिली आहे ह्मणोन लिहिलें, त्यास गनीमांस नतीजा देण्याकरितां स्वामींनीं चिरंजीव फत्तेसिंग भोसले, राजश्री रघोजी भोसले व रा. शंभूसिंग जाधवराव व आपाजी सोमवंशी सर

१ टीप—याचे वंशज हल्लीं धुळगांवचे सरंजामदार ह्मणून सांगलीकरांचे पदरीं आहेत. त्यांजपासूनच पुढें पटवर्धनांनीं पुंडावा माजवून मिरजेचा किल्ला आपल्याकडे घेतला, तो मिरजेची जहागीर पटवर्धनांकडे स. १७६० त कायम झाली.

लष्कर यांसीं फौजेनिशीं आज्ञा देऊन रवाना केले आ
रींच त्या प्रांतीं येतील. तरी तुह्मी चिरंजिवांस सामील
करून दाखविणें,' म्हणून ता. २५ जानेवारी १७
हैबतराव बांडगर अमीरुलुमराव यास लिहिलें. ( शा. म
नंतर युद्धप्रसंग होऊन वीरापा धरिला, फौज मोड
याबद्दल शाहूस संतोष होऊन त्यानें ता. २४ मार्च १
लहान मोठ्या सरदारांस प्रशंसापर पत्रें लिहिलीं. ( शा
दोन वर्षें छावणी उंब्रजवर होती. त्यानंतर सुमारें
होती. नंतर श्रीचाफळीं जाऊन श्रीचें दर्शन क
भोजन करून सातारीं आले. शहरचे देवांच्या पूजा
गुढ्या उभ्या केल्या. रस्त्यांत सडे रांगोळ्या घालून
केलें. सर्व लोक पुढें सामोरा नजरा घेऊन आ
स्त्रिया आरत्या घेऊन उभ्या राहिल्या. समारंभेंकरून
याशिवाय, पुणें जेजुरी शंभु महादेव, प्रतापगड, इत
नुसार शाहूचें जाणें वारंवार असे.

---

## प्रकरण बाराचे आधार.

१. या प्रकरणाची कांहीं हकीकत माल्कमच्या
ग्रँट डफ फारसा विश्वसनीय नाहीं. रजपुतांच्या संबंधानें
पाहाव्या लागतात. पारसनीसकृत बुंदेलखंड प्रकरण, व
( ले. ४३, ४४ ), पुणें दप्तरांतील रोजनिशी, राजवाडे
खं. ६ ले. ५८३–६२४, व शिवाय मंडलोईच्या दप्तरांतील
श्री. वि. आठल्ये व रा. भा. रा. भालेराव ( ग्वालेर ) यांज
का. थं. होळकरांची कैफियत व तीन शकावल्या, ऐंगरेचा
पुढील हकीकत चांचपडत बनविली आहे. पुरुषोत्तमकृत '
याचाही उपयोग होईल; परंतु मोगल बादशाहीचे या वे
शास्त्याशिवाय या प्रकरणाचा संपूर्ण खुलासा होणार नाहीं
अगदींच तटपुंजी आहे.

वगैरे नद्या माळव्यांतून उत्तरेकडे वाहत जातात. मराठशाहीचा उत्तरेकडील हा फैलाव समजून घेण्यास तिकडील भूप्रदेशाची रचना प्रथम मनांत ठसविली पाहिजे.

माल्कम ह्मणतो, औरंगजेबाशीं युद्ध सुरू असतांच बादशहास शह देण्याच्या उद्देशानें मराठ्यांनीं माळव्यावर हल्ले सुरू केले. स. १६९० तील एका कागदांत मराठ्यांच्या हल्ल्यामुळें त्या सालीं माळव्याच्या उत्पन्नांत तूट आली, असा उल्लेख आहे. औरंगजेबानें रजपुतांचें वैर संपादिलें तेव्हांपासून बादशहाच्या शत्रूंस रजपूत राजे मदत करूं लागले; आणि रजपुतांच्याच साह्यानें मराठ्यांनीं माळव्यांत प्रवेश केला. सन १६९८ त उदाजी पवारानें माळव्यांत शिरून मांडवगडास तळ दिला. तथापि तेथें कायमचें वास्तव्य करण्यास उदाजीस त्या वेळीं सवड झाली नाहीं. सवाई जयसिंग, शंकराजी मल्हार व बाळाजी विश्वनाथ, यांनीं जो नवीन उपक्रम सुरू केला त्याचें माळवा हें आदिस्थान होतें. मराठ्यांचा व जयसिंगाचा स्नेह होता ह्मणूनच जयसिंगाच्या मार्फत माळव्यांतील जमीनदार व बुंदेले रजपूत, औरंगजेबानें केलेला छळ स्मरून, मराठ्यांस अनुकूल झाले. बाजीरावाचा पराक्रम पाहून आपणास हा नवीन हिंदु पुढारी मिळाला, अशी तिकडील लोकांची भावना झाली; आणि बाजीरावाचे साथीदार शिंदे, होळकर व पवार यांच्या धाडशी व युक्तिबाज उद्योगानें माळवाप्रांत जिंकण्याचें काम सुलभ झालें. या कामाची सुरुवात दावलजी सोमवंशी यानें केली, असा उल्लेख १७१५ च्या एका पत्रांत आहे.

स्वतः बाजीराव माळव्यांत प्रथम केव्हां उतरला हें नक्की कळत नाहीं. स. १७२२-२३ व १७२३-२४ सालांत तो माळवा व बाघेलखंडपावेतों गेल्याचा उल्लेख रोजनिशींतील मुक्कामांत आढळतो. तेव्हां पिलाजी जाधव त्याजबरोबर होता. (पे.द. १७) तसेंच मल्हारजी शिंद्याचा

सरदार खंडेराव हरि भालेराव याचा आजा रामाजी बाबाजी व चुलता मल्हार रामाजी हे माळव्यांत लढत असतां स. १७२५ त मारले गेले, असें भालेरावांच्या कागदांवरून समजतें. तथापि आरंभीं साता-ऱ्यांतील दरबारच्या भानगडीमुळें बाहेरचा उद्योग मनमुराद हातीं घेण्यास बाजीराव मोकळा नव्हता. स. १७२८ त निजामावरील स्वारींत त्याचा पराक्रम सिद्ध होण्यापूर्वीं, बाहेरच्या त्याच्या उद्योगास दरबारांतून सारखा विरोधच होत असे. स. १७२८ नंतरच उत्तरेकडे त्याचा अनिरुद्ध संचार सुरू झाला. स. १७२९ त बुंदेलखंडांत छत्रसालास मदत, स. १७३०त संभाजीचें प्रकरण, १७३१ त दाभाडे प्रकरण, ३३ त हबशावरील स्वारी ह्या गोष्टी नजरेपुढें ठेवून माळव्याच्या उद्योगाची संगति जुळविली पाहिजे. निजामुल्मुल्क स. १७२३ त स्वतंत्र होऊन दक्षिणेंत आल्यावर माळव्याच्या सुभ्यावर राजा गिरिधर याची नेमणूक झाली. त्याजबरोबर मराठ्यांचा झगडा होऊन त्यांत इंदूरचे चौधरी राव मंडलोई यांच्या मदतीनें मराठ्यांनीं प्रथम राजा गिरिधरचा व मागून त्याचे जागीं आलेला दयाबहादूर याचा पाडाव केला. सबब प्रथम ह्या इसमांचा परिचय वाचकांनीं करून घेतला पाहिजे.

**२. राजा गिरिधर बहादुर,** (स. १७२२–२४ ).—राजा गिरिधरचें नांव दिल्लीच्या कारभारांत पूर्वीं आलेंच आहे. (पृ.१८२ ) उत्तर मोगलशाहींत जे थोडे हिंदु कामदार स्वपराक्रमानें प्रसिद्धीस आले त्यांत राजा गिरिधरचे कुंटुंबाची गणना आहे. हे नागर ब्राह्मण अलाहाबादेकडे राहत होते. राजा गिरिधरचा बाप दयाराम ऊर्फ दयाबहादूर व चुलता छबिलाराम हे बहादुरशहाचा दुसरा मुलगा अजीमुश्शान याच्या पदरीं होते. ते मोठे शूर मुत्सद्दी असून त्यांनीं आपल्या धन्याची सेवा उत्कृष्ट बजाविली. अजीमुश्शान पुष्कळ वर्षे बंगालच्या सुभ्यावर असतां त्यास व त्याचा मुलगा फर्रुखसेयर यास दयारामाच्या कुटुंबाची चांगली मदत

होती. लाहोर येथें बहादुरशहा स. १७१२ त वारला, तेव्हां त्याच्या मुलांत गादीविषयीं लढाया झाल्या. या लढायांत दयाराम नागर आपल्या धन्यासाठीं लढून समरांगणीं मरण पावला. राजा मुहकमसिंग खत्री व त्याचा भाऊ केशरीसिंग, किसनगडचा राजा राजसिंग बहादुर, व पृथ्वीराज बुंदेला, हे सरदार व दयाराम, एक मतानें वागून, अजीमुश्शानचा पक्ष उचलून धरीत होते; परंतु अजीमुश्शान मारला गेला आणि दयारामाचा भाऊ छबिलाराम जहांदरशहाचे पक्षास मिळाला. त्यास जहांदरशहानें करा माणिकपुरचा फौजदार नेमिलें. त्याजवळच दयारामाचा मुलगा राजागिरिधर हाही कामास असे. छबिलाराम व गिरिधर यांनीं करा माणिकपुर येथें असतां, द्रव्यसंचय करून फौज वाढविली. जहांदरशहानें वर्ष सहामहिने गादीचा उपयोग घेतला नाहीं तोंच अजीमुश्शानचा मुळगा फर्रुखसेयर बंगाल्यांतून बंड करून, सय्यदबंधूंची मदत घेऊन, आगऱ्यावर चालून आला तेव्हां छबिलाराम व गिरिधर त्यास जाऊन मिळाले. त्यांनीं त्यास, पुष्कळसा पैसा कर्जाऊ दिला व फौजेची ही मदत चांगली केली. ता. १० जानेवारी स. १७१३ रोजीं आग्रा येथें निकराची लढाई झाली तींत छबिलारामानें स्वतः मोठा पराक्रम करून जिवावर उदार होऊन लढण्याची शिकस्त केली, म्हणूनच फर्रुखसेयर यास त्या दिवशीं जय मिळाला. या कामागिरीबद्दल फर्रुखसेयरनें त्यास प्रथम खालसा दिवाणाचें म्हणजे वसुलाचें काम देऊन,पुढें आगऱ्याच्या सुभ्यावर नेमिलें.आग्रा येथें असतां त्यानें चूडामण जाठास वठणीस आणिलें. नंतर कांहीं दिवसांनीं त्याची बदली अलाहाबादच्या सुभ्यावर झाली. जयसिंग व छबिलाराम यांचे संगनमत असून सय्यदांचें व बादशहाचें वांकडें आलें तेव्हां या दोघांची सय्यदांस मोठी धास्ती होती. शेवटीं सय्यदांचीं कारस्थानें सिध्दीस जाऊन फर्रुखसेयर पदच्युत झाला. त्यामुळें छबिलारामाची पुष्कळ नाउमेद झाली. तरी प्रसंगास पाठ देऊन त्यानें सय्यदांस चि

डविलें नाहीं. लवकरच सय्यदांनीं त्याजवर शस्त्र धरिलें. प्रथम त्यांनीं गिरिधर बहादुर यास दिल्लीस बोलावून आणून कैदेंत ठेविलें. तेथें त्यास सय्यदांचा बेत समजतांच तो पळून आलाहाबादेस चुलता छबिलाराम यास जाऊन मिळाला. तेव्हां सय्यदांनीं त्या दोघांवर फौज रवाना केली. इतक्यांत छबिलाराम अर्धांगवायु होऊन मरण पावला, (नोव्हेंबर १७१९ ); आणि गिरिधर बहादुरास त्यांनीं शरण येण्याविषयीं पाचारण केलें; परंतु चुलत्याच्या उत्तरक्रियेची सबब सांगून तो एक वर्ष प्रयागास राहिला, आणि त्या अवधींत त्यानें तेथील किल्ल्याचा वगैरे चांगला बंदोबस्त केला. त्या वेळीं बुंदेले रजपूतही बादशहाशीं लढत असून त्यांचा राजा भगवंत सिंग हा गिरिधरर बहादुरास अलाहाबद येथें सामील झाला. सय्यदांनीं यांजवर मोठी फौज रवाना केली. या फौजेवर महंमदखान बंगश वगैरे सरदार मुख्य होते. गिरिधरसारखा पराक्रमी अनुभवी व शूर सरदार आणि अलाहाबादसारखा महत्वाचा किल्ला जोंपर्यंत आपल्या [illegible]ज नाहींत तोंपर्यंत सय्यदांस चैन पडत नव्हतें. किल्ला कबजांत येईना, तेव्हां सय्यदांनीं आगऱ्याहून आपल्या भरंवशाचा सरदार रतनचंद यास गिरिधरवर पाठविलें. रतनचंदानें गिरिधरची खासगी रीतीनें भेट घेऊन त्याबजरोबर सल्ला ठरविला. राजा गिरिधरनें तीस लाख रुपये व अयोध्येचा सुभा घ्यावा आणि अलाहाबादचें ठाणें सोडून द्यावें, असा तह ठरून, राजा गिरिधर अयोध्येस गेला आणि रतनचंद सय्यदांकडे आगऱ्यास परत आला, ( मे स. १७२० ). त्या वेळीं महंमदखान बंगशाचा भाऊ अहंमदखान याची नेमणूक सय्यदांनीं अलाहाबादच्या सुभ्यावर केली. पुढें सय्यदांचा पाडाव झाला आणि अयोध्येच्या सुभ्यावर बादशहानें सादतखानास नेमिलें. तेव्हां तेथून गिरिधर बहादुराची बदली माळव्यावर बहुधा स. १७२१ त झाली, परंतु निजामही तेथें हक्क सांगत होता.

३. **चौधरी राव नंदलाल मंडलोई**:—हे जातीचे ब्राह्मण बादशाही अमलांतत इंदुरास चौधरीचे कामावर असून नर्मदेवरील उतारांच्या बंदोबस्ताचें काम त्यांजकडे होतें. मोगल अधिकाऱ्यांनीं त्यांस सर्वस्वी हैराण केल्यामुळें सवाई जयसिंगाचे सल्ल्यानें ते मराठ्यांस अनुकूल झाले. त्यांस आपल्या बाजूस वळविण्याचें काम मल्हारराव होळकर व उदाजी पवार यांनीं केलें. रा. श्री. वि. आठल्ये व रा. भा. रा. भालेराव यांनीं मंडलोईच्या दप्तरांतील कित्येक पत्रांच्या नकला लेखकास दिल्या, त्यांवरून मराठ्यांच्या उद्योगाचा बोध चांगला होतो. तत्संबंध पत्रें पुढें दिलीं आहेत. मंडलोई घराणें अद्यापि इंदुरास

मंडलोई राव चूडामन चौधरी
|
नंदलाल
|
राव तेजकर्ण
|
दुलेराव

राव चूडामन चौधरी याचा उल्लेख फर्रुख
चौथ्या वर्षी (स. १७१७) नंदलाल यास दि
कंपेल परगण्याच्या चौधरीपणाची आहे. (
नंदलाल व सवाई जयसिंग यांचा
( ६–५८३ ). नंदलाल व मल्हारराव

स.१७२० पासूनचा उपलब्ध आहे ( ६-५८५ ८९ ), त्यावरून माळवा-प्रांत जिंकण्याचा उद्योग बाळाजीविश्वनाथाचे हयातींतच होळकरानें सुरू केला, असें दिसतें. बाळाजीच्या अंगीकृत कार्याचा एक भाग हा उद्योग होय. स. १७२३--२४ चे दरम्यान मल्हाररावानें इंदुरास ठाणें दिलें व उदाजीपवारानें धारचा कबजा घेतला.रघूजी व कान्होजी भोसल्यांचा डोळा माळव्यावर होता त्यास बाजीरावानें जरब देऊन दूर ठेविलें ( ६--५९१) 'हल्लीं नंदलाल मंडलोई मरण पावले' असा उलेख ३—११--१७३१ च्या पत्रांत आहे. त्या प्रसंगीं त्याच्या पुत्रांचें समाधान करून बाजीराव व चिमाजी आपा यांनीं त्यांचें पुढें यथायोग्य चालविण्याविषयीं अभिवचन दिलें आहे. मल्हारराव होळकरानें तेजकर्णास बहुमान पालखी देऊन त्याच्या नेमण[illegible]द्दल सालाचे ७०० रु. देण्याबद्दल १३-८--१७४९ रोजीं [illegible]रास हुकूम काढिला, ( रा. श्री. वि. झाठल्ये पत्र ). तसेंच [illegible]डा मराठ्यांच्या कमावीसदारांनीं आपल्या वास्तव्यास [illegible]चा त्यांस परत देऊन, त्यांचें निरंतर यथास्थित मल्हाररावानें लिहून दिलेलें आहे. स. १७-२० नारोशंकराचें नांव ही माळव्याचे उद्योगांत उदाजी पवाराचे दिंमतीस असून, स. १७३० ठकराकडे झाली. यावरून त्याच सालीं बाजी-[illegible]लें हें उघड होतें. नारोशंकरानें लोकांस हैराण [illegible]रून दूर केल्याचा उल्लेख ६—१०—१७३२ [illegible] जागीं बाबूजी नाईक व आबाजी नाईक झाली होती. स. १७२९ त नंदलाल [illegible] जरब दिली आहे ( ६. ५९९ ). [illegible]द्याचें नांव तिकडील उद्योगांत आढळतें. [illegible]दे या दोघांसच बाजीरावानें माळव्याचे

उद्योगावर ठेवून इतरांस तेथून काढिलें, (६. ६२०). स. १६५८ चें पत्र पाहतां माळवा प्रांत स्वराज्यादाखल मराठयांचे कबजांत आला होता असें दिसतें. (६-६२२)

नंदलाल मंडलोईप्रमाणेंच बढवाणीचा ठाकूर अनूपसिंग मराठयांस सामील झाला होता. त्याची व बाजीरावाची भेट स. १७२३ च्या जानेवारींत झाली [२. पृ. ४७]. त्याच्या मुलखास उपद्रव देऊं नये असें आज्ञापत्र शाहूनें सन १७३५ त उदाजी पवार व मल्हारराव होळकर यांस काढिलेलें आहे. [शा. म. रो. २०२].

४. **सारंगपुरची लढाई, राजागिरिधरचा पाडाव,(स१७२४?)**– युद्ध व कारस्थान या दोनही मार्गांनीं बाजीरावाचा उपक्रम माळ-व्यांत चालू होता. निजामास अडविण्याच्या हेतूनें रा[illegible] गिरिधरची नेमणूक बादशहानें माळव्यावर केली असून त्यास ब[illegible] सिंग व अजितसिंग यांचें साह्य होतें. वास्तविक आग्रा [illegible] दोनही सुभ्यांची व्यवस्था बादशहानें जयसिंगाचे [illegible] पैकीं आग्रा प्रांत जयपुरास लागून असल्यामुळें त्याकडे घेतला, आणि माळव्यावर राजा [illegible] (आर्व्हिन). परंतु गिरिधर जयसिंगाचे वि[illegible] त्यानें मंडलोई वगैरेंच्या मार्फत मराठयांशीं [illegible] माळव्यावर स्वारी करविली. जयसिंगाचें पा[illegible] रिघाव तेथें सुलभ रीतीनें झाला नसता. ज[illegible] चौथाई संपादन करावी असा बाजीरावा[illegible] जाण्यास पुष्कळ अवधि लागला. स. १[illegible] करण्यांत आला [शा. म. रो. १०५ [illegible] १७२०–२१ व १७२२ ह्या सालीं [illegible]

१ टीप––नर्मदेच्या दक्षिण किनाऱ्यास

झाल्या असें माल्कम सांगतो. त्यानंतर मंडलोईच्या मार्फत मराठ्यांची फौज माळव्यांत येऊं लागली, तेव्हां त्यांचा व राजा गिरिधर ह्याचा सामना जुंपला. यांत चिमाजी आपा व मल्हारराव होळकर प्रमुख होते. देवासच्या ईशान्येस सुमारें पन्नास मैलांवर पार्वती नदीचे कांठीं सारंगपुर ठिकाण हल्लीं देवास संस्थानचा एक तालुका आहे, तेथें राजा गिरिधरचें वास्तव्य होतें. चिमाजी आपानें त्याजवर अचानक हल्ला करून त्यास ठार मारिलें.

त्यावरून सारंगपुरची लढाई स. १७२७ त झाली असावी. राजा गिरिधरच्या या लढाईत उदाजी पवार व चिमणाजी दामोदर होते असें डफ व शकावलीकार म्हणतात. उज्जन येथ तट आहे त्यास राजागिरि नांव चालतें. लगेच बादशहानें त्याचे जागीं त्याचा चुलत भाऊ ...याची नेमणूक केली.

## लढाई दयाबहादुराचापाडाव, (१२-१०-१७३१).

दोन वर्षेपावेतों बाजीरावास निजामाशीं झगडावें ... लक्ष देण्यास फावलें नाहीं. तथापि स. १७२८- ...द्योग सुरू झाला. स. १७२८चे ऑक्टोबरांत ...त स्वारी करून दयाबहादुरास ठार मारल्याचे ... बहुधा चिमाजीनें माळव्यावर दोन तरी स्वा-

---

...ादुरोनें पातशहाके मदतगार होकर हमारे भाई ...शके १६४६ के सालमें सारंगपुर मुकामपरणमें ...ाचा उल्लेख जयसिंगाचे एका पत्रांत आहे ...कीं ४८ याबद्दल संशय वाटतो. पुरुषोत्तमकृत ...२४ साल पूण तपासाअंतीं दिलें आहे ...ंवत असावा, शक कां ?

ऱ्या लागोपाठ केल्या असाव्या. दयाबहादुर १२-१०-१७३१ रोजीं मारला गेला असें पुढें एका पत्रांत स्पष्ट आहे. 'दयाबहादुरचा पराभव करून आजच पुण्यास आलों,' असें चिमाजी आपा२४-४-१७३० रोजीं लिहितो ( ब्र. स्वा. ले. ४३ ). तेव्हां चिमाजीनें त्याजवर स. १७३० त व ३१त अशा दोन स्वाऱ्या केल्या हें उघड होतें. दयाबहादुर सुभा झाल्यावर त्यानें मंडलोई वगैरे मंडळीस आपल्या बाजूस वळविण्याचे काय काय प्रयत्न केले, मराठ्यांचे बाजूस होळकर बाजीराव वगैरेंचीं कारस्थानें कशीं चाललीं होतीं, आणि जयसिंगाचे साह्यामुळेंच शेवटीं मराठ्यांस जय कसा मिळाला, हे प्रकार अस्सल पत्रांनींच स्पष्ट दिसणारे असल्यामुळें तींच पुढें दाखल करितों.

म॥ अनाम नंदलाल मंडलोई प्रा॥ इंदूर प्रांत मालवे यांसी ऽदाजी पवार. सु॥ सलासैन मयाव अलफ. प्रा॥ म॥ अंमलदार जाऊन र महिने जाले; अद्याप अंमल चालत नाहीं व कांहीं देखरेख म्हणोन विदित जालें. तरी ते गोष्ट तुम्हां योग्य आहे ऐ प्रांतांत हरएकविशीं भरंवसा तुमचा असतां अद्याप अंमल हें उत्तम नाहीं. तुमचा आमचा स्नेहे आहे याजकरितां नाहीं, तरी अंमल हरप्रकारें चालेल, राहतो ऐसें नाहीं. अवांतर पं॥ अंमल नाहीं तरी तेथेंही अंमल बसा प्रांत आपला आहे. येथें ही अंमल न चाले ऐसें करून अंमल दिल्हा तरी उत्तमच आहे. हरकोणी ऊर्जित होईल, नाहीं तरी विचार करतच आहे. खुश आहां, ल्याहावें ऐसें नाहीं. तरी राज कुलबाब कुलकानू सुरळीत देणें. उजूर एक २९ मोहोरम. येविशीं तुम्हांस दोन तीन

उत्तर न आलें. तरी या पत्राचें उत्तर पाठवून देणें. जाणिजे. ( १४-८-१७२९ ) [ रा. श्री. वि. आठल्ये. ]

मा।र अनाम नंदलाल मंडलोई पे।। इंदूर यांसी—बाजीराव बल्लाळ प्रधान. सु।। सल्लासीन मयाव अालफ. रा. कुसाजी गणेश हुजूर आले. त्यांणीं कितेक अर्थ निवेदन केला, त्यावरून सविस्तर कळलें. ऐशियासी आमची स्वारी ते प्रांतें सत्वरीच आहे. माळवियाच्या बंदोबस्ताचा अर्थ रा. लाला हरनाराण यांणीं लिहिला व जबानी सांगोन पाठविला होता. त्यास प्रांतमा।। चा बंदोबस्त जालियां रयत निरुपद्रवी राहून दुतर्फा किफायतच आहे. एतद्विषयीं येथून उज्जनच्या सुभ्यास व लाला हरनारायेण यास कितेक अर्थ लेख करून पत्रें पाठविलीं व जबानी मा।।रनिल्हे सांगतील. तरी तुम्ही त्यांस विचाराच्या चार गोष्टी सांगोन मुल्काचा तह
र्फा कमावीस सुरळीत चालाविणें. जरी हे गोष्टी त्याचे वि-
तरी आम्ही ते प्रांतें येतच आहों. आमची फौज तिकडे
ासप्रयुक्त राहातोसा नाहीं. खराब होईल. नुकसान होणें
वरकड कितेक अर्थ मा।।रनिल्हे तुम्हांस सांगतील त्याज-
रांश, तुम्ही मातबर कार्यकर्ते एकनिष्ठ आहां. हरएक
असें नाहीं. तुमचें सर्व प्रकारें अगत्य आहे तदनुरूप
. आपला खातरजमा असों देणें. आमची स्वारी
मातबर मनुष्य हुजूर पाठवून देणें; व त्यांजकडील
ा तुम्हीच रेवातीरीं भेटीस येणें जाणिजे. छ १९
२९, खंड-५९९ ).

ा धर्ममूर्ति रावनंदलालजी प्रमुख्य मुख्य सरदार
र, जोग श्री अवंतिकासे लेखक दयाबहादुरकृत
के. मालवाका राजा महाराजा श्रीगिरिधर
ा राज्य चला आया. ये सन ११३२ में

मालवी सालमें दखनके मराठे सरदार माळवामें आये, और जंग हुवा, लडाईयां ली, परमेश्वरकृपासे, सारंगपुर मुकामपर परमधाम गये. पीछे उसी जगे आप हो, ऐसा हम समझकर, दखनवालेसे बदला लेना इस वास्ते में दिल्ली जाकर पातशासाबसे अरजकर सुभेका अधिकार ले आया हुं, और आपकी आज्ञासे दुर नहीं, ऐसी मेरी तरफसे होते. मेरे सुननेमें आया है कि आप मेरेसे बहोत नाराज होकर सवाइ जेसिंग महाराजासे सला करते हो के मराठे सरदारकों मालवेमें लाकर प्रमुख करना, और निजाम साबको जेर करना, एसा विचार करते हो, तो ये कैसा होगा ! पातशाकी पुन्याई क्या कम है नही. मेरे हाथ सत्ता आई है. पचास हजार फौज तयार है. आप दाना सरदार मालवेमें हो, और राजा साहेबबहादुरके प्रधान होकर आपकी सर्व सत्ता मालवेमें व्याप रही है. बादशा भी आंपको उसी जगे मानते है. एसा हो ते आपला रंज मेरेपर जो बाबमें लिखता हुं के, मालवे में जो सरदार राजासाहेब के वो आपके कृपासे प्रफुल्लित है, उनपर मेरेसे कुछ टांके लें में जुलुम हुवा, उससे आपकी व मालवेकी प्रजाका व नाराज होना है, परंतु में आपकी मरजी के माफीक स करनेवाला हुं. पहेले जो हुवा, उसकी माफी मिलना ताबेदार के उपर कडवी निगा है, वो दूर होकर रहेगी, तो दखनवालेसे बैर लेनेमें आवेगा. आप दा कानुन्गो नरहरदासजी व मयारामजी जोसी वकी मजकुर कहेकर समझा दिये है. आपको कहेंगे मालूम होगा. सबध्यानमें लाकर, उत्तर मेहेरबा अवल सन सल्लासीन मया व अलफ, [ २६ ग्वालेर.] सिधेश्री श्री १०८ धरममूर्ति राव नं

प्रांतमाळवा संस्थान इंदोर. योगश्री अवंतिकासु सेवक दयाबहादुर कृत प्रणाम बंचे. विनंति हैकी. सनसाल गुदस्त ता. १५ जमादिलावल का खत नरहर जासजी जमारामजी जोसी वकील इनोके हाथ भेजा वो पोंचा, जुबानी सब मजकूर आपकु कह्या, फेर बी आपके दीलमें जो आटी हमारे निसबत है, उसकी सफाई न की, और विसी तरे आप दुशमनो को लानेके वास्ते दखन पत्रव्यवहार कर रहे हो, और कुलमालवेके सरदारोंका दिल आपने अपनी मुठीमें लेकर, बादशहा गारद होना, ये सल्ला बिचारी, तो ये बात आप दाना सरदारके लायक नहीं. आपके जो दिलमें जो बात है,तो हमने बादशासाहेबको लिखी, इसपर वांसे लिखा आया है की, राजासाहेब गिरिधरबहादुरकी गादी करेंगे, वैसाही बंदोबस्त चलावेंगे, पर ये रावसाहेब गलबा क्यों नही मालवेमेंसे मिटाकर हमारे पास आते,एसा लिखा आया ... पास भेजा है. अब सब तरेसे विश्वास लाकर ये गलबा मिटा दो. ...हीं. आपके मरजी माफीक सब सरदारोंका बंदोबस्त, परधानी ..., उस में आजतक कोई तरे कम नहीं है, और होगा ...दे आप जैसा चाहोगे वैसाही होगा पर आप बैरीओंसे ...मालवे में बुलाना ये आपने केसा बिचारा होगा. और आप मालवे के नाके घाटे बंद कर,पचास हजार फौजका ... इसका क्या कारन. आपसे मे मिलनेकी इच्छ... पधारो, या मैं इंदोर आऊं. छ २५ रमजान. ...व अलफ [ २३-३-१७३१, रा. भालेराव ]

... महाराज धरममूर्ति राव नंदलालजी प्रमुखा ...स्थान इंदोर जोग श्री. अवंतिकासे सेवक ...प्रणाम बंचे. विनंति है की, ता. २५ ...आपके तरफ पत्र भेजा और मिलनेकी ...जाब न भेजनेसे मिलना भी हुवा नहीं,

इससे आपके दिलको मतलब नहिं मालुम पडता. क्या है और किसवास्ते है. में आपके हमारे मिले सिवाय मतलब नहिं मालूम नहीं हो सकता. और आप पत्रसेभी नहीं मालूम करते, इससे मेरे दिलमैं बहोतसे शक पैदा होते हैं. पहेले तो मेरेपर इतराजी, दुसरे मराठेको लडनेका मालूम होता है, और इस लिये आप जमाव कर रहे हो तो में आपने क्या बिचारी है ? आपके मरजीके सिवाय, मालवेमें कोन बात हुवी व होनेवाली है, वो तो नहीं. पादशा साहेब सब तेरेसे भरोसा आपका रखकर राजासाहेबकी जगे आपको स्थापित करके, वेसाही मानपान रखते होते, एसी आपकु क्या भीडकी दुशमानोसे सल्ला करना ये क्या ठेराई है.

ये सब नरहरदासजी कानुंगो आपकू समजाकर कहेंगे वो ध्यानमें लाकर ये जलदी मालवेमेंसे गलबा उठा लो, और रियायाको जल[illegible] चैन करो ऐसी मेरी विनंती है. तारीख९माहे सवाल, इहिदे स[illegible] व आलफ. [ ६-४-१७३१, रा. भालेराव ].

ता. २५ माहे जिल्हेज इसने सलासीन मयाव अलफ. यांचे नांवें पत्र सिक्का मोहोरी. आपला पत्र सवाई जैसिं[illegible] घेऊन मयाराम जोशी वकील बऱ्हाणपुरचे येथें भेटले. स[illegible] तीचे कळवून, नालछा व मांडव मुक्कामीं जमाव मदती[illegible] बहादुरच्या जुलमामुळें जमीदार व प्रजा नाराज म्हणोन केली. त्यास आम्ही निघून रेवातीरीं आलों आहों. [illegible] असल्यानें, नेमाड इलाख्यांतील चौधरी कानुंगो रि[illegible] झाल्यानें आपलेकडील मदतीचा अनुभव आल[illegible] जाणिजे. छ. २५ मोर्तबसुद. (२०-६-१७३१

सिधेश्री १०८ महाराज राव नंदलालजी तिरलायसे दयाबदुर सुभाके न प्रणाम पोंचे.

मांडवसे आया, उसमें लिखा है, की रावसाहेबके सरदार भाई बेटेनें मरेठी फौज भरती देखी तब उन्होनें निकाल कर दुसरे घाट चढाली, और ये लोग सामनेमें रहे. इससे इनके सरदार और भाई बेटे अच्छे-बहोतसे घाटपर मारे गये, इनकी तपसीलभी लिखी आयी है, सो आपको लिखते है की, ऐसा आपको क्या अडा है, मेरेठेको बचाना, और आपने भाई बेटे सरदार मरवाना, और दुशमानोंको मुलूख दिल-वाना, ये क्या बात और क्या बिचारमें फरक आया है. हमारे लिखनेमें फरक लाते हो लो. अबये भाई बेटेकी हानी हुवी इसका और मालकके घरमें निमकहरामी हुई, कोण बिचार करेंगा, एसा सब सोच कर, पांच आपके सरदारोंसे सला मिलाकर, अपना मालवदेश दुसरेके हाथमें मत दो. इश्वर करेंगा, तो महाराजा साहेब गिरधर बहादुरकी फिर गादी हो जावेगी, वंश कुछ डुबा नहीं है. आपके उन्हके स्थाईक ठे हो तो वो दिन आवेगा, पर बैरी दुशमनोको लानेसे, वाई जेसिंग महाराजकी एसी सल्ला होनेसे, कुछ न होगा. ाठे लोग इस दिनको याद नहीं करेंगे ऐसा जावो, को मदत मत करो, ये मेरी आखीर बिनंति है. ता. १९ सन इसन्नेसल्लासीनमया व अलफ (१०-१०-१७३१,

महाराव नंदलालजी प्रधान व भाइजी ठाकर नरहर न इंदोर. योगश्री अमरगढसु महाराजाधिराज श्री म बंचजो. अत्र कुशल तत्र कुशल. श्रीजीकी कृपासु ंत एसी के मालवेकी हकीकत आपूकी तरफसुं लूम हुवी. और ता. २९ रबिलाखरका पत्र शवा प्रधान दखनसु लिख्यो की आपके संकल्पके

माफिक ता. २१ के रोज (१२-१०-१७३१) मालवेमें फत्ते हुई, ओर दया बहादुर सुबा रणमें काम आया. इसमें रावसाहेबजी व ठाकर नरहरदासजी व मयारामजी वकील, इनने आपन तनमनधनसे भाई बेटे सरदार सुदामत दी, परंतु मांडव घाटपर पादशाका सुबाने बंदोबस्त ऐसा करा था, कि रस्तेमें तीन सुरंग लगाई थी, ओर फोज पचीस हजार तयार थी, घाट चढते मरेठी फौज बहोतसी मरने लगी, ओर जो जरासो कदम उपर चढे तो मांडववाले सुरंग दागें, तो कुल फोज गारद होवे. ऐसे मोकेपर रावसाहेबनें खबर दी, ओर मांडव घाटका रस्ता बदला कर, दूसरे रस्ते भेरों घाटसे फौज चढा ली, ओर अपने भाई बेटे व सरदारोंको घाटपर सुरंगमें उडाये, ओर मुकाबलमें कट गये. बहोतसी मदत करी के उसका हाल लिख नहीं सकत्ते यौके लिखा आया सो आपकुं लिखते हैं, कि ये बात आपने क लिखी नहीं. हजार शाबास है के फकत हमारे कोलके उप मालवे सरदार रहकर, अपना धर्मका कल्यान होना, अ धरमकी वृद्धि होना, ये बात बिचारकर मालवेमेंसे मुसलम किये, ओर धर्म कायम रखा, हमारा मनोरथ आपने पुरा बद्दल हमने पेशवाको लिखा है कि, आपके मरजीके मार्फ सब सरदारोंका बंदोबस्त अच्छा होगा, जैसा तुम इनकूं हो, इसी माफक उनका मालवेमें जमाव डालना, ऐसा न पाव पाहिले सरीके उठ जावें, तीन बखत मालेवेमें कुछ मिला नहीं, सो इसका पूरा बिचार रखना, समजना, जादा आपकु लिखनेमें आता नहीं. अ तारीख ५ जमादिल अव्वल, सन इसने (२६-१०-१७३१).[1]

[1] टीप. मुसलमानांचा पाडाव करण्यांत मरा किती होतें हें या उद्गारांवरून स्पष्ट दिसून येतें.

सिधेश्री १०८ महाराव भाईनंदलालजी प्रधान व ठाकर नरहरदासजी कानुनगो सवस्थान इंदोर. योगश्री जेपुरसे श्रीमहाराजा सवाई जेसिंगजीकृत प्रणाम बंचना. अत्रकुशल, तत्रकुशल, श्रीजीकी कृपासे चाहिजेजी. आपरंच हकीकत ऐसीके. ता. ५ जमादिल आवल सनगुदस्तका पत्र आपकु लिखाथा कि जैसे आप मल्हाररावजी होळकर व राणोजी सिंदे कुल दखनसे वकील भेजकर बुलाये, और आपने भाई बेटे सरदार हजारों आदमी कटाकर इनकु मालवेमें स्थापित किये,ओर हमारे लिखनेपर इनकूं पुरी मदत देकर टांकेदारोंसे और महालोंसे वसुल पोता सुरू करा दियाये खबर दिल्लीके दरबारमें पोहोंचनेसे बादशा सलामत हमसे बहोत नाराज होकर लिखी है कि, रावसाहेबने कुल मालवेके सरदारोंका दिल आपने हातमें लेकर आप उनसे मिले, इससे हमारा सुभा गारद करवाया, और [illegible]पनोंके दिलवाकर, तोजी करा दी, तो कुछ फिकर नहीं, इसका [illegible]हो मिलेगा, और मरेठे तीन दफे मालवेमें आये, ओर मारकर [illegible]. एसा फिर उसीमाफिक सजा होकर निकाले जाते हैं. [illegible]हांसे चढाईकी तारीख मुकर्रर है, एसा लिखा आया सो [illegible] बाजीरावजीको लिखा. उसपरसे बाजीरावजी पेशवा लिखते हैं [illegible]ालवेमें हमारा जमाव डालना, ये काम प्रधान रावनंदलालजी [illegible]दासजी ओर उनके सरदारोंका है. इन्होंका मालवेमें [illegible] चोधरात, व चोथान कानुनगोई, व भाईबेटे हकदार जो, [illegible] सवस्थानोंका हक्क महाराजा गिरिधर बहादुरके खान[illegible]ला आया,वो निर्वेध हम चलाके जास्ती परवरसी करेंगे. [illegible]ा कोल है की, राजासाहेब गिरिधर बहादुर ये [illegible]नोनें पादशाके मदतगार होकर हमारे भाई चिम[illegible] शके १६४८(?) के सालमें सारंगपुर मुकामपर[illegible] [illegible]में मालवेका जो उत्पन्न आताथा, उसका हिसाब

हमनें देखा. उनकी गादी कायम करके वैसाही बंदोबस्त चलावेंगे, ऐसा श्रीनर्मदाके तीरपर कोल है, ऐसा लिखा आया. सो आपको लिखते हैं की बादशाने चढाई की है, तो कुछ चिंता नाहीं. श्रीपरमात्मा पार लगावेगा. बाजीरावजी पेशवासे हमनें आपके निसबत धर्मकर्म कोल वचन कर लिया है. अब किसी तरेका शक न रखते, इनका जमाव मालवेमें अच्छी तरेसे डालना. और हंमेशा पत्र कुशलताका लिखता रहना. मालवेका बंदोबस्त सब आपके भरोसे है. ता. २५ सफर, सल्लास सलासीन मया व आलफ [ ६-८-१७३२, रा. भालेराव—ग्वालेर ]

ह्या युद्धांत होळकराचा सरदार बोळे ऊर्फ बुळे यानें विशेष पराक्रम केल्यामुळें तो पुढें इंदुरास प्रसिद्धीस आला. होळकराचे कैफीयतींतील खालील उतारा मार्मिक आहे ( पृ. ९-१० ). ' रजपूत रजवाडे यांचा इरादा कसेंही करून सर्वांनीं एक दिल बादशाहीस धक्क सवाई जयसिंगास पुढें करून दक्षणी घोडीवाले यांस बगर्दे देवदर्शनाचें मिसें उज्जनीस आले. एकाएकीं उघड होतां नं इंदुरकर मंडलोईस मल्हारजी होळकरांकडे पाठविलें. तुह्मी ए इरादा धरला आहे त्यापक्षीं तुह्मांस तमाम राजे रजव मोठे सामल करून देऊं. दयाबहादूर सुभा उज्जन पादशा त्याचें पारिपत्य करून धारा उज्जन येथें अंमल तुमचा होऊ चालू झाली, ह्मणजे एक समयावच्छिन्न लहान मोठे रजव तुह्मापाशीं आणितों. अशी मसलत करून, इंदूरचे जम पाठविले. मल्हारजी व बाजीराव यांनीं मसलत करून पुण्यास रवाना करून, आपण सडा घोडा राऊत उद्देशांत, तों नंदलाल मंडलोई दोनशें स्वारांनिशीं ये झाल्या. सवाई जयसिंगानीं रवानगी करतेसमय आले ते सर्व बोलून आशा दुराशाही विशेष दार

जींनीं आज्ञा केली, आम्हांस घांटातील वाट निटोप्याची दाखवावी. दोन प्रहरचे संधीस आम्हांस त्यांजवर नेऊन सोडावें. इकडे दयाबहादर धारचे मुक्कामीं येऊन घाटाचा बंदोबस्त करून होते. परंतु इंदूरकर जमीदार व वढवाणीकर या उभयतांनीं अनोळखी घाटवाट काढून, सुभ्याकडील बंदोबस्त जागचे जागींच राहून, नर्मदा उतरून, सूर्योदयापूर्वीं घांट चढो-न गेले. उदाजी पवारही त्याच वाटेनें उतरून घांटावर होळकरास सामिल झाले. उन्हाळ्याचे चैत्राचे दिवस. अदकोशावरून हरहर महादेव करून घोडे घातले. बाहेरचे बाहेर एकसहा कत्तल केली. तोफखाना आपलासा केला. पायदळ कडब्यासारखें कापलें. दयाबहादर पांच हजार स्वार घेऊन आला ते नाहींसे करून, दयाबहादूराचें डोकें हत्तीवर कापलें. विठोजी बुळे याजपाशीं दोन हजार स्वार मागें ठेवून मल्हारराव आठ हजार स्वारांनिशीं ---स येऊन अंमल चालू केला. कांहीं एक अवघड पडलें नाहीं ---भा एका छाप्यांत बुडविला. हा दक्षण्यांचा बेत, काळ श्रीमं- ---प्रताप मल्हारजींचे तलवारीचा. तों रजवाड्यांचे वकील आले ---न पुण्यास आले. तेथें वकिलांचीं बोलणीं होऊन बाजीराव ---पागमें घेऊन माळव्यांत आले. सवाई जयसिंगाचे विचारें ---सपास धुमाकूळ उडविला. जाळपोळ अशी केली कीं दिल्लीचे ---स कोस नादिवा नाबत्ती. कुंजपुरा लुटला. फौजेंत सुवर्णाचा ---बादशाही हालवून माघारे फिरले. सवाई जयसिंग बाजीराव ---ंच्या भेटी झाल्या. जयसिंगाजवळून तीस लाख रु. घेतले. ---त आले.' ( होळकरांची कैफियत पृ. ९-१० ).

--- राव नंदलाल मंडलोई हा बाजीरावास प्रथम ---नातवाकडून खालील माहिती माल्कम सा० स ---I पृ. ८२-८३ ). 'महंमदशहाच्या कारकी- ---ाधुंदी माजली होती. दयाबहादूर माळव्याचा सुभे-

दार होता. राज्यकारभारांत अव्यवस्था झाल्याबरोबर शेतकरी रयतेची मोठी अवाळ होऊं लागली. पाहिजे त्यानें यावें आणि रयतेकडून पैसा उकळावा असा प्रकार चालू झाला. दयाबहादूर व त्याच्या हाताखालचे मुनीम यांनीं रयतेस इतकें पिळून काढलें कीं, माळव्यांतील ठाकूर व जमीनदार हे बादशहाकडे दाद मागून मागून थकले. सरकारांत आपली दाद लागत नाहीं असें पाहून, ते जयपूरचा राजा सवाई जयसिंग यास शरण गेले. जयसिंग मोठा पराक्रमी व धूर्त होता. इतर रजपूत राजांप्रमाणें तो बादशहाविरुद्ध उघडपणें उठला नव्हता. परंतु दरबारांत त्याची चहा होत नसल्यामुळें त्यानें बाजीराव पेशव्यांशीं स्नेह जोडला. त्यानें माळव्यांतील ठाकरांस अशी सल्ला दिली कीं तुम्ही मराठ्यांना बोलवा म्हणजे ते तुमची दाद घेतील. माळव्यांतील ठाकरांत इंदूरचा जमीनदार राव नंदलाल चौधरी हा प्रमुख व मातबर सरदार असून त्याजपाशीं दोन हजार फौज चांगली तयार होती. त्याजकडेसच नर्मदेवरील उतारांचा बंदोबस्त ठेवण्याचें काम होतें. जयसिंगाच्या सल्ल्या... लानें बाजीरावाशीं बोलणें सुरू केलें. बाजीरावाची फौज बऱ्हाण... छावणी देऊन राहिलेली होती. तिच्या आघाडीवर मल्हाररा... बारा हजार फौजेनिशीं जय्यत तयारीनें होता. राव नंदलाल यानें होळकर जाजकडे आपला वकील पाठविला आणि त्यास नर्म... माळव्यांत बोलाविलें. "नर्मदेवरील उतारांचा व पलीकडच्या ... टांचा उपयोग तुम्हांस चांगला करून देऊं" असें अभिवचन ... मंडलोईच्या मदतीनें धरमपुरी आणि महेश्वर यांच्या दरम... म्हणून नर्मदेवर एक गांव आहे त्या ठिकाणीं नर्मद... माळव्यांत आला. दयाबहादुरास ही खबर लागतां... तो मल्हाररावास अडविण्याकरितां गेला. परंतु म... मंडलोई वगैरे लोकांनीं आगाऊ इशारत दिल्या...

येतां मांडवगडच्या पूर्वेकडील भैरव घाटानें माळव्यांत आला. मल्हारावाची व दयाबहादुराची गांठ धारनजीक तिरला गांवीं पडली. लढाई होऊन दयाबहादूर मारला गेला. याप्रमाणें माळवा प्रांत मराठ्यांच्या हस्तगत झाला. प्रांताच्या वसुलाची व्यवस्था लावतांना मराठ्यांनीं पूर्वींचे बादशाही धारे कायम ठेविले. आणि दुसऱ्या कोणापासून रयतेस इजा न पोंचावी अशी तजवीज केली. पूर्वींचे मोगल अंमलदार त्यांनीं काढून टाकिले, आणि आपले दक्षणी अंमलदार नेमिले. कांहीं रजपूत जहागीरदारांनीं मराठ्यांना जुमानिलें नाहीं, त्यांच्या जमिनी मराठ्यांनीं खालसा केल्या आणि त्यांच्या जागीं आपले नवीन जमीनदार नेमिले. या वेळीं रयतेला संतुष्ट ठेविण्याची खबरदारी मराठ्यांनीं चांगलीच ठेविली होती.

नंदलाल मंडलोईच्या मृत्युसंबंधानें खालील पत्रें वाचनीय आहेत. ' अनाम मंडलोई तेजकरण पा। इंदोर यांसी बाजीराव बल्लाळ प्रधान सु॥ [illegible]न्ने सल्लासीन मयाव आलफ. तुह्मीं विनंतिपत्र पाठविलें तें पावोन [illegible]कळलें. नंदलाल मंडलोई-यांस देवाज्ञा जाली, चालले प्रकारें [illegible] ह्मणोन कितेक निष्ठापुरस्कर लिहिलें तें कळलें. ऐशियास [illegible]र्तीचा येखतियार रा। मल्हारजी होळकर व रा। राणोजी शिंदे [illegible]न पाठविले आहेत. यांस तुमचा गौर करावयाविसीं कितेक [illegible] आहे. उभयतां म॥ रनिल्हे आज्ञेप्रमाणें तुमचा गौर करतील. भेटोन कामकाज करीत जाणें. तुमचा सर्व प्रकारें आह्मांस [illegible] तदनुरूप निर्वाह होईल. आपलें वर्तमान वरचेवर लिहित [illegible]. २ जमादिलावल. लेखन सीमा. ' (२३-१०-१७३१; [illegible]रे ).

'[illegible]ोळकर गोसावी यांसी अखंडित लक्ष्मी आलंकृत [illegible]जी बल्लाळ आशीर्वाद. सु॥ इसन्ने सल्लासीन मंडलोई प्रगणे इंदूर, हे पहिलेपासून निष्ठेनें

वर्तत आहेत. हल्लीं ते मृत्यु पावले गेले. त्यांचे पुत्र मंडलोई राव तेजकर्ण व कुवर न्याहालकर्ण हेही त्यांजप्रमाणें निष्ठेनें वर्ततात. ऐशीयास त्याप्रांतें प्रा॥ इंदूर बनीद आपली आहे. त्यांचेमागें त्यांचे पुत्राचें चालवावें हें उचित आहे, आणि आपले कामाचे गोष्ट आहे. यास्तव तुह्मांस हें पत्र लिहिलें असे. तरी मा॥रनिल्हेवरी हरएकविशीं साल मजकुरीं साल गुदस्तास रयात करून अगत्यवादें करून सर्वश्वें चालवणें, येविशीं आह्मा-सही अगत्य आहे. तुह्मी लक्ष प्रकारें यांजवरी सालगुदस्तांत खंडणीस रुपये पांच हजार सोडून बाकी साल मा॥रीं घेऊन रियात करणें. हरएक-विशीं आजार न देणें. माळवे प्रांतीं हे आपले कार्याचे माणूस आहेत. त्यांचें लिहिलेप्रमाणें चालवावयास अंतर न करणें. जाणिजे. छ ११ माहे जमादिलाखर [ ३०-११-१७३१, रा. श्री. वि. आठल्ये ]. असेंच पत्र याच तारखेचें राणोजी शिंदे यांस आहे.

६. **माळव्याची व्यवस्था**.—याप्रमाणें दयाबहादुरास बुडविल्याची बातमी आल्यावर बाजीराव लगेच नर्मदा उतरून माळव्यांत गेला ... तेथल्या वसुलाची व कारभाराची हळूहळू सर्व व्यवस्था त्यानें ... 'निमें स्वराज्याचा अंमल पेशव्यांचे मार्फत हुजूर सरकारांत या ... फौजेचा खर्च करून हिशेब समजाना. त्यांत खर्चाची नेमणूक करू ... ( नजराणा ) येईल ते हुजूर यावी ऐसे तह करून दिले. ' ... पृ-५१ ). शिंदे, होळकर व यशंवतराव पवार, या सर्वांशीं ... जो मुलूख सरकारांत येईल त्याचे हिस्से करून फौज जमा करू ... चालावें. हिस्से केले त्यांत शेंकडा ३१रु०सरकार ए ... रु३०एकहिस्ता, होळकर रु०३०एक हिस्सा, पवार ... करून फौजा ठेवून दिल्लीस जयसिंग राजासुद्धां जा ... विषयीं चाकरींत उणें फडों देऊं नये. ... ( का-सं-प-या.ले.४९५ ). या ठरावांत निरनिरा...

आहेत, तरी त्यांतील मूळ तत्त्व कायम आहे. पुढें या उत्पन्नाचे हिस्से थोडे निराळे झाले. म्हणजे मुख्य सरकार ४५, शिंदे २२॥, होळकर २२॥, व पवार १०; असे हिस्से ठरवून महालांचे वसूल सर्वांनीं मिळून करावे असें ठरलें. हे ठराव नक्की केव्हां झाले हें समजत नाहीं. स. १७२९ पासून १७३६चे दरम्यान पुनः पुनः वाटाघाट होऊन ते हळू हळू बनत गेले. पुढें नानासाहेब पेशव्यानें त्यांची कायम व्यवस्था लाविली, तिचाच अंमल नानाफडणीसापर्यंत पुढें होत असे.

माळव्याच्या व उत्तर हिंदुस्थानांतील स्वाऱ्यांत आरंभीं ज्या सरदारांनीं कामें केलीं, त्यांपैकीं एका मोठ्या सरदाराचें स्मारक तिकडे कांहींच राहिलेलें नाहीं. तो सरदार पिलाजी जाधव होय. माळव्याच्या पहिल्या कारस्थानांत पिलाजी जाधवही होता असें खं. ६ ले. १७ वरून दिसतें. या पत्राचा काळ १७२३ दिलेला आहे, तो १७२८ अगर त्या पुढचा असावा असें भासतें. स. १७२३ हेंच साल धरल्यास मा- कारस्थान स. १७२३ किंवा त्यापूर्वीं पिलाजीनें घडविलें असें ागेल. पिलाजी जाधव चिमाजीआपास लिहितो, ' सवाईजी ामल्ल आले. विक्रमजितही आज भेटीस येणार. महादेवभट देह्लीहून आला. पादशाही फर्मान, हत्ती व घोडे दोन जडाव . वजिराचा मुनशी विश्वनाथ आला आहे. बोलीचालीचा . वोडसें, दतिया, वगैरे अवघे वकील जमा झाले आहेत. दीची यात्रा करून मार्गशीर्ष शु॥ १ स्वार होऊन याल तों- आहों. '

ऱ्या करून एक एक प्रांत जिंकावयाचा, नंतर त्यांतून हक्क वसूल करावयाचे, आणि असा क्रम कांहीं चौथाईच्या सनदा बादशहाकडून राजरोस मागा- उद्योगाचा क्रम प्रथम दक्षणच्या सहा सुभांवर,

नंतर गुजराथेंत, व पुढें माळव्यांत उघडकीस येतो. याच क्रमानें पुढें ते दिल्लीवर व पुढें पंजाबांतही गेले. तो भाग सांगण्यापूर्वी प्रथम होळकर शिंदे व पवार ह्या घराण्यांच्या पूर्वपीठिका येथेंच देणें जरूर आहे.

७. **मल्हारराव होळकर.**—( १६-३-१६९३–१-५-१७६५ ) होळकरांचें घराणें महाराष्ट्रांत पुष्कळ ठिकाणीं पसरलेलें आहे. इंदूरच्या राजघराण्याचे पूर्वज प्रथम वाफगांवीं राहत असून, नंतर ते फलटण परगण्यांत पुण्यापासून ४० मैलांवर नीरा नदीचे कांठीं होळ ह्मणून एक खेडें आहे तेथें आले. त्यांचें पाहिलें, नांव वीरकर असून, पुढें होळ या गांवावरून होळकर असें पडलें. होळ येथें खंडूजी नांवाचा धनगर जातीचा एक वजनदार चौगुला म्हणजे ग्रामाधिकारी राहत होता. त्यास एक मुलगा चैत्र शु ९ संवत् १७५०, ता.१५।१६ मार्च १६९३ रोजीं झाला. त्याचें नांव मल्हारि. तो तीन वर्षांचा असतांच खंडूजी वारला; तेव्हां भाईबंदांनीं त्रास दिल्यामुळें खंडूजीची बायको जिवाई ही मुलास घेऊन खानदेशांत तळोदे गांवीं आपला भाऊ भोजराज [illegible] चौगुला याजकडे गेली. हा भोजराज कंठाजी कदम बांडे याच पंचवीस स्वारांचा मुख्य होता. 'शिवजीसुत भोजराज बारगळ अ[illegible] शिकर्यांत नांव आहे. मल्हारी हा भोजराजाचे घरीं वाढला. त्य[illegible] राजानें आपल्या पथकांत नोकरी दिली; आणि त्याची हुशारी [illegible] त्यास आपली मुलगी गौतमाबाई ही देऊन त्याचें लग्न केलें. [illegible] लहान लढायांत शौर्याचीं कामें केल्यावरून तो लवकरच प्रसि[illegible] मराठ्यांचें व निजामाचें सन १७२० त युध्द झालें त्यां[illegible] चांगलाच पराक्रम केला. कदम बांडे व बाजीराव यां[illegible] कलागत लागली असतां,ती मल्हाररावानें मिटवि[illegible] रावानें त्यास बांड्यापासून १७२० च्या पुढें [illegible] तेव्हांपासून त्याच्या भाग्योदयास प्रारंभ झाला.

रावानें त्यास ५०० स्वारांची मनसब दिली. यापूर्वींच त्यानें माळव्यांत शिरून तिकडे मुलूख जिंकण्याचा उद्योग सुरू केला असून भोजराज बारगळही त्याजबरोबरच खपत होता. यापुढची मल्हाररावाची हकीकत पुढें ठिकठिकाणीं येईल.

८. राणोजी शिंदे ( मृत्यु जुलई १७४५ ).–प्राचीन कालीं सेंद्रक नांवाचें क्षत्रिय घराणें होतें, त्यावरून सिंदे हें आडनांव पडलें असावें. त्यांचीं कित्येक घराणीं बहामिनी राज्यांत उदयास आलीं. सातार्‍यापासून सहा कोशांवर कोरेगांव तालुक्यांत कण्हेरखेड म्हणून गांव आहे, तेथें एक शिंद्याचें घराणें पाटिलकी करून होतें. याच घराण्यांतील मुलगी सावित्रीबाई शाहूस दिलेली होती, ती दिल्ली येथें बादशहाचे कैदेंत वारली, ( पृ. १२ पहा ). तिचा बाप औरंगजेबाचे नोकरींत होता, तो बहुधा आग्रा येथें अजीमशहाच्या मदतीस असतां मारला गेला. त्याच्याच घराण्यांत राणोजी सिंदे हा पुढें प्रसिद्धीस आला. घरची गरिबी असल्या- ...ं प्रथम बाळाजी विश्वनाथाच्या पागेंत बारगिराची नोकरी पत्क- ...करच त्याजवर पेशव्याची मर्जी बसली. राणोजी शिंदे, उदाजी ...ल्हारराव होळकर हे आरंभीं बाजीरावाबरोबर खेळगडी म्हणून ...जामावरील वगैरे मोहिमांत राणोजीची निष्ठा व शौर्य वगैरे ... बाजीरावानें त्यास इतर सरदारांबरोबर माळवा व हिंदुस्थान ...गिरीवर पाठविलें. तिकडे पराक्रम करून तो लवकर उदयास ... सरदारांच्या अनेक आख्यायिका प्रसिद्ध आहेत; परंतु त्यांतील ... निश्चित नसल्यामुळें त्या येथें सांगण्याची जरूर नाहीं. ... उभयतां सरदार सलाबतीचे दिवसें दिवस आक्रम... ब., रा. खं. ४ ), या वाक्यांत तत्कालीन समज ...हे. राणोजी अत्यंत स्पष्टवक्ता व धन्याची भीड- ... अशाप्रकारचें एक पत्र त्याचें पाहण्यालायक

आहे. ( पहा. इ. सं. ऐ. टि. भा. २ ले. ३५ ). पुण्याजवळच्या अनेक भानगडींत व गांवकीच्या कारभारांत राणोजीचें प्राधान्य अतोनात होतें, ही गोष्ट पुरंदरे रोजनिशींतील अनेक उल्लेखांवरून व्यक्त होते. शिंद्यांचे घराण्याचा मराठशाहीच्या पुढील इतिहासाशीं अत्यंत निकट संबंध आहे; इतकेंच नव्हे तर पाऊण शतकाचा मराठ्यांचा इतिहास ह्या एका घराण्यानें बनविलेला आहे, असें म्हणण्यास चिंता नाहीं. नुसती या घराण्याची वंशावळ नजरेखालीं घातली तरी राष्ट्रकार्यांत जीव देणाऱ्या पुरुषांची एवढी मोठी संख्या पाहून मन चकित होतें. हा प्रकार उत्तरोत्तर व्यक्त होईलच.

९. **उदाजी पवार.**—ह्या घराण्याची हकीकत पुढें स्वतंत्र देण्यांत येईल. उदाजीनें स. १७२४ त धार येथें आपलें ठाणें बसाविलें. माळवा व गुजराथ ह्या ठिकाणीं आरंभीं मराठ्यांचा जम बसविणारा मुख्य इसम उदाजी होय. याची साक्ष शाहूनें त्यास ठरवून दिलेला खालील तह पहावा.

"तहनामा राजश्री उदाजी पवार सु॥ सबाअशरीन मया व आ　　तह प्रांत गुजराथ व माळवा.

१ प्रांत मजकूरची चौथाई व सरदेशमुखीचा अखत्यावर सर्व दिल्हा असे. हुजरून रा. बाजीभीवराव तुम्हांसमागमें दिल्हे आहे रोखा, कुच, मुक्काम त्यांचा; परंतु जें करणें तें तुमच्या अ रावें. मुलखीं तह रह त्यांनीं तुम्हीं करावा. तुम्हां खेरीज त्यांस चार करावयास प्रयोजन नाहीं. अखत्यार तुम्हांवर. कलम १

२ प्रांत मजकुरीं जो आकार जमा होईल त्यांत सरदेश चौथाई शिरस्तेप्रमाणें काढावी. उरला ऐवज प्रमाणें घ्यावा. शिबंदी, तोफखाना व भांडियांचा ऐवजावरी मोघम काढून, उरला ऐवज गणतीप्र मोकाशी कोणही न म्हणावा. सारेजमेचा तह येणें

३ दिवाण रु० एक लक्ष बाबती सरदेशमुखीच्या ऐवजीं आधीं वारावें.

४ फौज हुजरून येईल त्यास दामाशाही ज्यास्ती आधीं दिवाणाचा ऐवज वारावा. उरेल ऐवज त्याची दामाशाही द्यावी व तुम्हीं घ्यावी.

५ जेथें मुकाशाचीं ठाणीं बसलीं असतील तेथें बाबती व सरदेशमुखी काढून उरला ऐवज ठाण्यांचे बेगमीस द्यावा.

६ चौथाई व सरदेशमुखी दिवाणाचा ऐवज काढावा, त्यांत राजश्रीचें देणें वारून बाकी ऐवज राहील त्यापैकीं एक तक्षीम तुम्हांस सरदारीस दिल्हा. घेणें. दोन तक्षिमा आमचे सरदारीस द्यावे. कलम १

हीं कलमें सारीं लिहिलीं आहेत. येणेंप्रमाणें वर्तावें. पैका कदाचित् थोडा मिळाला तरी आधीं दिवाण वारावें. उरेल तें सर्वांनीं समजावें. दिवाणाचा ऐवज नये तोंवरी रुपये कोणीं शिबंदी व रोजमरा व दारूगोळा-शिवाय घेऊं नये." (रा. श्री. वि. आठल्ये यांनीं घेतलेल्या नकलेवरून.)

कांहीं काळानें बाजीरावाचें व उदाजीचें वांकडें येऊन, पेशव्यानें [illegible] ाऊ आनंदराव यास धारेस नेमून उदाजीस कैदेंत ठेविलें. ही १७२८ त घडली असावी; कारण स. १७२९ ता. १ नोव्हें-लील पत्र बाजीरावानें आनंदरावास लिहिलेलें आहे.

आनंदराव पवार गोसावी यांस. स्ने० बाजीराव बल्लाळ प्रधान सु॥ सल्लासीन मया व आलफ. तुम्हांकडे हवालिया बाबत ्या रुपायांविशीं तुम्हांस लिहिलें होतें. त्यास रुपये पाठवितों उत्तरही आलें. त्यावरून त्याऐवजीं तुम्हांकडे गावड्याची यांच्या निसबतीच्या लोकांची चिठी पाठविली. हे गोष्ट ी. हवाल्याबाबद सावकारी निशेचे रुपये तुम्हांकडे. ीचा धंदा; पवार प्रामणिक, एकवचनी, वचनाचे ाव हवाला घेतला. त्यास मुदती अगोदर माणसें ाही न केलें. तुमची मुदतही जाहली असतां,

तुह्मीं माणसें फिरावलींत. येणेंकरून तुमचे पतीस शब्द लागला. आमचाही इतबार त्या लोकांजवळ गेला. ऐशियास वचनास व पतीस अंतर केल्यानें पुढें तरी पत कशी राहील ? तो ऐवज त्यांस पावला पाहिजे, यास्तव तुह्मांकडे मुजरद माणसें पाठविलीं आहेत. तरी पत्र पावेल ते क्षणीं त्यांचे पदरीं ऐवज घालणें. ऐवज त्यांच्या पदरीं घातल्याविना भोजन कराल तरी आमची आण असे ! बिलाकसूर, पत्र पावतांच हवाल्याबाबत रुपये त्यांचे पदरीं घालून पावलियाचें कबेज घेऊन पाठविणें. जाणिजे. छ २० रबि· लाखर लेखनसीमा. [ रा. श्री. वि. आठल्ये यांजकडून धारदप्तर पैकीं. ]
उदाजीचा शेवट कसा झाला तें कळत नाहीं.आनंदराव पवार स. १७३६ चे सुमारास मरण पावला. कारण बाजीराव पेशव्यानें माळवाप्रांतांतील देशमुख देशपांड्यांस ता. ६ ऑगस्ट स. १७३६ चें आज्ञापत्र काढिलें, त्यांत खालील मजकूर आहे. ' परगणे मजकूरच्या मुकासा देखील बाबती व सरदेशमुखी व जकात आनंदराव पवार यांस होता त्यास [illegible] पावले, याजकरितां त्यांचे पुत्र रा. यशवंतराव पवार दि॥ चिमणा[illegible] यांस साल मजकूर मुकासा देखील बाबती व सरदेशमुखी दिल्हा असे. जाणिजे. छ ९ रविलाखर सबा सलासीन आलफ. आज्ञाप्रमाण.' यशवंतराव पवार हा पुढें मोठा नाणेद[illegible] त्याचें वर्णन येणेंप्रमाणें आढळतें. ' तो शरीरानें काट[illegible] असून त्याचे डोळे फार मोठे होते. त्याची मुद्रा क्रूर व [illegible] होती. त्याचा थाट राजासारखा असून तो कधीं कोणाई[illegible] नसे. अपमान यत्किंचित् सहन करणारा तो नसून त्या[illegible] होता. एका अपमान करणाऱ्या हुजऱ्यास त्यानें [illegible] पेशव्यांच्या घरचे नोकरही त्यास थरथर कांपत. ' [[illegible]

---

१ रा. श्री. वि. आठल्ये यांजकडून असेंच [illegible] तील मिळालें त्यांत आनंदरावाचें मृत्यूचा काळ [illegible]

**१०. छत्रसालास मदत, महंमदखान बंगशचा पाडाव (१७२९).**– मराठ्यांचें व रजपुतांचें ऐक्य होऊन माळवा प्रांत बादशहाचे हातचा गेला, आणि पुढें मराठे दिल्लीच्या बाजूस चाल करूं लागले, हा प्रकार पाहून दिल्लीचे दरबारांत मोठी धास्ती उत्पन्न झाली. रजपूत राजे उघडपणें मराठ्यांस सामील होऊन बादशाही बुडवूं लागले. बुंदेलखंडाचा राजा छत्रसाल प्रबळ होऊन त्यानें पन्ना येथें राजधानी करून आपल्या राज्याची वृद्धि केली, त्याचें व मराठ्यांचें शिवाजीच्या वेळेपासूनच सख्य होतें. तेव्हां ह्या प्रकरणाचा जोरानें प्रतिकार न केल्यास मराठे दिल्लीसुद्धां काबीज करण्यास चुकणार नाहींत, अशी आणीबाणीची वेळ आलेली पाहून, बादशहानें अलाहाबादचा सुभेदार महंमदखान बंगश पठाण हा पराक्रमी पुरुष होता, त्यास माळव्याचे मदतीस नेमून, मराठे व छत्रसाल व इतर रजपूत राजे यांचें पारिपत्य करण्याचा त्यास हुकूम दिला. छत्रसालाची हकीकत मुसलमानी रियासतींत दिली आहे ( पृ. ६९६ ), यं संदर्भ घेतला पाहिजे.

…खान बंगश गझन फर्जंग हा अफगाणिस्तानांत कोहत …बंगश खोऱ्यांतला राहणारा पठाण असून, त्याचा बाप औरंग…ठस हिंदुस्तानांत आला. महंमदखानानें बादशाही फौजेंत …न नशीब काढिलें. तो गंगेच्या कांठीं शम्शाबाद परगण्यांत …त असून पांच चार हजार अफगाण लोक नोकरीस ठेवून, …ास मदत करीत असे. फर्रुखसेयरच्या कारकीर्दींत

---

… पराक्रम–बुंदेलखंड प्रकरण, पारसनीसकृत, बुंदेल्यांची …The Bangash Nawabs of Farrukha…e, and Pogson's Bundellas हीं दोन …ल तर चांगलें.

सय्यदांस मदत केल्यानें त्यास मोठमोठया जहागिरी मिळाल्या. त्यानें बादशहाच्या नांवानें फरुखाबाद शहर स्थापून तेथें वास्तव्य केलें. फरुखाबादच्या नबाबांस बंगश नबाब ह्मणतात. हे पठाण व दुसरे रोहिले उत्तर हिंदुस्थानांत मराठयांचे नेहमींचेच शत्रु होते, ही गोष्ट पुढील इतिहासांत ध्यानांत ठेविली पाहिजे. महंमदखान पुढें सय्यदांचे विरुद्ध उठला; आणि त्यांचा पाडाव झाल्यावर सन १७२१ त महंमदशहानें त्यास अलाहाबादची सुभेदारी दिली. त्या योगानें बुंदेलखंड, आग्रा व अलाहाबाद या टापूंत त्याचा संचार सुरू झाला, आणि बुंदेलखंडचा छत्रसाल व इतर रजपुतांस जिंकण्याचा उद्योग त्यानें सुरू केला. त्यास मिळालेल्या जहागिरी बुंदेलखंडांत असल्यामुळें लढून अंमल बसविल्याशिवाय त्याचें चालण्याजोगें नव्हतें. हा अंमल बसवितांना त्याचा मुलगा पीरखान यास बुंदेल्यांनीं ठार मारून त्याच्या फौजेचा फडशा उडविला, तेव्हां महंमदखानानें आपला मुलगा काईमखान व सरदार दलेलखान यांस बुंदेल्यांवर पाठविलें. छत्रसालानें त्यांचाही प[...] करून दलेलखानास ठार मारिलें. तेव्हां महंमदखान बंगश [...] मोठया तयारीनिशीं बुंदेलखंडांत शिरला. दिल्लीचा बादशहा [...] वजीर खानडौरान यांनीं त्यास भरपूर मदत दिली. माळवा व [...] ह्या दोहोंच्या मध्यें असलेल्या बुंदेले राजांस आपण सहज [...] अशी त्याची भावना होती. त्यावरून छत्रसाल व त्याचे तिघे [...] व महंमदखानाचें निकराचें युद्ध चालू झालें. बंगशची फ[...] खंबीर असल्यामुळें बुंदेल्यांची पीछेहाट होऊं लागली. [...] जैतपुर नजीक मोठी निकराची लढाई झाली. वृद्ध [...] असतां घायाळ झाला, तेव्हां त्याचे लोक पराभव [...]

या गोष्टींचा काळ दिलेला नाहीं. तत्रापि हें [...]

---

( १ रीवाच्या दक्षिणेस सुमारें २० मैल. )

कारण याच वेळीं बाजीराव फौजेनिशीं माळव्यावर चाललेला असल्यामुळें त्यास छत्रसालानें या अडचणींत मोठ्या विनवणीचें पत्र पाठवून आपल्या मदतीस बोलाविलें. त्याबरोबर बाजीराव स. १७२९ च्या फेब्रुवारींत माळव्यांतून बंगशावर चालून गेला. माळव्यांत लष्कर होतें तें आपल्या स्वाधीन करून घेऊन, चिमाजीआपास परत पाठवून कोंकण प्रांतातील बंदोबस्त त्यास सांगून बाजीरावानें ता. १३ मार्च १७२९ रोजीं मु॥ धामोरा नजीक मोहळ येथें छत्रसालाची भेट घेतली. नंतर उभयतां बंगशावर निघाले. ३० मार्च रोजीं जैतपुर मुक्कामीं लढाई होऊन त्यास बाजीरावानें बुंदेलखंडांतून पार घालवून दिलें. या उपकाराबद्दल छत्रसालानें प्रथम एक किल्ला व झांशी नजीक दोन अडीच लक्षांचा मुलूख बाजीरावास दिला. त्या सालच्या जून पावेतों बाजीरावाचा मुक्काम त्या बाजूस होता. पुढें स. १७३३त छत्रसाल मरण पावला, त्या वेळीं आपले दोन पुत्र हिरदेसा व जगत्‌राज आणि बाजीराव तिसरा असें समजून त्यानें राज्याचा तिसरा [illegible]ग बाजीरावास दिला. या वेळीं मिळालेल्या प्रांताच्या व्यवस्थेकरितां [illegible]नें गोविंद बल्लाळ खेर यांची नेमणूक केली. ( स. १७३३-३४).

[illegible]राव व बंगश यांची जैतपूर येथें झालेली लढाई ता. ३० मार्च [illegible]पासून पुढें कित्येक दिवस निकरानें चालू होती. तिचें वर्णन [illegible]च्या बुंदेलखंड प्रकरणांत पाहवें. महंमदखानाच्या मदतीस [illegible]चा मुलगा कायमखान हा आणखी फौज घेऊन आला. [illegible]तगडचा किल्ला मजबूद होता, त्यास मराठ्यांनीं वेढा [illegible]व होळकर, विठ्ठल शिवदेव विंचुरकर, पिलाजी जाधव, [illegible] हे सरदार बाजीरावाचे हाताखालीं होते. स्वतः [illegible]सर्व हुकमत चालवीत सारखा फिरत होता. किल्ल्यां-[illegible]नांनीं गुरें सुद्धां कापून खाल्लीं. शेवटीं महंमदखान [illegible]ठ्यांचे हातीं आला. ( ३० एप्रिल स. १७२९).

नंतर छत्रसालानें बाजीरावास पन्ना येथें आपल्या राजधानींत नेऊन त्याचा मोठा गौरव केला. या लढाईचें वर्णन पिलाजी जाधवानें ता. ३० एप्रिल स. १७२९ च्या पत्रांत ( खं. ३ ते १४ ) इंदूरच्या आपल्या वकिलास लिहिलेलें आहे तें असें:—

' महंमदखान बंगश प्रयागचा सुभा छत्रसाल राजस्थान, बुंदेलखंड, यांजवर मसलत करोन चालोन आला होता.त्यास आम्ही व ते (छत्रसाल) एकत्र होऊन वेढा घालून बसलों होतों. इतक्यांत बंगसाचा लेक कायमखां तीस हजार फौजेनिशीं छ ९ रोजीं आम्हांवर चालून आला. त्याशीं लढाई झाली. ईश्वर इच्छेनें फौजेनिशीं हा बुडविला. तीन हजार घोडे व तेरा हत्ती पाडाव केले. अंताजी माणकेश्वर व दावलजी सोमवंशी सर-लष्कर यांजकडे दोन हत्ती आले. वरकड आमच्या लष्करांतील सुखरूप आहेत. झुंजांत ठार झाले त्यांची यादी लिहिली आहे, त्याप्रमाणें ज्याच्या त्याच्या घरीं वर्तमान पावतें करणें. आम्हीही मजल दर मजल येतों. '

बाजीराव छत्रसालाच्या मदतीस धांवून गेला या प्रकरणास गजेंद्र मोक्षाची उपमा देऊन लोकप्रवादानें ऐतिहासिक संगतीचा लोप केला आहे. मागें सां-तलेंच आहे कीं, राजा गिरिधर व दयाबहादूर यांस मारून, मराठे व रजपुतांनीं धर्माच्या नांवाखालीं एकमतानें बादशाहीवर युद्ध पुकारलें होतें. माळवा,बुंदेलखंड, रजपुताना वगैरे ठिकाणचे बहुतेक प्रमुख रजपू[illegible] कटांत सामील असून, मल्हारराव होळकराचे मार्फत बाजीरावानें [illegible] अंगीकार केला होता. कदाचित शाहूच्या नजरेस हा प्रका[illegible] आल्यास, बादशहाशीं युद्ध करण्यास त्याचें अनुमोदन [illegible] म्हणून या, केवळ हक्क वसूल करण्याच्या स्वाऱ्या आ[illegible] रावानें भासविलें असावें, आणि त्याचकरितां तो [illegible] ण्यांत आला नसे[illegible]. शिवाय, याच वेळेस कोंक[illegible]

टीप.१ —आठल्ये यांनीं प्रथमालेंत दुरुस्त केलला

उच्छेद होऊन, जंजिऱ्याचे हबशावर मोहीम ठरत होती, सबब बाजीरावास मोठ्या फौजेनिशीं दूर पाठविण्यास शाहू उत्सुक नव्हता. म्हणूनच बाजीरावानें माळव्यांत आपण फौजेचें आधिपत्य स्वीकारून, चिमाजीस ताबडतोबीनें साताऱ्यास पाठविलें. शाहूस दूर दूरच्या प्रांतांतील राजकारणें व परिस्थिति कळत नव्हती. असें विधान मागें केलें आहे. त्याचा प्रत्यय या छत्रसालाचे उदाहरणांत चांगला येतो. हिंदुपदपातशाहीची बाजीरावाची भावना ठाम झालेली होती. आणि तदनुरूप त्याचा वर्तनक्रम होता. सवाई जयसिंग व प्रमुख रजपूत राजे, अंतर्यामीं बाजीरावास अनुकूल होते. अर्थात् जैतपूरची लढाई व छत्रसालास मदत, या गोष्टी एका मुख्य प्रकरणाचीं अंगें होत.

बुंदेलखंडाचा राजा छत्रसाल स. १७३३ त वारला, तेव्हां त्यानें आपल्या राज्याचे तीन हिस्से करून ते आपले दोन मुलगे जगत्राज व हिरदेसा, आणि बाजीराव यांस वांटून दिले. बाजीरावानें येऊन आपला बचाव केला हा उपकार तर खराच, परंतु सभोंवार शत्रू असून पुढेंही बाजीरावामार्फत प्रबळ मराठ्यांची मदत आपल्या मुलांस कायमची असावी, अशा हेतूनें हा राज्यांचा हिस्सा म्हणजे आपल्या बचावी किंमत छत्रसालानें बाजीरावास दिली. बाजीरावाची त्याजबद्दल मागणी होती, [illegible]ाजीरावाचे हातांत जोर असल्यामुळें नाहीं देत म्हणण्याचेही [illegible]बुंदेल्यांत नव्हतें. सारांश, स. १७३३ च्या सुमारास ३३ लक्ष [illegible]लूख बुंदेलखंडांत बाजीरावास मिळाला, त्यांत काल्पी, हटा, [illegible]ो, शिरोंज, कुंच, गढकोटा आणि हरदेनगर वगैरे प्रांत होते. [illegible] बाजीरावाशीं तह झाला त्यांत छत्रसालाचे दोन मुलगे व [illegible] प्रमाणें वागून नेहमीं एकमेकांस मदत करावी असा [illegible].बाजीरावानें व त्याच्या सरदारांनीं पुढें आग्रा, दिल्ली, [illegible] केल्या, त्यांत या बुंदेलखंडांतील प्रदेशाचा त्यांस

चांगला उपयोग झाला.कारण,या ठिकाणीं आपलें मुख्य ठाणें ठेवून पुढील उद्योग तेथून वाढविण्याची त्यांस सोय झाली. माळव्याच्या पुढेंच हा प्रदेश असल्यामुळें त्या प्रांतावरही मराठ्यांचा शह चांगला बसला. बाजीरावानें बुंदेलखंडांत:कायमचें ठाणें दिलें, व बुंदेले रजपुतांशीं तह जोडून बादशाहीच्या नाशाची जोराची तयारी केली, या गोष्टींनीं दहशत पडून अयोध्येचा सादतखान, महंमदखान बंगश वगैरे सरदारांनीं मोठें कारस्थान रचून, स.१७३७त बाजीरावाच्या नाशाकरितां त्याजवर मोठी स्वारी केली, पण त्यांचा त्यावेळीं साफ परामव झाला; आणि पुनः ते बाजीरावास त्रास देऊं शकले नाहींत. बुंदेलखंडांतील या नवीन प्रदेशाच्या व्यवस्थेकरिता आपल्या पदरचा गोविंद बल्लाळ खेर नांवाचा एक गृहस्थ तेथें नेमिला, तोच गोविंदपंत बुंदेले या नांवानें पुढें प्रसिद्धीस आला. उत्तरेकडील मराठ्यांच्या पुढील कारस्थानांत या गोविंदपंताचें अंग विशेष आहे. खास पेशव्यांचे मालकीची सर्वांत जुनी जहागीर ही बुंदेलखंडची होय.

११. **गोविंदपंत बुंदेले.**—गोविंदपंताचें मूळ गांव रत्नागिरीजवळचें नेवरें हें होय. गोविंदपंत १३।१४ वर्षांचा असतां त्याचा बाप बाळाजीपंत वारला, आणि नेवऱ्याच्या कुळकर्णाची व्यवस्था त्याजकडे आली. तो हूड व खेळाडू असल्यामुळें त्याच्या हातून ही व्यवस्था न होतां भाईबंदांनीं त्यास सर्वस्वीं नागविलें. तेव्हां बर्वे वगैरेंचें उदाहरण पाहून, गोविंदपंत कोंकण सोडून देशावर आला. नोकरीसाठीं हिंडतांना त्यानें बाजीरावापाशीं शागीर्दाची जागा पत्करिली. तेव्हां त्याचे अंगचे गुण बाजीरावाचे नजरेस येऊन स.१७३३ त बुंदेलखंडाचा जो भाग त्यास प्राप्त झाला, त्याची व्यवस्था पाहण्यास बाजीरावानें गोविंदपंताची नेमणूक केली.

---

टीप १–गोविंदपंताची पूर्वपीठिका पारसनीसकृत बुंदेलखंड प्रकरणांतून घेतली आहे. शिवाय बुंदेल्यांची व सागरची कैफियत हीं दोन प्रकरणें भा. व. पु. १ लें. यांत आहेत.

शौर्यानें व धूर्ततेनें वागून उत्तरेंत गोविंदपंतानें आपला जम चांगला बसविला आणि लवकरच मराठे सरदारांमध्यें त्याची गणना प्रमुखपणें होऊं लागली. हळू हळू त्यानें नवीन किल्ले बांधिले, आणि नवीन ठाणीं हस्तगत केलीं. कुरईच्या नबाबाकडून त्यानें कांहीं प्रांत हस्तगत केला, त्यांत सागर ह्मणून एक प्रचंड तलाव होता. या तलावाच्या कांठीं ' सागर ' नांवाचें नवीन शहर वसवून तेथें गोविंदपंतानें आपलें वास्तव्य कायम केलें. सागरची स्थापना स. १७३६-३७ चे सुमारास झाली असावी. यापुढील बुंदेलखंड प्रकरणाची हकीकत नानासाहेब पेशव्याचे वेळेस येईल. गोविंदपंताचे घराण्याची वंशावळ. ( पारसनीस कृत बुं. प्र. )

गोविंदपंत
|
बाळाजी
|
(१७३१ -६१) गोविंदपंत द०
|
१७६१-१८०० बाळाजी १ | गंगाधर २ १७६१-१८०२
१८००-०२ रघुनाथराव आबासा. | गोविंदराव १८०२-२२
बळंतराव बाबासा. | बाळाजी १८२२-३२
रघुनाथराव | राव गोविंदराव १८३२-४२.
१ सागर घराणें. २ जालवण घराणें.

दुसरें घराणें नरसिंहपंत यांस मुलगे ६, गोविंद अंताजी, रामाजी, विठ्ठल, काशीपंत व बाबूराव; पैकीं गोविंदपंत दत्तक गेला.

बाबूराव
|
१७७४-१८३३ दिनकरराव अण्णा गुलसराई वंश
|
१८३३-१८८१ केशवराव राजेबहादूर

**१२. हातीं आलेल्या डावाची फसगत.**—माळवा व बुंदेलखंड या

ठिकाणाच्या मोहिमा स. १७२४पासून आठ नऊवर्षें सारख्या चालल्या होत्या. बाजीराव व चिमाजीआपा हे मुख्य असून, शिंदे, होळकर वगैरे सरदार पुढें जाऊन सर्व प्रकरणांची सिध्दता करीत असत. स्वतः बाजीराव नर्मदे-अलीकडे तळ देऊन, शिंदे होळकरांकडून मागणी येई, त्याप्रमाणें फौजेचा वगैरे पाठपुरावा करीत असे. दक्षिणेंत शाहूचें संधान राखून बाजीरावास या बाहेरच्या प्रकरणांची उस्तवारी करावी लागे. म्हणून एक बंधू दक्षिणें-तील कारस्थानांवर नजर ठेवून, दुसरा बाहेरच्या उद्योगास जाई. राजा-गिरिधर व दयाबहादुर यांचे पाडाव अनुक्रमें स. १७२६ व १७३१ सालीं चिमाजीआपानें केले. बंगशाचा पाडाव स. १७२९त बाजीरावानें केला. स. १७२६त कर्नाटकची मोहीम, २८ त निजामावरील पाल-खेडची मोहीम, ३०त संभाजीवरील मोहीम, ३१ त दाभाड्याचा पाडाव व संभाजीचा तह हे सर्व प्रकार ध्यानांत ठेवून माळवा बुंदेलखंडची संगति जुळविली पाहिजे. एकंदरींत स. १७३१च्या उन्हाळ्यांत चिमाजीआपा ग्वालेरीजवळ होता ( ब्र.स्वा. ले. ४४ ). स. १७३१च्या पावसाळ्यांत साताऱ्यास जेव्हां ह्या सर्व प्रकरणांची विल्हेवाट लावण्यांत आली, तेव्हांचा दरबारचा रंग, दहावर्षांपूर्वींच्या भावनेहून अगदीं वेगळा व अत्यंत आशा-जनक होता. बाळाजी विश्वनाथानें उपक्रमलेला कार्यभाग बाजीरावानें पुष्कळ तडीस नेल्यानें त्याची कर्तबगारी सिध्द होऊन, त्याचे हात पुढील उद्योगास सर्वस्वी मोकळे झाले. माळवा व बुंदेलखंड हा मुख्य पाया करून, तेथून बादशाहीची व्यवस्था लावण्याचें काम सुलभ झालें. यावरून बाजी-रावाच्या आयुष्यक्रमांत स. १७३१ हें साल मोठें क्रान्तिकारक समजलें पाहिजे. पुढें लवकरच हबशाची मोहीम ठरून, ती स. १७३३ त बाजीरा-वानें अंगावर घेतली. त्याच सालीं छत्रसाल वारला. आणि बुंदेलखंडचा तिसरा भाग बाजीरावाचे कबजांत आला. स. १७३०च्या सुमारास पिला-जी जाधवानें कांहीं आगळीक केल्यावरून, त्याचा सरंजाम काढून, तो

राणोजी शिंद्यास देण्यांत आला. परंतु पुनः लवकरच पिलाजीचा बंदोबस्त पहिल्यासारखा करून देण्यांत आला [ ६.४९ ] स.१७३०त नानासाहेबाचें लग्न भिकाजी नाईक रास्ते यांची कन्या गोपिकाबाई इच्याशीं झालें. त्यावेळीं त्याचें वयास आठ वर्षे नुकतीं पुरीं झालीं होतीं. वरील भानगडी उरकल्यावर बाजीरावानें स.१७३४चे आरंभीं हिंदुस्थानांत पहिली मोठी स्वारी केली.

लागोपाठ तीन सुभेदार मराठ्यांनीं बुडाविले, तेव्हां तेथच्या कारभारावर बादशहानें जयसिंगाची नेमणूक केली ( १७३२–३३ ). त्याचें व मराठ्यांचें सख्यच होतें. शिंदे, होळकर व पवार हे तीन मराठे सरदार माळव्यांत कायमचें ठाणें देऊन बसले होते. राणोजी शिंदे उज्जन येथें राहिला.होळकरानें व उदाजी पवारानें मांडवगड काबीज केला. (१७२९ अखेर. ) अशा स्थितींत माळव्यांतून मराठ्यांस घालवून देणें अशक्य होतें; आणि तसा प्रयत्नही जयसिंगानें केला नाहीं. उलट मराठ्यांसच माळव्याची सुभेगिरी द्यावी, अशी जयसिंगानें बादशहाकडे खटपट चालविली. जयसिंगाची मनधरणी करून त्याचा स्नेह राखावा, मांडवडगसुद्धां पाहिजे तर त्यास द्यावा, असें शाहूनें चिमाजीआपा, होळकर व पवार यांस मुद्दाम लिहून पाठविलें. (रोजनिशी ले. १९८–ता.१९-३–१७३०) या वेळीं बाजीराव शाहूजवळ होता. मराठ्यांस माळव्याची सुभेगिरी देण्याची ही युक्ति दिल्लीच्या दरबारांत पसंत पडली नाहीं. जयसिंग मराठ्यांस सामील आहे अशी त्याजबद्दल दरबारांत शंका येत होती. मराठ्यांस सुभेगिरी मिळावी अशी खटपट दरबारांत मराठ्यांचा वकील महादेवभट हिंगणे करीत होता.सुभेगिरीच्या सनदा व खर्चाचा पैसा, बादशहाकडून मिळविण्याबद्दल हिंगण्याची खटपट कशी चालली होती हें खं. ६ ले. ९५–९७ वरून दिसून येते. हें लेखांक म्हणजे स.१७३४च्या जुलैत राणोजी शिंद्यानें हिंगण्यास लिहिलेलीं पत्रें आहेत. बाजीराव यापूर्वीं नुक-

ताच माळव्यांत येऊन पुढील धोरण व एकंदर व्यवस्था आपल्या सरदारांस सांगून परत गेला होता. नुसती जरब दाखवून कार्यभाग साधण्याचा उद्योग चालला होता. मराठयांची यावेळीं एवढीं सरशी व सामर्थ्य होतें कीं, शाहूनें व इतर सरदारांनीं बाजीरावास योग्य पाठबळ दिलें असतें तर स. १७३४-३५ त बाजीरावानें बिनदिक्कत दिल्लीचा पाडाव करून, तेथें हिंदूपदपादशाही अनायासें स्थापन केली असती. रजपुतराजेही त्यास अनुकूल होते; आणि त्यास अनुकूल करण्याचे प्रयत्न बाजीरावाचें सारखे चालू होते. ( राज० २०१-२०२-२०३ ), परंतु शाहू व सातारचे दरबारकडून बाजीरावाचा पाठपुरावा झालेला दिसत नाहीं. त्यास कर्ज होतें. सातारचें मुत्सद्दीमंडळ जाग्यावर बसून बाहेरचें राजकारण व परिस्थिति न समजून घेतां हुकूम सोडीत होतें. आंगऱ्याचे गृहकलह, मिरजेची स्वारी, असल्या शुष्क बाबतींत सातारचे चालक दरबार दंग होते, तर होळकर, शिंदे, पवार, पिलाजी जाधव इत्यादि योद्धे मंडळी व हिंगणे वगैरे वकील कसून उद्योग करीत होते. तथापि या वेळच्या एकंदर राजकारणावर चांगला उजेड पडेल अशी माहिती उपलब्ध नसल्यानें व्यक्तीच्या गुणदोषांसंबंधीं निश्चयात्मक मत बनवितां येत नाहीं. वर सांगितलेल्या शिंद्यांचे पत्रावरून त्यांच्या उत्साहाची कल्पना होते. 'आम्ही व मल्हारबा, व पवारत्रिवर्ग ( यशवंतराव, जिवाजी व उदाजी ) फौजेनिशी राहिलों. तमाम गिरासियांचा बंदोबस्त केला. पठारीस ठाणें बसविलें, लालगडवाला लुटिला; चोर (मुसलमान अंमलदार? ) देशांतरात गेले. रयतीस कौल दिल्हा. प्रस्तुत आम्ही परगण्यांत आहों, करारप्रमाणें सनदा, खर्च व सुभ्याची सनद या सर्व गोष्टी करून देतील तरी सत्वरीं करणें, नाहीं तरी उठोन येणें. हा कालवरी पादशाहींत चाकरींत आहों. पादशाहीमध्यें खबर आहे कीं नाहीं न कळे, जरी बनत नसलें तरी सांगावें. नाहीं तरी त्यास सांगून प्रयोजन काय आहे ! ' ' याददास्तीप्रमाणें फर्मान करार झाला. तूर्त एक लाख

रुपये दिले. वरकड पुढें देणार म्हणोन पत्र पाठविलें तें पावलें, ऐशास दोन महिने झाले. त्यांस इतबार अजून न येच. ( बादशहांस आमचा भरंवसा अजून येत नाहीं. ) धातुपोषणच करतात ( थापा देऊन दिवस काढतात.) असला सलूख काय कामाचा ! अवघा बोलीप्रमाणें घेणें. पुढें फौजाही जमा होतील. मोठें एखादें पादशाही कामकाज अवघे मिळोन तडीस नेल्यानें सर्व गोष्टी अमलांत येतील.' अशा प्रकारें शिंदे, होळकर, पवारांनीं बादशाहीचे हातपाय आंखडीत आणिले होते. वेळ फुकट न दवडतां, नेटानें त्याच वेळेस उद्योग झाला असता तर, बाळाजी विश्वनाथाच्या योजनेप्रमाणें, उत्तरेंत मराठ्यांची सत्ता कायमची स्थापन होऊन, पुढें नादीरशहा, अहमदशहा अब्दाली व पानिपत इत्यादिकांचीं प्रकरणें उपस्थित न होतां, पुढील ईतिहासाचा ओघ बदलला असता. असा हा यावेळीं उत्कृष्ट योग मराठ्यांस आलेला होता. परतु तो सातारा राजधानींतील अनास्थेमुळें फुकट गेला. मुसलमानास तीन चार वर्षें अवकाश मिळून निजाम, दिल्लीदरबार, सादतखान वगैरे मडंळींनीं मराठ्यांविरुध्द मोठें कारस्थान रचिलें. तें परिपक्क होण्यास मुसलमानांस भरपूर संधि व साधनें मिळालीं. त्याचेंच निरसन करण्यासाठीं बाजीराव निजामाचा भोपाळ येथें सामना उद्भवला. पुढें नादीरशहाची लाट आली, बाजीराव अस्तंगत झाला, आणि सन १७३४त हस्तगत झालेल्या माळवा प्रांताची सनद पुढें सात वर्षांनीं, म्हणजे स. १७४१च्या जून माहिन्यांत, नानासाहेब पेशव्यास जयसिंगाचे मार्फत मोठ्या मिनतवारानें मिळवावी लागली. एकंदरींत या सात वर्षांत मराठ्यांच्या राज्यकारस्थानाची मोठी हानि झाली, असें एकंदर ऐतिहासिक ओघावरून उघड होतें. या सबंधांत बाजीरावाचा उद्योग कां लंगडा पडला, याची खात्रीलायक स्पष्टता होऊं शकत नाहीं. मराठ्यांनीं माळव्यांत कारभार केला, त्यासंबंधानें माल्कमनें आदरोद्गार काढिले आहेत. मोगलाईंतील पडल्या

कारभारापेक्षां मराठयांचा माळव्यांतील कारभार लोकांस फारच मृदु व संतोषकारक वाटला. बाजीरावानें पुढील राज्यविस्ताराचा पाया माळव्यांत घातला. माळव्यांत राहून त्यानें बुंदेलखंड जिंकिलें, आणि उत्तरेकडच्या मुलखांतून वसूल घेण्याचा सपाटा चालविला. सारांश, प्रतिनिधीशीं वाद करतांना शाहूचे दरबारांत केलेली प्रतिज्ञा, बाजीरावानें खरी करून दाखविली. मरणापूर्वीं, एकंदर बादशाही मुलखांतून चौथाई वसूलगोळा करण्याचा हक्क त्यानें संपादन केला. या सर्व उद्योगाचें मुख्य श्रेय, शिंदे व होळकर या दोन सरदारांस आहे. हे दोन सरदार सर्व माहिती मिळवून, मसलती व घाट रचून, सर्व सिद्धता करीत, आणि बाजीरावाचें अनुमोदन घेऊन नंतर तो उद्योग सिद्धीस नेत.

## प्रकरण तेरावें.

### बाजीरावाची दिल्लीवर चढाई.

स. १७३४–४०.

१. वजीर खानडौरा व बाजीराव.
२. दिल्लीची चढाई ( फेब्रु०-एप्रिल १७३७ ).
३. भोपाळची लढाई, निजामाचा कोंडमारा
( जानेवारी १७३८ ).
४. कमरुद्दीनखानाचा पराभव ( डिसें. १७३९ ).
५. नादीरशहाची स्वारी ( फेब्रुवारी-एप्रिल १७३९ ),
६. या स्वारीच्या वेळची परिस्थिति.
७. नासिरजंगावरील स्वारी व बाजीरावाचा मृत्यु
[ स. १७४० ].

१. वजीर खानडौरा व बाजीराव:--स. १७३३ अखेरपावेतों दिल्लीकडील कारस्थानांत लक्ष घालण्यास बाजीरावास सवड आली नाहीं,

हें मागें सांगितलेंच आहे. स. १७३१ त दयाबहादुर पडल्यावर, माळ-व्याचा सुभा जयसिंगास मिळून, त्यानें बाजीरावाची त्या बाजूस चांगलीच सोय करून दिली. माळव्याचा कारभार बहुधा मराठेच करूं लागले; आणि उघडपणें माळव्याचा सुभा बाजीरावाचे हवालीं करावा, अशी दरबारांत खटपट चालू होती. वजीर खानडौरान वजिरीवर असून, मराठ्यांशीं सख्य ठेवून कार्यभाग उरकण्याचा त्याचा इरादा होता. परंतु, दरबारांतील दुसऱ्या अनेक प्रबल मंडळीस मराठ्यांची ही चढाई पसंत पडत नव्हती. बाजीराव स्वतः कोकणांत गुंतला असतां त्यानें, शिंदे होळकरांस दिल्लीचे बाजूस धामधूम उडविण्यास पाठविलें. बाजीरावास पैशाची मोठी अडचण असून, ती मिटविण्याचा त्याचा या दोन सरदारांस मोठा तगादा होता. तदनुसार स.. १७३३ व ३४ या दोन सालांत आग्रादिल्लीपावेतों निरनिराळ्या ठिकाणी स्वाऱ्या करून पुष्कळ पैसा वसूल केला. कंठाजी कदम पूर्वी गुजराथेंत मुलूखगिरी करीत असे, त्यास दमाजी गायकवाडानें स. १७३३ त त्या प्रांतांतून काढून दिलें, तेव्हां तो जाऊन होळकरास मिळाला. स. १७३४ त त्या दोघांनीं माळव्यांतून गुजराथच्या उत्तरभागीं उतरून, पालनपुर, अमदाबाद, ईडर या ठिकाणांतून मोठी लूट संपादन केली.

वजिर खानडौरान उपद्व्यापी नसल्यामुळें मराठ्यांचे उद्योग बरेच दिवस अविच्छिन्न राहिले. माळव्यांतही मराठ्यांचें वर्चस्व बसण्यास या वजिराचा नेभळा कारभारच कांहीं अंशीं कारण झाला. याचें मूळचें नांव ख्वाजा आसीम, व बापाचें नांव ख्वाजा कासम. आसीमचा जन्म स. १६७२–७३ त झाला. मोठा झाल्यावर त्यानें बंगाल्यांत अजीमुश्शानची नोकरी पत्करिली; पुढें फर्रुखसेयरबरोबर राहून त्यानें सय्यदांची मेहेरबानी संपादिली; आणि त्यांच्याच वशिल्यानें दरबारांत त्याचें वजन वाढून, खान डौरान बहादुर मनसूर जंग हे किताब मिळाले. निजाम दक्षिणेंत आल्यावर

महंमदशहानें त्यास वजिरीचें काम दिलें, तें स. १७२३ पासून ३९ पावेतों त्यानें केलें. त्या सालीं नादीरशहाच्या हल्ल्यांत तो मारला गेला. मराठ्यांचे कागदांत ‘ खानडौरा ’ असा त्याचा उल्लेख आहे. दरबारांत कोणाशींही अतिप्रसंग करावयाचा नाहीं,होतां होईल तों सर्वांस खूष ठेवून आपला कार्यभाग साधावयाचा, अशा वृत्तीनें त्यानें महंमदशहाचा कारभार पुष्कळ वर्षे बरेपणें निभावला. त्याच्या अंगीं विद्वत्ता किंवा कर्तृत्व नव्हतें, परंतु गोड भाषण व रुआबदार वर्तन यांमुळें त्याचे दोष झांकले जात. अतिप्रसंग किंवा निकराच्या भानगडी अंगावर न घेतल्यामुळें महंमदशहाची कारकीर्द एकंदरींत लांब व शांततेंत गेली. मात्र मराठे, रजपूत व जाठ यांचा जोर वाढत जाऊन बादशाही कमकुवत होत गेली.

माळव्याचा सुभा जयसिंगास, किंवा गुजराथचा सुभा अभयसिंगास बादशहानें दिला, त्याचप्रमाणें दक्षिणचा सुभाही तो मराठ्यांस देईल अशी निजामास मोठी भीति होती, ह्मणून मुंगशेवगांवच्या तहानंतर त्यानें मराठ्यांशीं विकोप न करितां सामदामाचेंच धोरण ठेविलें, आणि अंतस्थरीतीनें दरबारांत मराठ्यांचे विरोधकांस उत्तेजन देण्याचा डाव चालविला. स. १७३३–३४ त शिंदे होळकरांनीं थेट दिल्लीपावेतों जेव्हां मोठी धामधूम सुरू केली, तेव्हां बादशहा व खानडौरान यांनीं त्यांच्याशीं लढण्याचें ठरवून, दक्षिणेंतून निजामासही मदतीस बोलाविलें, परंतु आपल्याशिवाय बादशाहीचें संरक्षण होत नाहीं, अशी आणीबाणीची वेळ आल्याशिवाय आपण त्या कामांत पडावयाचें नाहीं, असा निजामाचा बेत होता. म्हणून त्यानें मराठ्यांशीं बिघाड केला नाहीं. खानडौराननें आपला भाऊ मुजफर खान यांस होळकरावर पाठविलें. तो स. १७३५ त होळकराचा पाठलाग करीत सिरोंजपावेतों आला. पिलाजी जाधवही त्यावेळीं हिंदुस्थानांत असून त्याची व कमरुद्दीन खानाची सागरतलावावर स. १७३५ च्या फेब्रुवारींत लढाई झाल्याचा उल्लेख शकावलींत आहे.

या वेळीं बाजीरावास पैशाची मोठी अडचण पडलेली होती. वास्तविक स. १७३४–३६ या तीन सालांत त्याच्या हालचाली व कारस्थानें काय होतीं, तें निर्विवाद समजण्यास साधन नाहीं. ब्रह्मेंद्रस्वामीस लिहिलेल्या पत्रावरून कर्जानें तो अगदीं गांजून गेला होता असें दिसतें. एक सारख्या स्वाऱ्या कराव्या लागल्यानें त्यास जबरदस्त कर्ज झालें. जिंकलेल्या मुलखाची आबादानी होऊन वसूल येण्याची तजवीज झाली नव्हती. तेथील वसूल करण्यासाठीं त्यास पुनः आणखी जास्त फौज ठेवावी लागे. साताऱ्याहून त्यास पैशाची मदत होत नसे. घरांतून पैसे नेऊन स्वाऱ्या करायच्या कीं, स्वाऱ्या करून घरीं पैसे आणायचे, असा कोटिक्रम त्याचे प्रतिपक्षी शाहूशीं करीत. या वेळीं निजामही पुढील धोरण ओळखून मोठमोठ्या फौजा तयार करीत होता. तेव्हां निजामापेक्षां ज्यास्त पगार कबूल केल्याशिवाय बाजीरावाकडे लोक येत ना. यासाठीं फौजांस ज्यास्त खर्च लागूं लागला. शिंदे व होळकर हे त्याचे विश्वासु सरदार थोडी बहुत मदत करीत, ह्मणून बाजीरावाचें कसेंतरी चाले. सावकारांपुढें नाक घासतां घासतां कपाळास घट्टे पडले, असें बाजीराव ब्रह्मेन्द्र स्वामीस लिहितो. पारसनीस कृत ब्र. चरित्रांत ले. ३०-३१-३२ चीं बाजीरावाचीं पत्रें वाचलीं असतां, एवढ्या शूर पुरुषाची ही केविलवाणी स्थिति पाहून विस्मय वाटतो, आणि पैशाची व्यवस्था करतां न येणें, ह्मणजे राज्य चालविण्याचें मुत्सद्दी धोरण त्याचें अंगीं असावें तितकें नव्हतें, असें ह्मणावें लागतें. स. १७३५-३६ त बाजीरावानें हिंदुस्थानांत स्वारी केल्यावेळचीं हीं पत्रें बहुधा आहेत. 'आह्मास कर्जानें बुडविलें. प्राण जाता तरीं बरें होतें. विष खाऊन मरावें इतकेंच. आतां प्रस्तुत साताऱ्यास जात नाहीं. तेथें जाऊन काय करावें ! आमचे उरावर पाय देऊन कार्य करतील. ज्या स्त्रीस पुरुष नाहीं, तिची गत होते तैशी, तुह्मी असतां, आमची गत साऱ्यांनीं मांडली आहे. चित्तास येईल तरी आपलें

ब्रीद रक्षावें.' यावरून बाजीरावास प्रतिपक्षाकडून मोठा विरोध होत होता हें उघड आहे. ' माझे विचारें हे सर्व संग सोडून उठोन एखादेकडे जावें. पुनः तोंड खांवदांस अगर लोकांस दाखवावें असें नाहीं. कर्ज फिटत नाहीं. आतां वांचल्याचें सार्थक काय ? आपल्या जिवाचा त्याग करितों.' 'आज दाभाडे, गायकवाड, बांडे कोटि कोटि रुपये खाजिने; आणि मी तुझे पायांशीं व धन्याचे पायाशीं निष्ठेनें वर्ततों तो अन्नास महाग झालों. आह्मी जोड इतकीच केली कीं वीस लाख रुपये कर्जदार झालों. ' अशीं हीं पत्रें त्या वेळच्या स्थितीचीं निदर्शक आहेत.[१]

मल्हारराव होळकर, राणोजी शिंदे, पिलाजी व सटवाजी जाधव, दाभाडे व गायकवाड,पवार कुटुंब, नागपूरकर भोसले कुटुंब, बांडे, बुंदेलें, हिंगणे वगैरे आणखी लहान मोठे अनेक सरदार हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागांत संचार करून सडकून द्रव्य संपादीन होते. वरील सर्व मोठमोठ्या मंडळींनीं कोटयावधि संपत्ति पैदा केली. कित्येकांनीं आपल्या घोड्यांस सोन्याचे नाल बसविले. कोटि रु. ह्मणजे कांहींच नाहीं. अशा रीतीनें ते सहज फेंकून देत असत. असें असतां त्या सर्वांचा पुरस्कर्ता बाजीराव सदैव कर्जांत बुडालेला, कर्जापायीं त्यांचा दास बनलेला, पाहून विलक्षण आश्चर्य वाटतें. सरदार लूट करितात, त्याचें अपेश मात्र बाजीरावाचे डोक्यावर, आणि फायदा हे सरदार घेत. या संपत्तीची कल्पनातीत लालूच वरील सरदारांस लागलेली होती, यामुळें आपापले प्रांत सोडून यत्किंचित् दूर जाण्यास ते नेहमीं नाखूष असत. इतकें असूनही बाजीरावाचें कर्ज तरी त्याच्याच शब्दानें वीस लाख होतें तें कोणाही लहानशा सरदारास सहज फेंकून देतां आलें असतें. अशा अव्यवस्थेच्या कारभारामुळें बाजीरावाच्या कर्तबगारीसंबंधानें आपला आदर बराचसा कमी होतो.

---

१ टीप:—या पत्रांच्या तारखा निश्चित नाहींत. ब्र. स्वा. ले ३० चें पत्र व राजवाडे खं. ३ ल. २६ चें पत्र एकच होत.

स.१७३६च्या नोव्हेंबरांत बाजीरावानें शिंदे होळकरांस घेऊन साताऱ्यास शाहूची भेट घेतली ( खं.२पृ.७४ ): स्वारीहून देशीं आल्यावर महाराजांच्या दर्शनास गेले ( खं.४पे.ब ) यावरून १७३५-३६त बाजीरावानें मोठी स्वारी हिंदुस्थानांत केली होती. साताऱ्यास सर्व वाटाघाट करून लगेच बाजीराव चांगल्या तयारीनें पुनः हिंदुस्थानांत दिल्लीवर चालून गेला.

२ दिल्लीची लढाई ( फेब्रुवारी-एप्रिल१७३७ ).–कर्जांतून मुक्त होण्याच्या इराद्यानें बाजीरावानें जयसिंगामार्फत बादशहाकडे माळव्याच्या चौथाई सरदेशमुखीच्या सनदा मागितल्या; आणि सरबुलंदखानामार्फत केलेला गुजराथचा तह मंजूर करून देण्याची मागणी केली. बादशहा व खानडौरान ह्या मागण्या कबूल करण्यास बहुतेक अनुकूल होते. परंतु तुराणीपक्ष त्यास विरुध्द होता. दोन्ही पक्षांनीं आपापल्या बाजू दरबारांत ओढून धरल्यामुळें निकाल लागला नाहीं; आणि शेवटीं निजामाचा डाव सिध्दीस जाऊन, त्याच्या सल्ल्यानें बादशहानें मराठ्यांशीं लढून त्यांचा प्रतिकार करण्याचा निश्चय केला. तरी जयसिंगाच्या मार्फत सलूखाची वाटाघाट खानडौराननें चालविलीच होती. त्यानें चौथाईसरदेशमुखीच्या सनदा बादशहाच्या सहीसह पुऱ्या करून त्या यादगारखान नांवाच्या आपल्या वकिलाबरोबर बाजीरावाकडे माळव्यांत पाठविल्या. नुसतें बोलणें करून मागत असेल तर सनदा बाजीरावास देऊं नयेत, अशी यादगारखानास वजिराची ताकीद होती. परंतु पेशव्याचा वकील धोंडोपंत पुरंदरे दिल्लीस होता, त्यास या सनदांची माहिती लागून ती त्यानें लगेच बाजीरावास कळविली. त्यावरून यादगारखान येतांच बाजीरावानें त्याजबरोबर अत्यंत चढाइचें बोलणें सुरू केलें. 'सर्व माळवाप्रांत आम्हांस जहागीर

---

१ ( ता. १९ मार्च १७३६ Dr. Burgess ' chronology )

द्या, रोहिले लोक त्यांत येऊन राहिले आहेत त्यांस घालवून द्या, मांडू, धार व रायसीन हे किल्ले आमच्या हवालीं करा, पन्नास लाख रकम एकदम रोख द्या, तसेंच प्रयाग, काशी, गया व मथुरा हीं तीर्थस्थळें आमच्या हवालीं करा आणि दक्षिणच्या सहा सुभ्यांवर सरदेशपांडे म्हणून नवीन शेंकडा दोन टक्क्यांचा हक्क द्या.' इकडे त्यानें फौजेच्या जोरावर मुलुखगिरी चालूच ठेविली होती. बाजीरावाची ही चढेलगिरी पाहून व हा आतां प्रत्यक्ष दिल्ली सुध्दां घशांत टाकील अशी खात्री झाल्यावर त्याजबरोबर तह करून सख्य जोडण्याचा विचार दिल्ली दरबारानें कायमचा सोडून दिला. मात्र शेवटची सरदेशपांडेगिरीची मागणी कबूल केली. यांत बादशहाचा उद्देश इतकाच होता कीं, दक्षिणच्या मुलखावर हक्क मिळाल्यानें बाजीराव तिकडे निघुन जाईल, आणि निजाम परभारें त्याचा पाडाव करील. पहिला उद्देश तडीस गेला नाहीं, कारण मराठ्यांस लालूच लागून ते ज्यास्तच चवताळून बादशाही मुलखावर ताव मारूं लागले. निजामानें मात्र बाजीरावाशीं टक्कर मारण्याची चांगलीच तयारी चालविली. पूर्वीं स्वतः स्वातंत्र्य धारण करतांना बादशहाची सत्ता कमी करण्याचा निजामाचा उद्योग होता, तो आतां सफळ होऊन, उलट आतां बादशहा दुर्बल झाल्यामुळें, मराठ्यांची खोड मोडण्यासाठीं, निजामानें बादशहास मदत करून, दोघांनीं मिळून मुसलमानी सत्ता कायम राखण्याचा उद्योग जोरानें सुरू केला. मोगल मराठ्यांचा हा शेवटचा निकराचा झगडा होय. ( मु. रि. पृ.८३३ ).

बादशहानेंही सर्वसरदार जमा करून मराठ्याशीं लढण्याची जंगी तयारी केली. निजामास त्याच्या सर्व फौजेनिशीं दक्षिणेंतून बोलाविलें. खानडौरान, मुज्फरखान, मीरहुसेन खानकोका, शिवसिंग, कमरुद्दीनखान, व अयोध्येचा सुभेदार सादतखान हे सर्व आपल्या फौजांनिशीं मराठ्यांवर चालून आले. स. १७३६ च्या पावसाळ्यानंतर मोहीम सुरू झाली.

नोव्हेंबर स. १७३६त बाजीराव हिंदुस्थानचे स्वारीस निघाला. पिलाजीचा मुलगा सटवाजी जाधव स्वारीबरोबर होता.. निजामानें मोठी तयारी चालविली असल्यामुळे बाजीरावानेंही केवळ तहाच्या वाटाघाटीवर भिस्त न ठेवितां लढाईची तयारी विशेष काळजीनें केली. बाजीरावांची एकंदर फौज ऐंशीं हजार होती. आजपर्यंत मराठेमुसलमानाचें भांडण हळूहळू रंगत येऊन आतां निकराच्या सामन्याची वेळ आली. निजामानें आपला मुलगा नासिरजंग यास दक्षिणचा कारभार सांगून १७३७ च्या आरंभीं दक्षिणेंतून प्रयाण केलें. त्यास दक्षिणेंतच अडवून धरावें अशी ताकीद चिमाजी आपास बाजीरावानें दिली होती. निजाम रेवा उतरले, त्यांस पायबंद द्यावा, ९-४-१७३७ (ब्र. स्वा. ले. ४७) मराठ्यांच्या दिल्लीवर ज्या कित्येक स्मरणीय व खडाजंगीच्या स्वाऱ्या झाल्या, त्यांपैकीं ही स्वारी पहिली होय. स. १७३६-च्या नोव्हेंबरपासून ३८ च्या जूनजुलै पावेतों दीड दोन वर्षे ही स्वारी चालली, इकडे निजामास भरंवसा येण्याकरतां बादशहानें त्याचा पुत्र गाजीउद्दीन यास माळवा व गुजराथ या प्रांतांचा अधिकार देऊन, सर्व मांडलिकांनीं याचे हाताखालीं वागावें असें फर्माविलें. ही तयारी पाहून बुंदेलखंडांत असतां बाजीरावानें जड सामान छत्रसालाचा मुलगा जगत्‌राज याचे हवालीं करून, सडे स्वारीनिशीं वेगानें उत्तरेस चाल करून, यमुनेचे कांठीं मुक्काम केला. मोगलांची फौजही सामन्यास आली. आपण बाजीरावाशीं झगडून त्यास साफ बुडविलें, अशी सादतखानानें खोटीच गप्प बादशहास लिहून पाठविली. त्यावरून बादशहानें आनंदीआनंद करून मराठ्यांचे वकिलास घालवून दिलें. लगेच बाजीरावानें भदावर प्रांतांत आठेर येथें फेब्रुआरी स. १७३७ त लढाई मारून दिल्लीचे आसपासचा मुलूख जाळून, खानडौरान याचे मार्फत बादशहापासून स्वारीचा खर्च तेरा लाख रुपये व माळवा प्रांत संपादन केला. ही सर्व हकीकत मोठी मनोरंजक असून

ती स्वतःच बाजीरावानें आपल्या बंधूस ता. ५ एप्रिल स. १७३७ च्या पत्रांत जयपुराहून लिहून पाठविली आहे.+ ती येणेप्रमाणें:—

"श्रियासह चि० रा० आप्पा यांसी, बाजीराव बल्लाळ आशीर्वाद उपरी येथील कुशल तागाईत वै०व०८ छ० १५ जिल्हेज मु. नजीक सवाई जयनगर. विशेष बुंदेलखंडाचा राजा जगत्‍राज याचे हवालीं बुनगे करून, बुंदेलखंडांत रवाना करून आम्ही सडे जाहलों. याचें वृत्त सादतखानाचें युध्द होऊन सरदार आल्याचें वर्तमान विस्तारें लेखन करून चतुर्भुज कासिदाबरोबर पत्रें पाठविलीं, तीं पावून सविस्तर कळलेंच असेल. सादतखान यमुना उतरोन आगरीयासीं आला. त्यासी गांठ घालावी तरी तो आगरियाचा आश्रय असतां मोडे न मोडे. गंभीरयमुनेच्या संगमीं धीर धरून राहावें तरी ते जागा जाऊन कोतर खळया फार. खानडवरा व महंमदखान बंगस वगैरे दिल्लीहून आगरियास येत होते ते, व सादतखान एक झालिया मनसबा भारी पडेल. याजकरितां संगमीं राहणें उत्तम नव्हे. दुसरें, सादतखानानीं बादशहास व आमिरांस लिहून पाठविलें कीं, मराठ्यांची फौज यमुना उतरोन आली होती ते बुडविली. दोन हजार स्वार मारिले व दोन हजार नदींत बुडाले. मल्हारजी होळकर व विठोबा बुळे कामास आले. बाजीरावाची धाड आली होती तिची गत हे जाहली. आह्मी यमुना उतरोन मराठे बुडवून चमेलीपार करितो ह्मणून कित्येक गप्पा लिहून पाठविल्या. पादशहांनीं खुशाली कळवून सादतखानास वस्त्रें व मोत्यांची माळ व हत्ती व शिरपाव पाठविला; व वकीलासही शिरपाव दिला. सादतखानानीं आपली बाजू शेर करून घेतली. वरकड अमीरासही कित्येक प्रकारें धिक्कारून लिहिलें. तें वृत्त रा. धोंडो गोविंद यांनीं वरचेवर लिहून पाठविलें. तात्पर्यार्थ आमचे फौजेंत जीव नाहीं केवळ

+( ब्र. स्वा. च. ले.२७—या पत्राचा सन पारसनिसानीं १७३४ दिलेला चूक होय. )

निर्जीव. बुडवून नस्त नाबूद केली असें लिहीत मोगली कारभार आपण एकत जाणतच आहेत. करावें थोडें, लिहावें फार. पादशहास सत्य भासलें, तें मिथ्या केलें पाहिजे. त्याचे विचार दोन. एक सादतखानास बुडवावें, किंवा दिल्लीस जाऊन दिल्लीचें पूर जाळावें तेव्हां मिथ्या होईल; त्यास, सादतखान आगरे सोडीनासे देखोन आह्मी दिल्लीस जावयाचा निश्चय केला. पूर जाळावें व मराठे आहेत असें पादशहास अवलोकन करवावें, ऐसा विचार करून २६ जिल्कादी ( १८ ३-१७३७ ) कूच करून पादशाहीरस्ता सोडून लांब मजला करून दमनसिंग चूडामण जाठाचे मुलखांतून नेवातियाचे सरहद्दे डोंगर किनाऱ्यानें चालिलों. खान-दौरा व बंगस आगरियास गेले. यांची व सादतखानाची भेट २ जिल्हेजी ( २३-३-१७३७) झाली. धोंडोपंत ( पेशव्यांचा वकील ) खानदौरापाशीं होते. सादतखानानें खानदौरास सांगून पाठविलें कीं ' बाजीराव याची फौज आपण मोडली.बुनगे पळाले.ते खासाही चमेल उतरोन गेले. अद्याप तुम्ही त्याची खुशामत करितां! वकील ठेवून घेतला आहे हे कोण्या विचारें? वकिलास निरोप देणें. ' त्यावरून धोंडो गोविंद यासीं निरोप दिल्हा. आम्हांजवळ आले. कमरुद्दीनखान, अजीमुल्लाखान वगैरे आले. आम्हीं त्यांजसीं गांठ न घातली. सातां कोसांवर उजवे बाजूस आमचे हातें त्यांस टाकून, लांबलांब मजली वीस कोसांच्या करून दोन मजलींनीं ७ जिल्हेजी ( २८मार्च ) दिल्लीस बारापुला व कालिकेचें देऊळ उजवें हातें टाकून जाऊन कुशबंदी नजीक शहर येथें मुक्काम केला. पुऱ्यास आगी देऊन शहर खाक करावें त्यास, दिल्ली महास्थळ, पातशहा बरबात जालियांत फायदा नाहीं. दुसरें, पादशहाचे व खानदौराचे चित्तांत सलूख करावयाचें आहे. यांस मोगल सलूख करूं देत नाहींत. अमर्यादा केल्यास राजकारणाचा दोरा तुटतो. याकरितां आगी लावायाचें महकूब करून, पादशहास व राजे बखतमल्ल यांसीं पत्रें पाठविलीं. शहरांतून दोन हत्ती व घोडीं उंटें आलीं होतीं तीं सांपडलीं. लष्करचे लोकांनीं शहरचे लोक

भवानीचें यात्रेस बाहेर आले होते, त्यांस झांबडा झांबड केलें. दुसरे दिवशीं बुधवारीं ( ३० मार्च ) पादशहाचे आज्ञेनें राजे बखतमल्ल यांनीं उत्तर पाठाविलें कीं, धोंडो पंतास पाठविणें. त्यावरून मशारनिल्हेस पाठवावें तरी आम्ही शहराजवळ आलों, यामुळें दिल्लींत गलबला झाला, यामुळें पाठविले नाहींत. 'भला मजुरा व स्वार पाठवून देणें, मशारनिल्हेस पाठवून देतों, आम्ही शहरानजीक राहिल्यानें, शहरास उपसर्ग लागेल, याकरितां कुच करून झीलच्या तलावावर जातों. ' म्हणून उत्तर पाठवून आम्हीं कुच केलें. शहराजवळून येत असतां,पादशहांनीं नबाब मीर हसनखान कोका दरोगा खास चौकी,नबाब अमीरखान,व खोजे रोजअफजुखान, राजे शिवासिंग जमातदार रिसाले अमीर, व मुजफरखान नायब बक्षीगिरी आहादी, यांनीं व नबाब मुज्फरखान,खानी दौराचे बंधू, सात आठ हजार फौजेनिशीं शहराबाहेर रिकाबगंजाजवळ आले. राजश्री सटवाजी जाधव पुढें गेले होते. त्यांची व मोगलांची गांठ पडली; झटपटी होत होती. मशार निल्हेनीं आम्हांस सांगोन पाठविलें त्यावरून रा. मल्हारजी होळकर, व राणोजी शिंदे व तुकोजी पवार, व जिवाजी पवार व यशवंतराव पवार, व मानाजी पायगुडे व गोविंद हरि पाठविले. त्यांचें यांचें झुंज होऊन मोगल मोडिले. राजे शिवासिंग वगैरे दहाबारा दरबारी ठार झाले. नबाब मीरहसनखानकोका जखमी झाला. दिगरबादे चौकीं पादशहाचे अडीच तीनशें मेले. बारशें माणूस जखमी जालें. रोजअफजूखान व अमीरखान व मुज्फरखान वगैरे शहरांत पळोन गेले. दोन हजार घोडा पाडाव झाला. पांच सहा हजार पळोन गेले. रा. राणोजी शिंदे याजकडील इंद्राजी कदम यांसी बोटास गोळी लागोन दोन बोटें उडोन गेलीं.वरकड नामांकित माणूस कोणी ठार झालें नाहीं. घोडे माणूस जखमी झाले.

---

टीप आठरें प्राभदावर येथें फब्रुवारींत लढाई झाल्याचा उल्लेख शकावलींत आहे ( खं.२ पृ. ७५ ) ती लढाई कोणती व कोणामध्यें ? ही झील तलावाचीच कीं काय ? स. १७३६ त भदावर वर स्वारी करून अमरसिंगाचा पराभव करून मराठ्यांनीं वीस लाख दंड घेतला. ( डॉ. बर्गेस-Chronology of modern India )

तदनंतर आम्हीं झीलच्या तलावावर मुक्काम केला. संध्याकाळच्या चार घटका दिवस बाकी राहिला, तों कमरुद्दीनखान पादशहापुरावरून आल्याची खबर आली. तेच क्षणीं आम्ही तयार होऊन गेलों. आमचे फौजेचें युद्ध झालें. बारांत गेलेला एक हत्ती रा. यशवंतराव पवार यांणीं घेतला. घोडीं उंटें लष्करांत आलीं त्यास दिवस अस्तमानास गेला. रात्रीचा दम धरून चौगीर्द मोगल वेढून बुडवावा, तरी झीलचा तलाव सोळा कोस लांब, उजवीकडे कमरुद्दीन खान, पुढें शहर.दुसरें, आम्ही दिल्लीस गेल्याचें वर्तमान नबाब खानदौरा व सादतखान व महंमदखान बंगस यांसी ७ जिल्हेजीं ( २८ मार्च ] मंगळवारीं राधाकुंडाचे मुक्कामीं कळतांच सडेसड होऊन पंचवीस तीस हजार फौजेनें बत्तीस कोस येऊन बडेलास मुक्काम केला. दुसरे दिवशीं ( बुधवारीं ) अलावर्दीच्या नाल्यावर पंचवीस कोस मुक्काम केला. गुरुवारीं प्रातःकाळीं खानदौरा, सादतखान बंगस व कमरुद्दीनखान सारे एक होणार. एक झाल्यावर सोसणार नाहीं, व शहर समीप. यास्तव मोगलांस टाकून चहूं कोसांवर मुक्काम केला. आम्हांकडील फिरंगोजी पाटणकरास गोळी लागोन ठार झाला. वरकडही दहा पांच माणूस व घोडीं जखमी झालीं.मोगलांकडील दहापांच ठार झाले.दहावीस जखमी झाले. गुरुवारीं सादतखान व खानदौरा व बंगस सारें कमरुद्दीन खानाजवळ आले. अलावर्दीपासून झीलच्या तलावापर्यंत मुक्काम करून आहेत. आम्ही मोगल पाठीवर घेऊन दाबांत आणून बुडवावे, या विचारे कूच करून रेवाद, कोटपुतळी मनोहरपुरावरून आलों. अद्याप सारे मोगल अलावर्दी व झीलच्या तलावावरी आहेत म्हणोन बातमी वर्तमान आलें व मीर हसनखानकोका पाहिल्या झुंजांत जखमी झाला होता, तो मेला म्हणून वर्तमान आलें. खानदौराचीं पत्रांवरी पत्रें सवाई जयसिंगजीस गेलीं. त्यांवरून ते पंधरासोळाहजार फौज व तोफखाना देखील स्वार

होऊन बासव्यावर गेले आहेत. खानदौराचे भेटीस जातात. सवाईजीचीं पत्रें ममतायुक्त आपला मुलूख (जयपुरचा) रक्षावा म्हणून देतात. आम्हांकडील व्यंकाजीराम त्यांजपाशीं आहेत, त्यांजपासून लिहवीत असतात. आम्हीं त्यांचे मुलखाचे वाटेस जात नाहीं. वाटेनें दाणादुण देतील. अभयसिंग जोधपुरास आहेत. आम्हीं आतां ग्वालेरभदावरप्रांतें बाकीसाकी राहिली आहे ती वसूल करून, मोगल मागेंमागें आले तरी त्यांस हैरान करून, पायींची धांपा देऊन, धावतां धावतांच खराब होत, तेंच करून, दाबांत आणून, गांठ घालून, राजश्री स्वामींचे पुण्यें, व वडिलांचे आशीर्वादें बुडवितों. आमची चिंता न करणें मुख्य दौराचे व खान पादशहाचे गोष्टी चित्तांत सलूख करावयाचें आहे. मोगल यांणीं हिंमत धरिली आहे. त्यांतें शीरोपरस्थ सादतखान आहे. त्याचा गर्व श्रीसंकल्पें हत जालियास, सर्व मनोदयानुरूप होईल. मनोदयानुरूप सलूख जालिया करूं, नाहींतरी सलूख करीत नाहीं. दिल्लीभवंता मुलूख खालसा केला. पुढें सोनपतपानपत यमुनापार मुलूख राहिला, तोही-ताराज करून मोगल अन्नास महाग होत ऐसेंच केलें जाईल. होईल तें वृत्त मागाहून तुम्हांस लिहून पाठवूं. कदाचित् मोगल दिल्लीस राहिले, तरी आगरियास जाऊन, अंतर्वेदींत उतरून कुल मुलूख मारून ताराज करितों. नबाब निजामुल्मुल्क् यांनीं गडबड केली, रेवा उतरले, तरी तुम्ही मागें शह देणें. पेशजी लिहिलें आहे त्याप्रमाणें करणें, मारून ताराज करणें. इकडेस सक नाहीं. तिकडे सही नाहींसा करणें. निजामास पायबंद असालिया उत्तम आहे. लोभ असों दीजे हे आशीर्वाद." या स्वारींत बाजीरावाचा मुलगा जनार्दन-पंत बापाबरोबर होता, त्याचेंही बाजीरावास लिहिलेलें २५ एप्रिल १७३७ चें एक पत्र इ. स. ऐ. टि. भा. २ ले. ३८ येथें दिलेलें आहे.

या पत्रावरून त्या वेळच्या राजकारणाचा चांगला उमज पडतो. दि-ल्लीचा पाडाव करून बादशहास सर्वस्वी आपल्या कबजांत आणण्याचा हा पहिला उपक्रम बाजीरावानें केला. या पुढच्या राघोबादादाच्या स्वाऱ्या

व पानिपतचा संग्राम इत्यादि प्रकरणें याच उद्योगाचीं पुढील अंगें असून, याची पूर्तता पन्नास वर्षांनीं महादजी शिंद्यानें केली. हिंदुपदपादशाहीचा मराठ्यांचा उद्देश किती नेटानें व अव्याहत चालला होता हें नेहमीं दृष्टी- पुढें ठेवल्यानेंच मराठ्यांचे उद्योग व हालचाली यांची ऐतिहासिक संगति आपणास कळून येते. मराठ्यांनीं दिल्लीस हात घालणें, त्यांजविरुद्ध मुस- लमानांनीं कट करून लढाईस येणें, मराठ्यांनीं निकरानें त्यांचा समाचार घेणें. अशा कृत्यांची पुनरावृत्ति कितीकदां तरी झालेली यापुढें दृष्टीस पडेल.

प्रस्तुतच्या कारस्थानांत बादशहाचे तर्फे सादतखान प्रमुख होता. नाना युक्त्या करून तो मराठ्यांस मागें हटवीत होता. तितक्याही युक्त्यांस बाजीराव पुरा पडला. बादशहा व त्याचा वजीर खानडौरान हे दोन दगडांवर हात ठेवून कसाबसा आपला निभाव लावीत होते. शाहू व जयसिंगही त्याच कोटींतले दिसतात. नुसत्या जरबेनें किंवा सलुखानें काम- भागेल तर मुद्दाम लढाईचा प्रसंग आणण्याची बाजीरावाची इच्छा नव्हती. परंतु त्याची हिंमत व तयारी मात्र परिपूर्ण होती. हाताखालीं जिवास जीव देणारे साह्यकर्ते होते. त्यांनीं बादशाही फौजेशीं कसे निकराचे सामने केले, आणि मोठमोठ्या सरदारास कसें ठार मारिलें हें वरील पत्रांत सां- गितलें आहे. जरूर तेव्हां समोर सामना करणें, हुलकावण्या दाखवून पळून जाणें, नुसत्या भपक्यानें दहशत घालणें, इत्यादि कसबांत बाजीरा- वाची निपुणता वरील पत्रांत दिसून येते. हें पत्र बाजीरावानें जयपुराहून लिहिलेलें असून, त्यावेळीं निजाम मोठी फौज व तोफखाना घेऊन उत्तरेंत येत होता, त्यास तिकडेच अडविण्याविषयीं बाजीरावानें आपल्या बंधूस ताकीद दिली आहे. शाहूनें या स्वारीवर केवढी भिस्त ठेविली होती, आणि बाजीरावावर त्याचा केवढा लोभ होता हें दाखविणारें शाहूचें पत्र रा. वि. ल. भावे यांजकडून मिळालें तें असें:-

पै॥ छ. २२ मोहारम.　　　　एप्रिल स. १७३७

राजमान्य राजश्री बाजीराव पंडित प्रधान यांस आज्ञा केली ऐसीजे. प्रस्तुत तुम्हांकडून विनंतिपत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. कोठें आहां, काय विचार, पुढें कोठपर्यंत जाणार, मुख्य अमीर सहवर्तमान काय करीत आहेत, हें सविस्तर दिन प्रतिदिन लिहीत जाणें. सांप्रत आंगरे यानजीक गेलेच असाल. पलीकडील भेटीचा विचार घडणार म्हणून परस्पर ऐकिजेतें. ऐशियास मोगली मनसुबा इमान देऊन आपला मतलब साधितील. त्यांचा विश्वास मानावा ऐसा अर्थ नाहीं. याजकरितां शहरांत जाऊन भेट घ्यावयाचा मनसुबा करीत असाल तरी सर्वथा न करणें. भेट न घेतां दुरूनच ज्याचे हातें तुमचें राजकारण असेल त्यापासून आपलें मतलब साधावयाचे ते साधणें. हावभरी होऊन त्याचे विश्वासावरी जाल याजकरितां लिहिलें आहे. तुम्ही बुधमंत कार्यकर्ते, यशस्वी सेवक आहांत. विचारास चुकणारा नाहीं हा स्वामीस निशा आहे. तरी बहुत विचारें करून जें करणें तें करून आपली बाजू सर होऊन येई तें करणें. पलीकडील, अमीर तुम्हासीं विवेकावरी आहेत, आणि नबाब निजामन्मुलूख इकडून फारच वळवळ करून त्या प्रांतें येत आहेत. त्याचा विचार कांहीं कळत नाहीं. तरी बहुत बहुत सावधपणें मनसुबा करणें. मोगली विचार तुम्हांस न कळेसा काय आहे. आपला नक्ष राहून, योजिला मनसुबा सिद्धीस पावे, ते गोष्ट करणें. जो विचार करीत असाल व घडोन येत असेल, तो वरचेवरी हुजूर लेहून पाठवीत जाणें. वरकड सविस्तर रा. महादाजी अंबाजी लिहितील त्याजवरून कळों येईल. +आन वृत्त दिनचर्येचें वरचेवर लिहिन. फुड मनसुबा काय व बोली काय मुद्याची तेंही लिहिन. फुड कोठवर जान, तेहीं लिहिन. त्याची मुलमान (?) आहे यावर न जान. त्याचे वाटे कदाचित् भेटीचा प्रसंग पडला तर लिहिन.

---

+ स्वतःचें अक्षर. येथून बाजीराव जानेवारी १७३७ पासून जुलई १७३८ पावेतों दिल्लीचे स्वारींत होता. स. १७३७ चा २२ मोहारम १२ मेला होता स. १७३५-३६ सालीं हें पत्र लिहिलेलें असूं शकेल.

मुख्याचे जर भेटीचा प्रसंग पडला तर बळकटी करन, आन लिहिन. बहुतकाय लिहिन, सूज्ञ असा.+

+ बाजीराव दिल्लीजवळ बादशहाशीं लढत होता, तेव्हां वरील पत्र शाहूनें लिहिलें व तें २२ मोहोरम म्ह० १२मेला बाजीरावास पोंचलें.

३ भोपाळची लढाई, निजामाचा कोंडमारा ( १३ डिसेंबर-८ जानेवारी १७३८ ).—इकडे निजामुल्मुल्कास बादशहाचें निकडीचें बोलावणें गेलें होतें. उभयतांची बोलाचाली बरेच दिवस चालली. निजामानें शिकस्त करून माळवा व गुजराथ या प्रांतांतून मराठ्यांस संपूर्णपणें काढून लावावें, आणि तसें झालें म्हणजे ते दोन प्रांत बादशहानें निजामचा वडील मुलगा गाजीउद्दीन याच्या नांवें करून द्यावे, असा ठराव झाला. बादशहानें निजामास संपूर्ण अधिकार दिले. मांडलिक राजांस त्याच्या हाताखालीं काम करण्याचा हुकूम सोडला. निजामाच्या हाताखालीं चौतीस हजार फौज गोळा झाली. त्याजबरोबर मोठा तोफखानाही होता. ह्या तोफखान्यामुळेंच निजामाचा पुढें पुष्कळ बचाव झाला. सादतखानाचा पुतण्या अबूलमनसूरखान सफदरजंग, व कोटाचा राजा हे त्यास मिळाले. बाजीराव दक्षिणेंत परत आल्यावर स. १७३७ चा पावसाळा संपतां संपतां निजाम उत्तरहिंदुस्थानांत यमुना उतरून दुआबांत शिरला, आणि पुनः दक्षिणेकडे वळून काल्पीनजीक यमुनेअलीकडे येऊन, रस्त्यानें बुंदेलखंडांतील राजांची मदत घेऊन परत माळव्यावर चालून आला.

या स्वारींत निजाम प्रथम दुआबांत गेल्याची हकीगत डफानें दिली आहे, ती खालील पत्रावरून खरी दिसते. " चि॥ रा. बळेवंतराव यांस चिमणाजी दामोदर आशीर्वाद. उपरी. पत्र पाठविलें तें पावलें. नबाबाकडील व तीर्थरूप रायाकडील वर्तमान ल्याहावें म्हणोन लिहिलें तें कळलें. ऐशास नबाब मुराबावरी (मुरादाबादेवरी ) होते. ती. रा. राऊ यांहीं रा॥ मल्हारराव होळकर व राणोजी शिंदे यांस पुढें पाठविले होते. त्यांणीं जाऊन मीर माजीखान फौजदार शाहाकपूरकर (?) मारिला. दोन हजार फौज बुडवून फिरोन तीर्थरूपांजवळ आले. तदोत्तर नबाबा रोखें जाऊन तीं कोसांचे अंतरें मुक्काम केला. नबाबांनीं पाटी देऊन छ ३ रमजानीं कूच करून भूपाळचे तळ्याचा आश्रा करून राहिले. इकडील

१ टीप—हा बळवंतराव चिमणाजी दामोदराचा मुलगा. हें पत्र रा. श्री. वि. आठल्ये यांजकडून मिळालें.

फौजा परीघ घालून दाणा वैरण बंद करून आहेत. एक झुंज त्यांचें आपलें जालें म्हणोन ती. रायांचीं पत्रें छ. ७ रमजानीं आलीं. तुम्हांस कळावें म्हणोन लिहिलें असे. सुजायनखानास रा। रघोजी भोसले यांणीं बुडविलें. हजार घोडे व सहा हत्ती व पालख्या व जेजाला पाडाव केल्या. खुद्द सुजायत खान दस्त केले. पांच लाख रुपये खंड घेऊन सोडिले म्हणोन लिहिलें. आलें मृत्यूहि पावलासे सुजायतखानाची खबर आहे. तुम्हांस कळावें म्हणोन लिहिलें असे. तांदूळ कमोद व पोहे पाठविलें ते पावले. औरंगाबादेस गेल्यावर नवल बिशेष आढळेल तें लिहिणें. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद. ( २९ डिसेंबर स. १७३७. )

बाजीराव म्हणतो, " निजामास शिंदे होळकरांनीं दुआबांतून खेंचून काढल्यावर ' आम्हींही त्वरा करून त्याच्या मुकाबल्यास आलों. ८–९ कोसांचें अंतर उतरतांच नबाबाच्या फौजा सलाबत खाऊन भूपाळ किल्ल्याच्या आश्रयास गेले'

शाहूनें बाजीरावाचें साह्य करण्याविषयीं सक्तीचे हुकुम निरनिराळ्या सरदारांस काढिले होते. सेनापति दाभाडे व रघूजी भोसले हे मात्र त्यास सामील झाले नाहींत. स. १७३७ च्या नोव्हेंबरांत बाजीराव नर्मदा उतरला, तेव्हां निजाम भोपाळच्या उत्तरेस ६० मैलांवर सिरोंज येथें होता. एकमेकांवर चालून येतांना त्यांची गांठ भोपाळनजीक पडली. तेव्हां आघाडीस व पिछाडीस तलावाचा आश्रय घेऊन निजामानें मजबुदीच्या जागीं राहून लढाई देण्याचें ठरविलें. आरंभींच राणोजी शिंदे, पिलाजी जाधव व सयाजी गुजर यांनीं निजामावर जोरानें हल्ला केला, तेव्हां निजामाकडील ५०० रजपूत व ७०० घोडे पडले, परंतु त्याच्या तोफांनीं मराठ्यांचेंही नुकसान पुष्कळ झालें. स्वतः बाजीराव अगदीं जवळ

अर्थात् पेशव्यांनीं राज्यापहार केला असा प्रवाद या कृतीनें बळकट होऊन पेशव्यांबद्दल मराठमंडळांत आदर राहिला नाहीं. राज्यांत ज्याच्या अंगीं पराक्रम असेल तो बलवान होणार हा सृष्टिनियमच असून पेशव्यांनीं राज्याची जोखीम अंगावर घेतली यांत यांहीं गैर होतें असें नाहीं. मात्र असें करितांना लोकांच्या मनांतील भावनांना होईल तितकें करून त्यांनीं दुखवावयाचें नव्हतें. सारांश, या अनिष्ट समजाची उत्पत्ति कदाचित् पुण्यास वाडा बांधल्यापासून झाली असेल. बाकी प्रतिनिधींनीं कऱ्हाडास, सचिवांनीं भोरास, सेनापतींनीं तळेगांवास अशा रीतीनें सर्व सरदार आपआपलीं स्वतंत्र ठिकाणें बांधूं लागले होते, तोच कित्ता पेशव्यांनींही उचलिला होता.

**उदेपुरच्या राण्याकडून आलेलीं संस्कृत पत्रें.**---मराठ्यांचा संचार उत्तर हिंदुस्थानांत झाला, तेव्हां तिकडील लोकांशीं महाराष्ट्रीयांचें दळण-वळण सुरू झालें. या दळणवळणाची भाषा हिंदी व क्वचित् संस्कृतही होती. पुढें पुढें मात्र जसजसा मराठ्यांचा अमंल बाहेर भक्कम होत गेला तसतशीं तिकडे त्यांनीं आपली मराठी भाषा व्यवहारांत उपयोगाची ठरविली. उदेपुरचा महाराणा संग्रामसिंह याचीं आलेलीं संस्कृत पत्रें कौतुकास्पद समजून मासल्यासाठीं खालीं देतों. त्यांवरून बाजीरावप्रतिनिधि संबंधानें रजपुतांचा आदर मोठा होता असें दिसून येतें.

( १ )　　श्रीएकलिंगः　　( ता. २-४-१७२९ इ.स. )

स्वस्तिश्री महाराजाधिराज महाराणा श्री संग्रामसिंहनृपवर्यादेशात् स्नेहसंदोहसद्मसु स्वामिकौर्यैकनिष्ठान्तःकरणप्रवृत्तिषु मुख्यामात्य राजश्री बाजीरावजीबल्लाळेषु सुप्रसादो लिख्यते । यथा श्रीमत्कृपया शमिह, भवदीयमीनशमविच्छिन्नमनितरसाधारणमेधमानमीहामहे । श्रीमतोऽत्रत्य भाविकेषिणोह्यकृत्रिमतया यादृगन्योन्यं प्रेमवर्तते

तदधिकवृद्धिमुपयांतु । अपरंच । चतुःशास्त्रिणो राजद्वारीयमुख्यपंडिता वीरेश्वरभट्टा विवाहार्थे दक्षिणप्रान्ते यास्यन्ति । भवन्मीलनान्तर मेषां पथि निष्प्रत्यूहं गमनागमने, भवन्तस्तथा विधास्यन्ति । श्रीमतः किमधिकं सुवित्सु । संवत्सरे रसवसुमुनीन्दुसंख्ये मध्वमेचकपूर्णायां चन्द्रे प्रगे रचितोऽयं वर्णचरः ॥

( पत्याबर )—मुख्यामात्य राजश्रीबाजीरावबल्लाळेषु योग्यमदः पत्रम्

( २ ) श्रीएकलिंगः ( ता. २-४-१७२९ इ. स. ).

स्वस्तिश्रीमन्महाराजाधिराजमहाराणासंग्रामसिंहनृपवर्यादेशात् स्नेहसंदोहसद्मसु स्वामिकार्यैकनिष्ठान्तःकरण प्रवृत्तिषु राजश्री श्रीपतरावप्रतिनिधिषु सुप्रसादो लिख्यते । यथा श्रीमत्कृपया शमिह, भवदीयं वरीवर्धतां प्रत्यनेहसं । भवन्तोऽस्मदीय हितेच्छवः सन्ति । याद्दगन्योन्यं प्रणियोऽस्ति तदधिकतरः समुल्लसतु । अन्यच्च । चतुःशास्त्रिणो राजद्वारिय मुख्यपंडिता वीरेश्वरभट्टाः कार्यार्थमस्माभिः श्रीमत्पार्श्वे प्रेषिताः सन्ति । वचनरचनाभिरस्मदहृद्गतं सर्वं वृत्तान्त श्रीमद्भ्यो निवेदीयष्यन्ति । परंतु कर्कस्थे सत्येव गुरावेते दक्षिणप्रान्ते विवाहार्थं यास्यान्ति । तदर्थं यथा तेषां निर्विघ्नं गमनागमने भवतस्तथा यत्ना विधेयाः । विवाहं विधाय पश्चाद् भूयोऽपि श्रीमत्पोर्श्वं समागमनमेतेषां निश्चितमेव । तदासमातेरस्मद्युक्त कार्यस्य स्थित्वा श्रीमद्भिरतिप्रसन्नतया दत्तामनुज्ञामधिगम्यास्मन्निकट आयास्यन्ति । तेऽस्माभिः प्रतीत्यास्पदमिति मत्वा नियुक्ताः सन्ति । स गा भिः सा भिर्वाङ्माधुर्य धाराभिः श्रीमन्त आनन्दीयिष्यन्तीत्यलं सुज्ञेषु । पत्राणि भूयोभूयः प्रेष्याणि । संवत्सरे रसवसुमुनीन्दुसंख्ये मध्वमेचकपूर्णायांचन्द्र प्रगे रचितो वर्णचरः ।

( पत्यावर ) राजश्री श्रीपतरावप्रीतीनीधषु योग्यमदः पत्रम् ।

**बाजीरावाची योग्यता, कर्तबगारीचा अंदाज.**—बाजीरावाची कर्तबगारी ठरविण्यांत दोन मुद्दे उद्भवतात ( १ ) बाजीरावाचा स्वभाव उद्दाम व तुसड होता. मनमिळाऊ नव्हता, आणि [ २ ] बाजीराव केवळ योद्धा होता, मुत्सद्दी नव्हता. बाजीरावाचा विचार करितांना दृष्टीपुढें मुख्यतः त्याचा बाप बाळाजी व मुलगा नानासाहेब हे दोन पुरुष येतात. या तीन पुरुषांच्या उद्योगांत एकप्रकारचें सातत्य असून, शाहूच्या आगमनापासून पानपतापर्यंतचा सरासरीनें पन्नास वर्षांचा काळ परिस्थितीच्या मानानें मराठ्यांच्या इतिहासांत एका विशिष्ट प्रवाहाचा किंवा प्रगतीचा निदर्शक आहे. तेव्हां या तीन पुरुषांचाच विचार करितां, स्वभावाच्यासंबंधानें बाळाजी विश्वनाथाची किंवा नानासाहेबाची अष्टपैलू मनमिळाऊ हातोटी बाजीरावास नव्हती, असें पुराव्यावरून ह्मणणें भाग येतें. बाळाजी विश्वनाथानें अल्पारंभापासून उद्योग वाढवीत वाढवीत, एका चंद्रसेन जाधवाशिवाय इतर सर्व कर्त्या मंडळीस एका उद्योगांत गोंवून शाहूचा पक्ष जोरांत आणिला आणि मराठे शाहींचें पुढील धोरण ठरवून दिलें. हें धोरण कायमचें अमलांत आणून फौजेची, जहागिरींची वगैरे व्यवस्था बांधून पुढील राज्यकारभाराचा पाया भक्कम करण्यास तो आणखी कांहीं वर्षें जगला नाहीं, हें दुर्भाग्य होय. तो जरी योद्धा नव्हता, तरी बऱ्याच योग्यतेचा मुत्सद्दी असून त्यानें मराठी राज्याची व्यवस्था बांधिली, आणि जरुरीपुरते कर्तृत्ववान योद्धेही त्यानें हाताशीं ठेविले योद्धा व मुत्सद्दी यांत मुत्सद्दी वरच्या पायरीचा होय.

पेशवा ह्मणजे राजाचा व राज्याचा मुख्य प्रधान ही जाणीव नानासाहेबानें सर्वांस भासविली. परंतु ती हातोटी बाजीरावास साधली होती कीं नाहीं हा प्रश्न आहे. तो प्रधानपदावर आला त्यावेळीं अगदींच तरुण असल्यामुळें वयानें व अनुभवानें इतर मुत्सद्यांवर त्याचा पगडा एकदम न बसणें साहजिक होतें. परंतु उत्तरोत्तर त्याची छाप सर्वांवर बसली

पाहिजे होती ती बसली नाहीं. अखेरपर्यंत प्रतिनिधी, दाभाडे, रघूजी व फत्तेसिंग भोसले, आंगरे, पवार इत्यादि बहुतेक प्रमुख मंडळी नेहमीं बाजीरावाचे विरुद्ध होती. प्रत्यक्ष शाहू त्याजविषयीं सदैव साशंक असे. वीस वर्षांच्या कारभारांत हा प्रकार त्यास यत्किंचित् बदलतां आला नाहीं. एकासही त्यानें आपल्या भजनीं लावलें नाहीं. शाहूपाशीं, त्याच्या राण्यांपाशीं व सरदारांपाशीं आपलें वजन कसेंबसें ठेवण्याठीं ब्रह्मेन्द्रस्वामी-सारख्या अप्रयोजक साधनाचा त्यानें उपयोग केला. अशा साधनांवर भिस्त ठेवून राजकारणें सिद्धीस जातील हा समज बाजीरावाच्या मुत्सद्दे-गिरीस कमीपणा आणितो. शिंदे व होळकर हे दोनच सरदार त्याचे आज्ञांकित होते, पण तेवढ्यांवरून बाजीराव सरदारांवर छाप बसविणारा होता असें सिद्ध होत नाहीं. ते दोघेही बाजीरावाचे लहानपणापासून सोबती होते. अशा जीवश्चकंठश्च सोबत्यांवर त्यानें भरंवसा ठेविला यांत आश्चर्य नाहीं. पण ते राज्याची कामगिरी करूं लागतांच, खासगी स्नेह-संबंध बाजूस ठेवून, राज्यकारभाराशीं या सरदारांचा संबंध आरंभापासू-नच बाजीरावानें ठरवून तो अंमलांत आणला असता, तर ते पुढें डोई-जड झाले नसते. या दोन सरदारांनीं मराठशाहीची सेवा चांगली बजा-वली हा प्रकार जरी खरा असला तरी त्यांचा डोईजडपणा पुढील राज्य-कर्त्यांस तसाच जाचक झाला, यांतही संशय नाहीं. नवीन सरदार उत्पन्न करितांना, राज्यांतील त्यांच्या कामाची व अधिकाराची मर्यादा ठरवून देणें हें मुत्सद्याचें पहिलें काम बाजीरावाकडून झालें नाहीं असें ह्मणावें लागतें.

येथें जहागिरी किंवा सरंजामी पद्धतीचा संबंध येतो. नवीन स्वतंत्र जहागीरदार उत्पन्न करावयाचे नाहींत, उलट असलेले कमी करून स्व-तंत्र सरकारी फौज ठेवावयाची अशी योजना शाहू व बाळाजी विश्वनाथ यांची दिसते. शाहूचा तसा प्रयत्नही चालला होता. या कामीं बाजी-

रावानें झटून प्रयत्न केलेला दिसत नाहीं. बापाची पद्धत त्यास पुढें चालवितां आली असें ह्मणतां येत नाहीं. राज्यसत्तेचें मुख्य साधन फौज तिची व्यवस्था एकतंत्री नसून, बारभाईच्या कारभारानें कसा घोटाळा उडतो, याचा अनुभव अनेकवार बाजीरावास आला असतां, तो प्रकार सुधारण्याचा त्यानें प्रयत्न केल्याचाही दाखला आढळत नाही. उलट ज्या बाबतींत आपलें चालत नाहीं, त्यांत ह्मणजे दक्षिणेकडील व कर्नाटक वगैरे ठिकाणीं आपण इतःपर लक्ष घालावयाचें नाहीं, असा निर्धार करून केवळ उत्तरेकडे बाजीरावानें आपला उद्योग चालविला. यावरून सर्व राज्याच्या कारभारावर देखरेख ठेवणें हें पेशव्याचें काम त्यास साधलें नाहीं किंवा त्यानें केलें नाहीं असें ह्मणावें लागतें. पुढील कामांत मागील अनुभवाचा उपयोग करून दाखविणें हें मुत्सद्देगिरीचें लक्षण आहे. शिवाय राज्यकारभाराचें मुख्य साधन पैसा. त्याची पैदास सुरळित राज्यकारभाराशिवाय होणें शक्य नाहीं. यामुळें बाजीराव सदा कर्जांत बुडालेला असे. ही गोष्ट त्याच्या मुत्सद्देगिरीस कमीपणा आणते.

बाजीराव योद्धा होता, ही गोष्ट त्याच्या पराक्रमांवरून सिद्धच आहे. मात्र त्याची युद्धपद्धति पूर्वींची गनिमी काव्याची असून, तिचाच पुरस्कार विशेषतः पुढें मल्हारराव होळकर व रघुनाथराव यांनीं केला. याच्याउलट सदाशिवरावानें पायदळ व तोफखाना यांचें महत्त्व वाढविलें. बाजीरावास शिपाइगिरीची हौस होती आणि शिपाईगडी त्याजवर अनुरक्त असत; पण अशा मंडळींस तो आपल्या वजनानें [ Personal influence ] भजनीं लावी; मुत्सद्देगिरीनें किंवा विशिष्ट पद्धतीनें नव्हे. शिवाजी किंवा इतर थोर पुरुषांप्रमाणें घरच्या किंवा बाहेरच्या वर्तनांत बाजीराव हा पुरुष लोकांचीं मनें आकर्षून घेणारा नव्हता. ( He was not an magnetic Personality )

यास्तव बाजीराव मोठासा मुत्सद्दी नव्हता-असें ह्मणण्याची पाळी येते.

आतां या सर्व गोष्टीबद्दल बाजीरावाची जबाबदारी किती, शाहूची किती व परिस्थितीची किती हाही प्रश्न ओघानेंच येतो. परंतु परिस्थितीचा घोडा बनवून त्याजवर जो भरारी मारतो, बिकट प्रसंगांतून आपणास अनुकूल अशीं साधनें उत्पन्न करितो तोच मुत्सद्दी ह्मटला जातो.

बाजीरावास राष्ट्रीय भावना होती, आणि मोगल बादशाहीच्या मुळाशीं आघात केल्यानें त्याच्या शाखा आपोआप पडतील हा त्याचा अंदाज खोटा नव्हता. तशा प्रकारची विशिष्ट भावना त्याजपासून त्याच्या ठिकठिकाणच्या वकिलांसही मिळालेली दिसते. बाजीरावाची ही भावना दुसऱ्याही कित्येक सरदारांच्या ठिकाणीं होती. या भावनेच्या जोरावर वीस वर्षेंपर्यंत बाजीरावानें मराठी राज्याचा विस्तार मोठा केला, हें बाजीरावाच्या आरंभीं व अखेरीस मराठी राज्याची मर्यादा कशी होती हें मनांत आणल्यानें कळून येतें. मराठी राज्याचा हा एवढा विस्तार हेंच बाजीरावाच्या कर्तबगारीचें निदर्शक होय असें ह्मणण्यांत येतें. परंतु मुख्य मुद्दा यांतच आहे. हा विस्तार केवळ युद्धकौशल्याचा निदर्शक आहे कीं त्यांत मुत्सद्देगिरी भरलेली आहे हा वादाचा प्रश्न होय. बाळाजी विश्वनाथानें ठरविलेल्या पद्धतीचे गुण काय होते आणि ते हळू हळू कसे सुटत गेले याचें वर्णन कै. रानडे यांनीं आपल्या पुस्तकात करून ( पृ. २१२-२१८ ) शिवाजीच्या खालोखाल त्यांनीं बाळाजी विश्वनाथाची योग्यता ठरविली आहे. त्यावरून बाजीरावांत बापाची मुत्सद्देगिरी नव्हती असें ह्मणण्याची पाळी येते. बाजीरावानें राज्याचा उद्योग केला. त्यांत त्याचें युद्धनैपुण्य झळकतें आणि. युद्धनैपुण्य हेंच राज्योत्कर्षाचें मुख्य अंग आहे. परंतु हाच बाजीरावाचा उद्योग शिवाजी-

सारखा, सावधपणानें व क्रमाक्रमानें एकएका प्रकरणाची व्यवस्था ठरवून झाला असता तर त्यांत राज्याचें चिरंतन हित झालें असतें. बाजीरावास आयुर्मर्यादा ज्यास्त असती तर त्यानें पुढें मुत्सद्दी धोरणावर राज्याची व्यवस्था बांधिली असती. ज्या निजामाची कायमची व्यवस्था बाजिरावाकडून वीस वर्षांत झाली नाहीं, तीच त्याच्या मृत्यूनंतर नानासाहेबानें लगेच हातीं घेऊन १७४१–४३ पावेतों लाविली. बाजीरावाच्या प्रचंड उद्योगाचा योग्य फायदा नानासाहेबानें करून घेतला. ह्मणूनच लढाईच्या धाडशी व हूड कामांत बाजीराव निमग्न असून लेखणीच्या जोराची त्यानें पर्वा केलेली दिसत नाहीं, असें ह्मणावें लागतें. एका विद्वान् गृहस्थांनीं हाच आशय खालील शब्दांनीं व्यक्त केला होता.

Bajirao yielded to the exigencies of the occasion and did not formulate or follow anything like a settled system or policy.Sivaji's caution gradually extending his base seems lacking in Bajirao's mind. Time had come, after Shahu's accesion, for the formulation of a policy of Government, which Balaji attempted but which he did not live to complete and consolidate. Bajirao tried to work out the situation as handed down by his father, often proceeding wildly and glorying in the show of temporary results. He seems to make a haste for the empire, trying to compres politics within impossible limits without a solid base for the structure. It is instructive to recall in this instance the slow but sure progress of the British enterprise in India, where the wild ambitious temptations of inaividual aggressors

were openly restrained, so as ultimately to accomplish more than the wildest dreamers ever conceived.'

हा सर्व दोष एकट्या बाजीरावावर येतो असें नाहीं. मराठ्यांची मनोभावना नेहमींच स्वार्थाला चिकटून असणारी आहे. राज्याच्या एकंदर हितापेक्षां आपापला वैयक्तिक स्वार्थ ज्याला त्याला ज्यास्त वाटतो. क्लाइव्ह हेस्टिंग्स वगैरेंनी गैरशिस्त प्रकार केले असतील, परंतु आपल्या राष्ट्राचें अहित त्यांनीं केलें नाहीं. फ्रान्सिस व हेस्टिंग्स एकमेकांचे कट्टे शत्रु, पण मराठ्यांची किंवा निजामाची मदत घेऊन फ्रान्सिसनें हेस्टिंग्सचा समाचार घेतला नाहीं. अर्थात् अशा स्वार्थी लोकांकडून राष्ट्र-बंधनाचें काम सिद्धीस गेलें नाहीं त्यास बाजीराव काय करणार ! पण अशाच स्थितींत शिवाजी व बाळाजीविश्वनाथ यांनीं आपापल्यापरी उद्योग केले, त्या मानानें बाजीरावाचा उद्योग कमी दिसतो, इतकाच मुद्दा आहे. काल व परिस्थिति यांना बगलेंत मारून करामत करून दाखवितो त्यासच राष्ट्रपुरुष ह्मणतां येईल. दुसऱ्या एका गृहस्थांनीं या बाबतींत खालील अभिप्राय व्यक्त केला आहे.

'Bajirao had no low aims; but his foresight and statesmanship were limited and he had no sound grasp of men and events. His name however was doubtless a terror ro all parties. when left to himself, Bajirao handled any situation with consummate skill; but he was hampered at every step by sallish intriguers.'

सारांश, बाजीरावाच्या कर्तबगारीसंबंधानें साधक बाधक मुद्दे वाचून मनावर जो एक सामान्य ठसा उमटत असतो त्याचीच किंमत मोठी येथें समजली पाहिजे.

दरबारांत दुफळी नसती तर, किंवा सर्व सरदारांस एका कार्यभागांत गोवणारी राज्यसंघटना चालू असती तर बाजीरावानें दिल्ली काबीज करून हिंदुपदशाहीवर शाहूस नेऊन बसविलें असतें, अशा प्रकारचे दोन तीन चागलेच प्रसंग त्या वेळीं आले होते. शौर्य, अकल, द्रव्यसाह्य कांहीं कमी नव्हतें. पृथ्वीवरील कोणत्याही शूर योद्धयांत मराठे शिपायांची गणना झाली असती, इतकें त्यांचें शौर्य अनेक प्रसंगीं व्यक्त झालें. प्रत्येक सरदारानें संपत्ति तर कोटयवधि मिळविली. अशा अनुकूल परिस्थितीचा उपयोग आपणांस राष्ट्रकार्याकडे करिता आला नाहीं. ' मराठयांच्या वैभवरवीचें उदयतेज शिवाजीच्या ठिकाणीं, आणि त्याची अस्तप्रभा महादजी सिंदे व नानाफडणीस यांच्या ठिकाणीं दग्गोचर होते असें समजलें तर, बाजीराव हा मध्यान्हींचा प्रतापरवि होय असें मानण्यास हरकत नाहीं ' ( सत्यव्रत मुकरजी-मॉडर्न रिव्ह्यू+डिसेंबर १९१२ ).

( २ ) **अस्सल कागदपत्रांचा अभाव.**—अलीकडे बरेच ऐतिहासिक कागदपत्र प्रसिद्ध झाले आहेत. तथापि त्यांत बाजीरावासंबंधीं प्रत्यक्ष माहिती फारच थोडी आहे. वास्तविक शिवाजी, संभाजी, राजाराम व ताराबाई या चार कारकीर्दीतील अनेक प्रकरणें व घडामोडी यांसंबंधानें निरानिराळ्या व्यक्तींचे त्यांत नाना प्रकारचे उल्लेख बरेचसे स्पष्ट व विस्तृत असे सांपडतात. शिवाजीच्या कारकीर्दीवर फारसी लेखांवरून पुष्कळच नवीन प्रकाश पडला आहे. शाहूच्या संबंधानेंही बखरींतून व निरनिराळ्या सरदारांच्या हकीकतींतून बरीच माहिती मिळते. बाळा जी

+ या निबंधांत बाजीरावाची हकिकत थोडक्यांत पण सरस दिलेली आहे.

विश्वनाथाच्या हालचाली व वर्तनोद्देश यांचा पुष्कळ समाधानकारक उलगडा लावण्याजोगी नवीन माहिती उपलब्ध झालेली आहे. परंतु मराठशाहींतील दुसऱ्या नंबरच्या ह्या प्रसिद्ध व्यक्तीसंबंधानें खुलासे-वार माहिती दुर्लभ असावी हें त्या व्यक्तीच्या व राष्ट्रेतिहासाच्या संबंधानें वैगुण्योत्पादक आहे. बाजीरावाच्या पूर्वीच्या व पुढच्या व्यवहारांचा व उलाढालींचा बराच समर्पक उलगडा लावतां येतो, तसा प्रत्यक्ष बाजीरावा-संबंधानें लावतां येत नाहीं. त्या बाबतींत पेशव्यांची बखर व शाहूची बखर ह्या दोन उत्तरकालीन लेखांवरच भिस्त ठेवावी लागते. या बखरी तत्कालीन नाहींत आणि त्यांतील उल्लेख बरेचसे काल्पनिक असून लेखकांनीं आपापल्या कल्पनेप्रमाणें मागाहून सजविलेले आहेत. त्यांतील तुट-पुंज्या उल्लेखांवरच भिस्त ठेवून कै. नागेश विनायक बापट यांनीं बाजी-रावाचें एक काल्पानिक चरित्र पुष्कळ वर्षांपूर्वीं लिहिलें तें वाङ्मयदृष्टीनें कितीही आदरणीय असलें, तरी त्यानें इतिहासाची हानि केली असून, बाजीरावासंबंधीं हल्लीं प्रचलित असलेले बरेचसे ग्रह त्या पुस्तकावरूनच बनलेले आहेत. त्यामुळें बाजीरावाचा खरा इतिहास रचतांना अनेक मिथ्याग्रह प्रथम दुरुस्त करावे लागतात. अशा स्थितींत अस्सल पत्रांचा उपयोग फार होतो हें सांगणें नकोच. मराठशाहींतील बऱ्याच प्रसिद्ध व्यक्तींचीं अनेक पत्रें हल्लीं उपलब्ध असून त्यांवरून त्या व्यक्तींचे वर्त-नोद्देश, त्यांच्या अडचणी व त्यांची कामगिरी यांचा अंदाज करितां येतो. परंतु अशा प्रकारचीं बाजीरावानें लिहिलेलीं पत्रें फारशीं नाहींत; आणि जीं कांहीं प्रसिद्ध आहेत त्यांत त्याचें अंतरंग भरपूर व्यक्त झालें आहे असें बहुधा एकही पत्र नाहीं रा. राजवाडे यांचे खंड ३ व ६, रा. ब. पारसनीसकृत ब्रह्मेंद्रस्वामींचें चरित्र, व का. सं. पत्रें यादी, या पुस्तकांत

बाजीरावाचीं कांहीं पत्रें आलेलीं आहेत + हीं सर्व मिळून फार तर सुमारें ८० पत्रें होतील. यांपैकीं बरींचशीं पत्रें पावतीवजा, निवाडपत्रें किंवा मोहिमांच्या हकीकती देणारीं आहेत. राजवाडयांच्या सहाव्या खंडांतील ले. ५९१--६२१ पावेंतोंच्या कागदांत नंदलाल मंडलोई याच्यामार्फत माळवा-प्रांत जिंकल्यासंबंधाचा उल्लेख आहे. बरींचशीं पत्रें बाजीरावानें ब्रह्मेंद्रस्वामी चिमाजी आप्पा व पुरंदरे यांस लिहिलेलीं आहेत. पिलाजी व सटवाजी जाधव यांस लिहिलेलीं पत्रें केवळ पावतीच्या स्वरूपाचीं आहेत. सरांश, राज्याच्या घडामोडी व स्वतःचे उद्देश दाखविणारें बाजीरावाचें एकही पत्र नाहीं. ब्रह्मेंद्रस्वामीस लिहिलेल्या पत्रांत कर्जाच्या गांजणुकीचा प्रकार भरपूर आहे. बाजीरावाचे उद्योग व व्यवहार, सर्व देशभर चाललेल्या त्याच्या हालचाली, त्याचे ठिकठिकाणचे वकील व त्यांच्या मार्फत चाललेलीं कारस्थानें, या गोष्टी मनांत आणल्या म्हणजे, बाजीरावानें कितीतरी पत्रें लिहिलीं असलीं पाहिजेत, परंतु तीं उपलब्ध नाहींत, यावरून कदाचित् अशीं पत्रें लिहिलींच नसतील असें वाटतें. एकंदरींत या राष्ट्रपुरुषाच्या कर्तबगारीसंबंधानें निश्चयकारक मत बनाविण्यास

---

+ का. सं. प. या. ले. ४२, ४४, १६६, १६९.

रा. खंड ३, ले. १६, २६, ३०, ३६७.

रा. खंड ६, ले. १६, ५६, ७३, ७६, ७८, ८१, ८२, ९०, ११०, ११३, १२३, १३३, १४२, व ले. ५९१,–९३, ५९९, ६१३, ६२०, ६२१, १८, १९, २९, ३०, ३३, ३६, ३९, ४१, ४३, ४५, ५९, ९१, ९२.

रा. खंड ८, ले. ११६, १६०–१६२

पा. कृ ब्र. च. ले. २६–४२ व ११४–१२७. इ. स.–पे. द. माहिती पृ. १२७ ले. २ ' बर्वे घराण्याचा इतिहास ' अशा सारख्या पुस्तकांतून कांहीं सनदा पत्रें वगैरे बाजीरावानें लिहिलेले आणखी कांहीं कागद आहेत.

उपयोगी पडणारा अस्सल पुरवा मिळत नसल्यामुळें, या बाबतींत बरीचशी भिस्त कल्पनेवर ठेवावी लागते. पुढें आलेल्या पत्रांवरूनच अदमास करावयाचा असल्यास बाजीराव पत्रव्यवहारांत विशेष लक्ष घालणारा होता असें दिसत नाहीं. त्याचीं पत्रें इतरांच्या मानानें नीरस, तुटपुंजीं व मनाची व्यग्रता दाखविणारीं आहेत. त्याचा स्वभाव तडकाफडकी व थोडासा उद्दाम असल्यामुळें, गोड व रसभरित पत्रें लिहून दुसऱ्यावर छाप बसविण्याची हातोटी त्यास नसावी. तथापि हैदराबाद, दिल्ली, बुंदेलखंड, राजपुताना, माळवा इत्यादि दूरदूरच्या प्रदेशांत बाजीरावाचे वकील मराठशाहीच्या हितासाठीं झटत होते. सवाई जयसिंगाशीं बाजीरावाचें राज्यसंधान एकसारखें चालू होतें. या वकीलांचीं बाजीरावास व इतरांस आलेलीं पत्रें कांहीं उपलब्ध आहेत, त्यांवरून बाजीरावापासून या वकिलांस राष्ट्रीयधोरणाची व आपल्या कर्तव्याची स्फूर्ति मिळत असावी, असें ह्मणण्यास चिंता नाहीं. विशेषतः दिल्लीकडील वकिलांनीं नादीरशहाच्या स्वारीच्या वेळेस ज्या हकीकती कळविल्या आहेत त्यांवरून मराठशाहीचा फैलाव देशभर व्हावा ही त्यांची जाणीव व्यक्त होते. बाजीरावाचा मामेभाऊ बाबूराव मल्हार बर्वे दिल्लीस वकील होता, त्याचीं पत्रें बरींच खुलासेवार व वाचण्यालायक आहेत.

बाजीरावासंबंधानें इतरांचे उल्लेख ठिकठिकाणीं आलेले आढळतात, त्यांवरून त्याचा वचक सर्व लोकांस अतिशय होता. शाहू तर त्याजविषयीं नेहमीं साशंक असे; आणि हा केव्हां काय करील याजबद्दल शाहूस मोठा धाक वाटे. प्रतिनिधि वगैरे बाजीरावाचे प्रतिस्पर्धी बाजीरावासंबधानें शाहूचें मनांत नेहमीं वरील शंका भरवीत, ह्मणून एखादें प्रकरण मुखत्यारीनें तडीस लावण्यांत शाहूकडून बाजीरावास पुष्कळच अडथळा होत असे. शा. म. ब. पृ. ५३ व भारतवर्ष पत्रें यादी ले. ३६, ३८, ६३ इत्यादिकांवरून शाहूचें मन बाजीरावाविषयीं कसें होतें याची कल्पना होतें. सात

किल्ल्यांवरील दारूगोळा व दाणा उतरून पेशवे विकतात असा कोणीं बोभाटा शाहूजवळ केला, तेव्हां ही गोष्ट खोटी आहे तपास करावा, असा पुरंदऱ्यानें शाहूस आग्रह केला असतां, शाहू ह्मणाला, 'असे तपास पुष्कळांचे होऊन गुन्हेगार ठरले त्यांचें कोणीं काय केलें.' त्यावर पुरंदऱ्यानें जबाब दिला कीं. 'आमचे धनी पेशवे अशी गय करणारे नाहींत. खरें करून न दिलें तर चहाडखोरांचें डोचकेंच मारतील.' हा रोखठोक जबाब ऐकून शाहू गप्प बसला. (भ. व. प. या. ६३. हें पत्र स. १७३६ व ४० च्या दरम्यानचें आहे.)

कोकणांत पेशव्यांनीं जिंकिलेला मुलुख शाहूनें त्यांजकडे न ठेवितां चिटणिसास वांटून दिल्याचा उल्लेख वरील पुस्तकांतील ले. ७१ यांत आहे. राज.खं- ६. ले. १६.हें शाहूनें बाजीरावास लिहिलेलें पत्र वाचल्यावर शाहूचें मन त्याजविषयीं कसें उद्विग्न होतें हें दिसतें. उलटपक्षीं बाजीरावास सासवडसंबंधानें उपसर्ग होत असे तो शाहूनें बंद केल्याचा उल्लेख खं. ६, ले. ७७ यांत आहे.

बाजीरावाचीं पत्रें प्रतिनिधि, आंगरे, फत्तेसिंग भोंसले, नागपुरकर भोंसले इत्यादि त्या वेळच्या प्रमुख मंडळीस लिहिलेलीं आढळत नाहींत. या प्रमुख वयोवृद्ध मंडळींच्या मानानें बाजीराव तरुण अननुभवी होता, ह्मणून त्याचें त्यांजवर वजन बसत नसे. नानासाहेबांचीं पत्रें निरनिराळ्या सरदारांस गेलेलीं सांपडतात. नानासाहेब बांका लेखक व मुत्सद्दी होता. पेशवाईचा अधिकार गाजवून सर्व मंडळीस आपल्या हुकमतींत ठेवणें हा जसा नानासाहेब पेशव्याचा विशिष्ट प्रयत्न दिसतो तसा बाजीरावाचा दिसत नाहीं. बाजीरावानें पत्रें लिहिलेलीं असून तीं आज सांपडत नाहींत असें ह्मणण्यापेक्षां त्यानें तशीं पत्रें लिहिलींच नाहींत असें मानण्याकडे कल होतो; आणि केवळ त्याच्या कृत्यांवरून त्याची कर्तबगारी ठरवावी लागते. आपल्याविरुद्ध वागणाऱ्या मंडळीपासून आपण दूर

राहावयाचें, त्यांजशीं संबंध ठेवावयाचा नाहीं, आपण आपल्या हातून होईल तो पराक्रम करून दाखवावयाचा, असा बाजीरावाचा क्रम दिसतो. शिवाय बाजीराव शिपाईगडी होता, मुत्सद्देगिरींत त्याचें लक्ष नानासाहेबापेक्षां कमी होतें, ह्मणून त्याचे कागदपत्र बहुधा नसावे. गोड व लांबलचक पत्रें लिहून दुसऱ्याच्या अंतःकरणांतील किंतु काढून टाकणें ही नानासाहेबाची शैली बाजीरावास नव्हती. राज्यांतील सर्व अवयवांना एका कार्याच्या लगामीं लावून एकंदर राज्यकारभार पुढारीपणानें हांकण्याचें कसब बाजीरावास साधलें होतें असें दिसत नाहीं. शिवाय, बाजीरावाचे वेळीं शाहूच विशेष मुखत्यारीनें सर्व कामें पाहत असल्यामुळें बाजीरावास तशी मुखत्यारी स्वीकारतां आली नाहीं. नानासाहेबाचे वेळेस शाहू हळूहळू वृद्ध व निर्बल होत जाऊन राज्यकारभाराची जोखीम आपोआप नानासाहेबाच्या हातांत आली. वास्तविक, बाजीरावाची परिस्थितिच लोकांना साशंक करीत असे. त्याचें कर्तृत्वही इतरांच्या मानानें विशेष चमकत असल्यामुळें हा केव्हां काय करील याजबद्दल लोक चपापलेले असत. बाजीरावाच्या भजनीं लागलेले सरदार फार थोडे होते, आणि त्याचा स्वभावही कान्होजी आंगरे, रघूजी भोंसले अशा व्यक्तींप्रमाणें अष्टपैलू नव्हता. बाजीरावास सरदार भीत असत, भजत नसत. अर्थात् त्यास चार गोष्टी लिहून त्याचें मन वळवावें अशी भावना फारशी कोणास होत नसावी. बाजीरावासंबंधानें संभाजी आंग्र्याचे पुढील उद्गार स्मरणीय आहेत. “ राजश्री बाजीराव पंडित प्रधान यांनीं बेलभाकर पाठविली, आह्मींही त्यांस पाठविली, तत्राप तो अर्थ एकीकडे ठेवून इमानास खता केली. इमानरोटी देऊन बेइमान केली. ऐसा विचार तुमचा आमचा नसावा. ” (खं. ८, ले.१५१). यांत बाजीरावानें वचन देऊन आपणांस फसविलें असें संभाजी आंगरे भगवंतराव अमात्यास सन १७३६ त लिहितो. असेच उद्गार दुसऱ्या सरदारांचेही आढळतात. ह्मणजे शिवाजी-

सारख्या राष्ट्रपुरुषाच्या ठिकाणीं इतर सरदारांची निःसीम भक्ति व अढळ विश्वास दिसून येतात, तसा प्रकार बाजीरावाचा दिसून येत नाहीं. हें बाजीरावाच्या स्वभावाचें वैगुण्य असेल, अगर आपमतलबी लोकांच्या कपटवर्तनाचा परिणाम असेल. कांहीं असलें तरी बाजीरावाची छाप सर्व सरदारांवर बसलेली नसल्यामुळें त्याच्या कर्तबगारीस पुष्कळ कमीपणा आला. ' दौलतींत कांहीं ताकद नसतां लौकिक उत्तमच केला. मुख्य गोष्ट राजश्री रावसाहेब पुण्यवंत त्यामुळें यश येतें, ' असा उल्लेख खंड ३, ले. ७ यांत कर्नाटकच्या स्वारीसंबंधानें आहे; त्यावरून बाजीरावाच्या कर्तबगारीसंबंधानें लोकांचा आदर चांगला होता, आणि अडचणीच्या प्रसंगांतून निभावणूक करण्यास त्यावेळीं एकटा बाजीरावच काय तो समर्थ होता, अशी भावना सार्वत्रिक व शाहूचीही होती यांत संशय नाहीं. अनेक प्रसंगीं शाहूनें प्रधानांस किंवा सरदारांस सांगितलेल्या कामगिऱ्या सिद्धीस गेल्या नाहींत; तेव्हां शेवटीं बाजीरावास बोलावून त्याजकडून त्या शाहूनें सिद्धीस नेल्या. खंड ६, ले. ४८ चें पत्र, बाजीराव व चिमाजी यास कोणीं तरी लिहिलेलें, वाचलें असतां शाहू व बाजीराव यांच्या बेबनावामुळें राष्ट्रकार्य कसें बिघडलें तें कळून येतें. खंड ८, ले. ११६ चें पत्र बाजीरावानें सन १७३० त भगवंतराव अमात्यास लिहिलेलें असून त्यावरून इतर सरदारांस संतुष्ट ठेवण्याचा प्रयत्न बाजीराव करीत असे असें दिसून येतें. रघूजी भोंसले, नंदलाल मंडलोई, पिलाजी व सटवाजी जाधव यांस प्रसंगानुसार जोराची दरडावणी दाखविण्यास बाजीरावानें कमी केलेलें नाहीं. खं. ६, ले. १९ यांत तर बाजीरावानें पिलाजी जाधवाची जवळजवळ माफीच मागितली आहे. खंड ६, ले. ८५,८६ यांवरूनही बाजीरावाचा स्वभाव व शाहूचा अविश्वास यांचा अंदाज करितां येतो. ' सर्वांचें मनोधारण करून कार्यसिद्धि करणें. प्रतिनिधि व सचिवपंताकडील जमाव तुह्मांसन्निध आहे त्यांचा दीलदिलासा

करून खर्चावेंचास देत जाणें. उभयतां एकमतें वर्तोन स्वामिकार्य सिद्धीस पाववून आपले सेवेचा मजुरा करून घेणें,' असें शाहूनें बाजीरावास कळविलें आहे. त्यावरून आपसांतील दुहीमुळें काम कसें बिघडतें आणि बाजीरावाच्या तुटक व उद्दाम स्वभावामुळें लोक कसे नाराज होतात, याची जाणीव शाहूस होती असें दिसून येतें. 'आजपर्यंत कोंकणस्थांचा लौकिक बरा झाला, परंतु या गोष्टीनें भ्रम गेला,–' इत्यादि खंड ६, ले.८६ तील उद्गारांवरून बाजीरावाविषयीं शाहूचें मन कसें साशंक होतें हें कळतें. भारतवर्ष पत्रें यादी ले. ६३, ६४ यांवरूनही शाहूच्या साशंकतेची व पेशव्याविरुद्ध त्याजकडे जात असलेल्या चहाड्यांची कल्पना होते. एकंदरींत बाजीरावाच्या कर्तबगारीचा अंदाज बांधणें कागदपत्रांच्या अभावामुळें कठीण असून त्यास पराक्रमाच्या मानानें जितकें यश यावें तितकें आपसांतील चुरशीमुळें आलें नाहीं, हें निर्विवाद आहे.

बाजीरावासंबंधानें डफचा अभिप्राय कित्येक गोष्टींत वरील विवेचनास धरूनच आहे. अडचणी, संकटें व विरोधी मंडळींचीं कारस्थानें यांजमधून त्यास मार्ग काढावयाचा असल्यामुळें राज्यकारभारांत त्यास पुढच्या स्थितीचा फारसा पोंच ठेवतां आला नाहीं. तथापि सर्व कारस्थानांचें निर्मूलन करून त्यानें निजामासारख्याचे डाव हाणून पाडिले हें कांहीं लहान काम नव्हे. लुटारू लोकांच्या नायकास जे गुण असावे लागतात ते सर्व त्याच्या ठिकाणीं होते. तो शूर, साहसी, अडचणीच्या प्रसंगांतून चातुर्यानें निसटून जाणारा व भाषणानें लोकांवर छाप बसविणारा होता. शिवाजीची व त्याची तुलनाच करतां येण्यासारखी नाहीं. आजूबाजूच्या राज्यांत गोंधळ माजवून देणें हेंच मराठीराज्याचें जीवनसाधन होतें, असा टोमणा डफ वारंवार मराठ्यांना मारीतो. यांत तथ्य असेल तर, युरोपियन राजनीतींत तो एक गुणच मानला जाईल.

रा. राजवाडयांच्या चवथ्या खंडात छापलेली पेशव्यांची बखर खुद्द पेशव्यांच्या दप्तरांतून सरकारीरित्या तयार झाली असल्यामुळें सर्वथैव विश्वसनीय आहे. त्या बखरींत पहिला व तिसरा पेशवा यांचे संबंधानें प्रशंसापर उद्गार भरपूर असून, बाजीरावाच्या संबंधानें एकही शब्द शुष्क शुद्ध वृत्तांत पलीकडे, केवळ गौरवपर असा आढळत नाहीं, ही गोष्ट विशेष ध्यानांत ठेवण्याजोगी आहे.

**राज्यकारभाराची अव्यवस्था.**- कोणताही नवीन प्रदेश जिंकल्या-बरोबर तेथील बंदोबस्ताची तजवीज करणें हें राज्यकर्त्याचें पहिलें कर्तव्य होय. यासाठीं फौज जय्यत तयारींत पाहिजे आणि ती एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं ताबडतोब पाठविण्याची सोय पाहिजे. असे रस्ते किंवा सोयी नसल्या तर जिंकलेल्या प्रदेशांत आपल्या भरंवशाचे फौजबंद सरदार ठेवावे लागतात. अशा रीतीनेंच आंग्रे, शिंदे, होळकर, बुंदेले वगैरे सरदारांची स्थापना झाली. आंग्रे कोंकणांत नेऊन बसविलेले नसते तर कोंकणचा भाग मराठशाहींत राहिला नसता. तसाच परिणाम इतर ठिकाणींही झाला असता. नवीन रस्ते व राज्यकारभार बनविण्यास अवकाश नसल्यामुळें ही सरदारांची सोपी पद्धति स्वीकारण्यांत आली. जिंकलेल्या प्रदेशांत या सरदारांचे हितसंबंध कायमचे जडल्यामुळें त्यांना आपापल्या प्रदेशाचा बंदोबस्त कोणत्याही उपायानें करणें भाग पडून शत्रूंचा बंदोबस्त परभारें झाला. मात्र या व्यवस्थेनें नवीन राज्यें निर्माण होऊन आरंभापासूनच फाटाफुटीचें बीज राज्यकार-भारांत शिरलें. प्रत्येकानें स्वतंत्रराज्याचे अधिकार धारण केलें. असें केल्याशिवाय त्या अंदाधुंदीच्या, काळांत चालण्यासारखेंही नव्हतें. हुकूम आणवून त्यांचें निरसन करण्याची सोय नव्हती. हिंदुस्थानांत इंग्रजीराज्याची वाढही, मुख्य सरकारचे हुकूम बाजूस ठेवून, प्रसंग पडेल त्याप्रमाणें स्थानिक अधिकाऱ्यांनीं वर्तन केल्यामुळें, झालेली

आहे. सारांश सर्व सरदारांनीं संपूर्ण सत्ताधीशाचे अधिकार धारण केले. इनामें देणें किंवा असलेलीं इनामे खालसा करणें, अशा महत्वाच्या बाबतींतसुद्धां मुख्य सरकाराची मध्यस्थी राहिली नाहीं. मध्यवर्ती कारभाऱ्यांनीं अशा सर्व बाबतींत कांहीं तरी विशिष्ट पद्धति बांधून दिली पाहिजे होती; पण तसें मनःस्वास्थ्य किंवा संधि मराठमंडळास मिळाली नाहीं.

पुष्कळदां विशिष्ट राज्यपद्धतीनेंच राष्ट्रैक्य उत्पन्न होत असतें. कोणतेंही मोठें काम तडीस नेण्यास निरनिराळ्या घटकावयवांनीं एक दिलानें एकदम उद्योग केला पाहिजे. राज्य कारभार म्हणजे एक अत्यंत गुंतागुंतीचें अगडबंब यंत्र आहे. त्या यंत्राचे सर्व भाग व्यवस्थित ठेवणें हेंच राज्यसूत्रचालकांचें मुख्य कर्तव्य असतें. हें यंत्र व्यवस्थित चालविण्याचें काम प्रमुख मुत्सद्यांकडून सिद्धीस गेलें नाहीं. अथात् संघशक्ति किंवा टिकाऊ राष्ट्रैक्य मराठशाहींत उत्पन्न झालें नाहीं. बाळापुर, पालखेड, डभई- इत्यादि अनेक युद्धप्रसंगांत मराठे मराठ्यांशींच झगडत होते. औरंगजेबाशीं लढतांना तोच प्रकार चालू होता. हा प्रकार बंद करण्याचा प्रयत्न पुढें नानासाहेब पेशव्यानें केला आणि तो शेवटीं शेवटीं बराच सिद्धीस गेला; कारण पानपतावर सर्वमराठे संपूर्णराष्ट्रैक्याच्या भावनेनें एकत्र झालें. तथापि पुनरपि राघोबानें मराठशाहींत दुही माजविली. या दृष्टीनें राज्यकारभाराचा विचार करणें बोधपर होईल. म्हणूनच राज्यचालक मुत्सद्दी असावे लागतात.

बाजीराव व त्याचे साथीदार यांनीं देश जिंकण्याचा उद्योग केला, त्याचा अखेरपर्यंतचा अजमास त्यांच्या डोळ्यांसमोर होता असें दिसत नाहीं. युरोपियन इतिहासांत बिस्मार्क, ग्लॅडस्टन वगैरे मुत्सद्दी आपापल्या राष्ट्राचें पुढील शें दोनशें वर्षांचें ध्येय दृष्टीपुढें ठरवून तदनुरूप

उद्योग अगोदर पासून चालू करितात. तसा विचार दूरदृष्टीपूर्वक निदान बाजीरावानें खरो केलेला दिसत नाहीं. वसईचेंच उदाहरण घेतां येईल. खंड ४ मधील पेशव्यांच्या बखरींत खालील वाक्यें आहेत. 'आपासाहेबीं वसईचा सुभा शंकराजी केशव यांसी व साष्टीचा सुभा खंडोजी माणकर यासी सांगोन आपण सरदारसुद्धां पुण्यास आले. वसईतील मसलतीस बारा चौदा हजार माणूस स्वार व हशम कामास आले. आपासाहेबीं या मसलतीस भगीरथ प्रयत्न करून फिरंगाण प्रांत हस्तगत करून हिंदुधर्म-राज्यस्थापना केली.' त्यावरून हा प्रदेश जिंकण्याचा हेतु बहुतेक धार्मिक स्वरूपाचा होता. राष्ट्रियहेतु त्यांस कळला असता तर पोर्तुगीझसत्ता कशी चालली होती, त्यांचे राज्यसंरक्षणाचे व धनोत्पादनाचे उगम कोणते होते, इत्यादि पुढील विचार मराठमंडळास करावे लागले असते. वसई जिंकल्याबरोबर तेथें नवीन प्रचंड आरमाराची स्थापना मराठे मुत्सद्यांनीं केली पाहिजे होती. वसईबंदर चांगलें होतें. जहाजें बांधण्याचे पोर्तुगीझांचे कारखाने होते. त्यांचा दारूगोळा तेथें तयार होता. शेजारीं इंग्रजांचा उद्योग मुंबईस काय चालला होता आणि वसईच्याच प्रकरणांत इंग्रजांनीं कशी ढवळाढवळ केली हें सर्व बाजीराव व चिमाजीआपा चांगले जाणत होते. 'हे इंग्रज व पोर्तुगीझ येतात कोठून, थोडक्याश्या जहाजांनीं व लष्करानें, लाखों फौज बाळगणाऱ्या मराठ्यांबरोबर टक्कर देतात कसे? ते एवढा पैसा कोठून आणितात, व्यापाराच्या व्यवहारांत केवढी किफायत त्यांस होते,' या गोष्टींचा तपास व विचार करून त्यासंबंधानें आपल्या राज्याचें धोरण बाजीराव व चिमाजींनीं कांहीं एक ठरविलें नाहीं. हा विषयच त्यांस कळला नाहीं. त्यांजपाशीं पैसा होता. पैसा मिळवून गब्बर झालेले अनेक सरदार होते. पुढील उद्योगाची जाणीव त्यांस असती तर मुंबईचाच इंग्रजांचा उद्योग वसईस उठवून देतां आला असता. ठाणेंवसई वगैरे साष्टीचा सर्व प्रदेश त्यांचे हस्तगत झाल्यानें पुढील

उद्योगाची रचना याच वेळीं झाली पाहिजे होती. कॅप्टन इंचबर्ड व कॅ. गोर्डन, हे इंग्रजांचे वकील मराठ्यांच्या याच उद्योगाच्या भीतीनें त्यांजकडे शिष्टाई करून तो हाणून पाडण्याचा बेत करीत होते. हे बेत पेशव्यांस कळत होते. पश्चिमकिनाऱ्यावर आंगरे शिरजोर होता, त्याचा नकशा, गृहकलहाचा फायदा घेऊन, पेशव्यांनीं चांगलाच उतरला होता. अर्थात् आंगऱ्यास मोडल्याबरोबर स्वतःचें आरमार एकदम वसईस स्थापिलें पाहिजे होतें. तशी व्यवस्था झाली असती तर पुढें नानासाहेबानें आंगऱ्यास सर्वस्वी बुडवून कोंकणकिनारा पाश्चात्यलोकांस मोकळा करून दिला हें अपेश पेशव्यांवर आलें नसतें, आणि पहिल्या मराठी युद्धांत राघोबास मदत करून मराठशाहींत घुसण्याची ताकदच इंग्रजांस आली नसती. नुसता देश जिंकून रणांगणावर पराक्रम दाखविल्यानें राज्याचें काम भागत नाहीं. जिंकलेल्या प्रदेशांत सुव्यवस्थित व संरक्षक राज्यव्यवस्था निर्माण करणें हेंच ज्यास्त जोखमीचें व शहाणपणाचें काम होय. इंग्रजांच्या तुलनेनें या बाबतींत पेशवे पुष्कळ कमी ठरतात. वसईस नवीन आरमार स्थापण्याची सोन्यासारखी संधि पेशव्यांनीं फुकट घालविली. शंकराजी फडके, खंडोजी माणकर, रामाजी महादेव हे व्यक्तिशः हुशार असून त्यांजकडून आरमाराची, दारूगोळ्याची व व्यापाराची नवीन व्यवस्था करण्यास कांहीं एक हरकत नव्हती. पण ही गोष्ट कोणास सुचल्याचें सुद्धां दिसत नाहीं.

सर्व राज्यकारभार व्यवस्थित चालण्याचें बीज द्रव्यबल होय. त्याविषयीं तर बाजीरावाच्या कारभारांत अनास्था होती, हें ठिकठिकाणीं दाखविलेंच आहे. मग रस्ते वगैरे लोकोपयोगी कामें करावयाची भावना कारभाऱ्यांचे ठिकाणीं नव्हती याचें आश्चर्य करावयास नको.

( ४ ) **मराठशाहीच्या वृद्धींतील दौर्बल्यबीज.**—रा. खरे यांनीं मराठी राज्याच्या खऱ्या स्वरूपाचें विवेचन चांगलें केलें आहे. (इचलकरंजी

इ. प्रस्ता. पृ. ६१–९८ ) त्यांत त्यांनीं मराठी राज्यास ' संयुक्त संस्थानिक-मंडळ ' Confideracy of states असें नांव दिलें आहे. तें एकप्रभुसत्ताक असतें तर इंग्रजांस जिंकितां आलें नसतें. शिवाजीच्या वेळेस तें एकप्रभुसत्ताक असून शाहूच्या वेळेस त्याचें संयुक्तसंस्थानिकमंडळांत रूपान्तर झालें. अर्थात् शाहूनेंच हें राज्य गमावलें असा निष्कर्ष निघतो. मरणसमयीं त्यास चिरस्थायिकता आणण्यासाठीं शाहूनें मुख्य अधिकार पंतप्रधानाच्या हवालीं केला. हें सारें शाहूच्या आलस्याचें व अनास्थेचें फल होतें. आपल्या राज्याचा व तें स्थापन करणाऱ्या पूर्वजांचा शाहूस पराकाष्ठेचा अभिमान होता. तें राज्य वृद्धिंगत करण्याविषयीं त्यांचा उत्साह वर्णनीय होता. तो उदार, शूर, धार्मिक, व प्रजावत्सल होता. पण एवढ्याच गुणांनीं राज्य टिकतें असें नाहीं. राज्य हें करणाऱ्याचें आहे, भोगणाऱ्याचें नाहीं. स्वसुखाविषयीं निरपेक्ष होऊन राजानें महत्त्वाच्या कार्यांत शरीर व मन शिणवावें तेव्हांच त्याचें प्रभुत्व कायम राहतें. पहिल्या तीन महाराजां-प्रमाणें, स्वारींत हजर राहून, अंगमेहेनत व दगदग सोसून सरदार व फौज कह्यांत ठेवणें हें त्याचें कर्तव्य होतें; पण तें त्यास झेंपलें नाहीं व आवडलेंही नाहीं. राज्य वाढविण्याचा हव्यास मोठा, पण दगदग करावयास नको अशी स्थिति असल्यामुळें, मुलूख जिंकून त्याचा कारभार करण्याचें काम त्यानें सरंजामी सरदारांवर सोंपविलें. अर्थात् मोठमोठ्या सरदारांस सनदा देऊन निरनिराळे प्रांत जिंकण्याचा उद्योग सुरू झाला, तेव्हांच जे प्रांत त्या सरदारांचे बनले, ते यांजकडून काढून घेण्याचा मार्ग राहिला नाहीं.

शाहूकडून सरदारांस सनदा मिळाल्याबरोबर त्यांनीं व त्यांच्या कारभाऱ्यांनीं शेंकडों सावकार गोळा करून, त्यांजकडून कोट्यवधि रुपये कर्ज मिळविलें व हजारों शिलेदारांस अनुकूल करून लक्षावधि रुपये व लक्षावधि फौज

गोळा केली. अशी फौज घेऊन हे सरदार, सावकार व शिलेदार सर्व मिळून त्या त्या प्रांतांत जाऊन, रात्रंदिवस मेहेनत करून तेथील शत्रूंचा बीमोड करून ते ते प्रांत काबीज करते झाले. वर्षानुवर्ष रगडा चालवून हातचें, पदरचें भरीस घालून व प्रसंगीं प्राणही खर्च करून जे प्रांत मिळविले, ते जर छत्रपती मागूं लागले तर ते त्यांस कसे मिळावे. सरदार वगैरे लोकांचें सर्व नुकसान भरून देऊन व सावकारांचीं कर्जे फेडून प्रांत आपल्या ताब्यांत घेण्याचा मार्ग होता, पण एवढी अगणित संपत्ति त्याजबळ नव्हती. याकरितां कोणी सरदारानें प्रांत जिंकिला म्हणजे तोच त्याच्या फौजेच्या खर्चास सरंजाम म्हणून नेमून द्यावा आणि हुजूरखर्चाकरितां 'दिवाण देणें' म्हणून कांहीं नियमित रक्कम ( बहुधा निंमें उत्पन्न ) त्याजपासून घेत जावी असा प्रघात शाहूमहाराजानें व पेशव्यांनीं प्रथम पासून ठेविला. या योगानें सरदारांस व कार्यकर्ते पुरुषांस उत्तेजन येऊन ते राज्य वाढवीत सुटले; पण त्याबरोबरच ते स्वतंत्र पंथ काढूं लागले. शाहू नुसता महाराष्ट्र-वादी नसून महत्तरराष्ट्रवादी अथवा हिंदुपदपादशाहीचा अभिमानी होता. स. १७०७ त राज्यारोहणाचे वेळीं शाहूचे ताब्यांत भीमा व कृष्णा या नद्यांमधला मुलूख देखील धडपणें नव्हता, पण मरणसमयीं त्याच्या नांवाचा शिक्का काशीपासून रामेश्वरापर्यंत चालत होता. पण हें सर्व राज्य सरदारांनीं मिळविलेलें सरदारांच्याच ताब्यांत होतें. त्याची सुव्यवस्थित घटना बांधून देण्याचें सामर्थ्य व कौशल्य शाहूच्या, पेशव्यांच्या किंवा इतर प्रधानांच्या ठिकाणीं दिसून आलें नाहीं. तोच ईस्टइंडिया कंपनीचा प्रकार किती भिन्न झाला पहा.

आपल्या अभ्युदयाचा उगम महाराजांच्या कृपेपासून आहे हें ओळखून शाहूचे सरदार त्याच्याशीं नम्रपणानें व आज्ञाधारकपणानें वागत. हें त्यांचें वर्तन केवळ औपचारिक होतें असें नाहीं. शाहूशीं ते कृतज्ञ व भक्तिपूर्ण भावनेनें वागत; परंतु शाहूचें हें सारें तेज, दरारा त्याच्या

बरोबर लयास गेला. पुढील राज्यकर्त्यांवर सरदारांची भक्ति बसली नाहीं. आह्मा पौरस्त्य लोकांचे राजकीय कारभार संस्था-प्रधान नसून व्यक्ति-प्रधान असतात.

'एकदां जो प्रघात पडला तो कायमचा चालविण्याविषयीं आमचे लोक अत्यंत दक्ष असतात. एकदां दाखला पडला कीं तो मोडूं द्यावयाचा नाहीं. ही मिरासदारी ( Prescriptive right ) येथून तेथून सर्व कारभारांत प्रबळ झाली. 'जुनें मोडूं नये, नवें करूं नये,' या वाक्यद्वयांत या मिरासदारीचें रहस्य सांठलेलें आहे. पेशव्यांस एखादा किल्ला पाहिजे असला, तरी त्यास किल्लेदाराचा मिरासी हक्क आडवा येऊं लागला. सरकारचें धान्य, खजीना व बंदिवान हे सर्व हवालीं करून घेऊन राखणें व परचक्र आलें तर लढाई करणें, हीं कामें जेथपर्यंत आपण करीत आहों, जेथपर्यंत आपण राज्याशीं हरामखोरी केली नाहीं, तोंपर्यंत आपणास काढण्याचा पेशव्यास अधिकार नाहीं असा किल्लेदारास भरंवसा होता. एखाद्या शंभर स्वारांच्या पथक्यास स्वारांचें पथक मोडून पायदळाचें पलटण तयार कर, असें पेशव्यांनीं सांगितलें तर तो पथक्या ह्मणणार, महाराजांच्या वेळचा जसा सरंजाम होता तसा बाळगून मी चाकरी करणार, त्या बाहेरची गोष्ट मला करावयास सांगण्याचा तुह्मांस अधिकार नाहीं. यदाकदाचित् एखादा पथक्या कबूल झाला, तरी त्याचे कारभारी, मजुमदार, फडणीस व स्वार सुद्धां असली गोष्ट कबूल करावयाचे नव्हत. कारण सर्वांचाच ठरलेला हक्क आड यावयाचा. महादजी शिंद्यानें पलटणें तयार केलीं, तीं बादशहाच्या दौलतींतून केलीं. मराठी राज्याच्या उत्पन्नांतून तीं तो करूं जाता, तर त्याचेंच उच्चाटन झालें असतें. या मिरासदारीमुळें आपलें चालत आलें आहे तसें पुढें चालविण्याच्या प्रघातामुळें, कोणासच भय नाहींसें झालें. कशीबशी चाकरी करून दिवस काढण्याची चाल पडली, आणि राज्याची वाढ खुंटली. राज्य ह्मणजे प्रगति, सुधारणा,

इष्ट फरेफार; हे इष्ट फरेफार करण्याची सोय ज्या राज्ययंत्रांत नाहीं, ज्याची घटना प्रतिगामी झाली, तें राज्य टिकणें शक्य नाहीं. दोन तीन पेशवे बरे निघाले तोंपर्यंत राज्याची भरभराट झाली. ते नाहींसे होतांच 'संस्थांचा किंवा घटनेचा जोर नसल्यामुळें राज्य बुडालें'. ( खरे ).

बाजीरावाची कारकीर्द येथें संपली, तरी त्याच्या मृत्यूनें राज्यकारभारांत क्रान्ति अशी घडून आली नाहीं. उलट त्यानें उपक्रमिलेले उद्योग त्याच्या मुलानें ज्यास्तच नेटानें पुढें चालविले. तसेंच श्रीवर्धनकर-पेशव्यांना मराठशाहींत प्रामुख्य मिळाल्यापासून नवीन व्यक्ती व घराणीं अनेक पुढें आलीं, त्या सर्वांचा यथायोग्य निर्देश मुख्य हकीकतींत करितां आला नाहीं. राष्ट्रोद्योगांत ज्यांनीं ह्मणून यथाशक्ति उद्योग केला, त्यांचें वर्णन राष्ट्रीय इतिहासांत स्थापित होणें इष्ट असल्यामुळें, अशा कित्येक व्यक्तींच्या व घराण्यांच्या हकीकती पुढें स्वतंत्रतेनेंच देण्यांत येतील.

# सूची.

---

# श्रीसयाजीसाहित्यमाला.

| | | | |
|---|---|---|---|
| १ | संस्कृत वाङ्मयाचा इतिहास. | २-८-० | ... |
| २ | भूपृष्ठविचार ( सचित्र ) | ०-१०-० | ... |
| ३ | आपणा लघुबंधु अंग्रेज. | १-०-० | ... |
| ४ | अलकानो अद्भुत प्रवास ( सचित्र ) | १-६-० | ... |
| ५ | माबापने बे बोल. | ०-६-० | ०-४-० |
| ६ | हिंदुस्थानना देवो ( सचित्र ) | ४-०-० | ... |
| ७ | नीतिशास्त्र. | ०-१४-० | ०-१०-० |
| ८ | प्रेमानंद ( सचित्र ]. | १-०-० | ०-१२-० |
| ९ | जगत्नो वार्तारूप इतिहास ( ग्रंथ १ लो ) | ३-८-० | ... |
| १० | बालोद्यान पद्धतीचें गृहशिक्षण ( सचित्र ) | ०-१०-० | ०-९-० |
| ११ | देहधर्मविद्याना तत्त्वो. | १-०-० | ०-१४-० |
| १२ | विज्ञानप्रवेशिका | ०-११-० | ... |
| १३ | जिंदगीनो विमो. | ०-११-० | ... |
| १४ | दयाराम | ०-११-० | ... |
| १५ | सुधारणा व प्रगति. | ३-०-० | ... |
| १६ | वीरपुरुषो. | ०-१२-० | ०-११-० |
| १७ | उद्भिज्जविद्यानुं रेखादर्शन ( सचित्र ) | १-०-० | ०-१५-० |
| १८ | करोळीओ. ( सचित्र ) | ०-१४-० | ०-१३-० |
| १९ | ब्रिटिश राष्ट्रीय संस्थाओ. | ०-१३-० | ०-१२-० |
| २० | मिराबाई | ०-११-० | ०-१०-० |
| २१ | ख्रिस्त | १-०-० | ... |
| २२ | प्राणीविद्यानुं रेखादर्शन ( सचित्र. ) | १-०-० | ०-१४-० |
| २३ | दीघ निकाय [ भाग १ ला ] | १-८-० | ... |
| २४ | पॅलेस्टाईननी संस्कृति. | ०-१२-० | ०-११-० |
| २५ | मनुष्यविद्याना तत्वो. | १-०-० | ०-१५-० |
| २६ | जगतनो वार्तारूप इतिहास [ ग्रंथ २ जो ] | ३-०-० | ... |
| २७ | नीतिविवेचन | १-८-० | १-०-० |
| २८ | बालोद्यान पद्धतीनुं गृहशिक्षण ( सचित्र ). | ०-१४-० | ०-१२-० |
| २९ | कॉबेटनो उपदेश. | ०-१५-० | ०-१४-० |
| ३० | गिरधर. | ०-१४-० | ०-१३-० |

| | | | |
|---|---|---|---|
| ३१ | पार्लमेंन्ट ( गुजराती ). | १-४-० | १-२-० |
| ३२ | तुलनात्मक धर्मविचार. | ०-१३-० | ०-१२-० |
| ३३ | भालण. | १-०-० | ०-१५-० |
| ३४ | इतिहासनुं प्रभात. | १-४-० | १-२-० |
| ३५ | जीवविद्या. | १-०-० | ०-१४-० |
| ३६ | धर्मना मूळतत्वो. | ०-१०-० | ०-९-० |
| ३७ | नैतिक जीवन तथा नैतिक उत्कर्ष. | ०-१५-० | ०-१४-० |
| ३८ | तुलनात्मक भाषाशास्त्र. | १-४-० | १-२-० |
| ३९ | हिंदुस्थानाचा लष्करी इतिहास व देशतराष्ट्रांच्या फौजा. | | |
| ४१ | शिवाजी. [ सचित्र ]. | १-६-० | १-०-० |
| ४२ | उत्तर युरोपनी पुराणकथा. | ०-१४-० | ०-१२-० |
| ४३ | विष्णुदास. | १-०-० | ०-१४-० |
| ४४ | राजनीतीनो संक्षिप्त इतिहास. | १-४-० | १-२-० |
| ४५ | समाजशास्त्र प्रवेशिका. | ०-१४-० | ०-१२-० |
| ४६ | वीर शिवाजी. | १-०-० | ०-१४-० |
| ४७ | बाळस्वभाव अने बाळउछेर. | १-८-० | १-६-० |
| ४८ | चीननी संस्कृति. | १-६-० | १-४-० |

# श्री सयाजी बालज्ञानमाला.

| | | |
|---|---|---|
| १ | गिरनारनुं गौरव ( सचित्र ). | ०-६-० |
| २ | ऋतुना रंग. | ०-६-० |
| ३ | शरीरनो संचो. ( सचित्र ) | ०-६-० |
| ४ | महाराणा प्रताप. ( सचित्र ) | ०-६-० |
| ५ | कोपनी कथा. ( सचित्र ) | ०-६-० |
| ६ | पाटण-सिद्धपुरनो प्रवास. | ०-६-० |
| ७ | पावागढ. | ०-६-० |
| ८ | औरंगझेब. [ सचित्र ] | ०-६-० |
| ९ | मधपुडो. [ सचित्र ] | ०-६-० |
| १० | रणजीतसिंह. ” | ०-६-० |
| ११ | सुखी शरीर. | ०-६-० |